मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ६५ वें.

# श्रीरामकृष्ण.



हें पुस्तक

सद्गुरु श्रीरामकृष्ण परमहंस

यांचे परमशिष्य महेन्द्र यांच्या इंग्रजी ग्रंथावरून

श्रीयुत नागेश वासुदेव गुणाजी,

बी. ए., एल्‌एल्. बी.

डिस्ट्रिक्ट प्लीडर, बेळगांव,

यांनीं लिहिलें.



[ प्रथमावृत्ति. ]



मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

गिरगांव—मुंबई.



किंमत १-४-०.] सर्व हक्क स्वाधीन. [ १९१३.

Pages 1 to 176 printed by G. N. Kulkarni, at his Karnatak Press, 7 Girgaon Back Rd., Bombay; and pages 177 to 316 by R. Y. Shedge, at the Nirnaya Sagar Press, 23 Kolbhat Lane Bombay.

AND

Published by K. R. Mitra, Proprietor of the Manoranjak Grantha Prasarak Mandali, at 2 A. Charni Rd, Girgaon, Bombay.

# बोधामृताचे कांहीं भाग प्रसिद्ध झाल्यावर आलेलीं स्वामी विवेकानंदांचीं पत्रें.

अक्टोबर १८९७,

लाला हंसराज यांच्या घरीं,

रावळपिंडी.

प्रियकर महेन्द्र,

शाबास, मित्रा, शाबास! आतां तूं ठीक काम करीत आहेस. मर्दा, असा बाहेर पड. सर्व आयुष्यभर झोंपा घेऊन चालावयाचें नाहीं. वेळ निघून जात आहे. भले शाबास हाच मार्ग आहे.

तुझें हें छोटें पुस्तक तूं पाठविल्याबद्दल मी फार फार आभारी आहें. मात्र असे छोटे भाग काढून फायदा होणार नाहीं, असें मला वाटतें. फायदा होवो न होवो, त्यांनां प्रकाशांत येऊंद्या. तुला पुष्कळ आशीर्वाद मिळतील. पण वैसाही सदाकाल बनता साहेब!

आपला

गुरुबंधु

विवेकानंद.

---

[२]

२४।११।१८९७,

डेहराडून.

प्रियकर महेंद्र,

तूं आपलें दुसरें पुस्तक पाठविल्याबद्दल मी फार फार आभारी आहें. तें खरोखर अपूर्व आहे. असा प्रयत्न पूर्वीं कधीं कोणीं केला नव्हता. आपल्या अहंकारानें यत्किंचितहि दूषित न झालेलें असें कोणाहि सद्गुरूचें चरित्र लोकांपुढें आलेलें नाहीं भाषाहि इतकी नवी, खोंचदार व सरळ आणि सुलभ आहे, कीं, तिचें वर्णन करणें शक्य नाहीं.

हीं पुस्तकें मला किती आवडलीं, हें शब्दांनीं नीट सांगतां येत नाहीं. मी जेव्हां तीं वाचूं लागतों, तेव्हां माझा आनंद गगनांत मावेनासा होतो, हें नवल नव्हे काय? आमचे सद्गुरु भगवान् इतके अद्वितीय होते, कीं, आह्मांलाहि तसेंच झालें पाहिजे; नाहींतर आमची कांहीं किंमत नाहीं. यापूर्वीं आमच्यापैकीं कोणींहि सद्गुरूंचें चरित्र लिहिण्याचा असा प्रयत्न कां केला नाहीं, हें आतां मला समजलें. हें महत्कार्य तुझ्याकरितां राखून ठेविलेलें होतें. सद्गुरु भगवान् तुझ्याबरोबर आहेतच. सप्रेम नमस्कार.

आपला

गुरुबंधु

**विवेकानंद.**

**ता० क०—**

साक्रेटीसचे संवाद प्लेटोनें भरून गेले आहेत[1], पण तूं पूर्ण ' **गुप्त** ' आहेस. शिवाय, तूं हे दृश्यकाव्यरूपानें लिहिलेले भाग इतके सुंदर व हृदयगम वठले आहेत, कीं, ते प्रत्येकाला, येथें व पाश्चिमात्य देशांतहि फारच प्रिय झाले आहेत.

**विवेकानंद.**

---

१ प्रसिद्ध तत्त्ववेत्ता प्लेटो हा साक्रेटीसचा शिष्य होता. महात्मा साक्रेटीस यानें केलेला उपदेश प्लेटोने प्रसिद्ध केला आहे; पण त्याचे नांव प्लेटोचे संवाद ( Plato's dialogues ) असें त्यानें ठेविलें आहे; परंतु महेंद्राने आपल्या ' रामकृष्णबोधामृत ' इंग्रजी पुस्तकांत आपलें पूर्ण नांवसुद्धां दिलेले नाहीं, फक्त नांवाचे पहिले एक अक्षर ' एम् ' हे दिलेलें आहे. हें त्याच्या मनाच्या थोरपणाचें आणि गुरुभक्तीचे द्योतक आहे.



भगवान् श्रीरामकृष्ण परमहंस.

# प्रस्तावना.

सद्गुरु **श्रीरामकृष्ण परमहंस** व त्यांचे सच्छिष्य **नरेंद्र** (**स्वामी विवेकानंद**) यांची कीर्ति या देशांतच नव्हे, तर इंग्लंड, अमेरिका, आस्ट्रेलिया इत्यादि परदेशांतहि पसरलेली आहे. या महात्म्यांचीं नांवें ऐकिलीं नाहींत अशीं मनुष्यें फारच थोडीं आढळतील. लोकसेवेच्या आणि परोपकाराच्या व्रतानें '**रामकृष्ण मिशनचें**' नांव या देशांत तर सर्वांनां माहीत झालेलें आहे; पण **श्रीरामकृष्णांच्या** '**महेंद्र**' नामक शिष्याची माहिती कोणालाहि नाहीं. महेंद्र हे **परमहंसांचे** गृहस्थाश्रमी शिष्य असून यांनीं प्रथम **श्रीरामकृष्णांची** भेट इ. स. १८८२ सालीं घेतली, व चारपांच वर्षे त्यांच्या सहवासांत घालविलीं. यांचा स्वभाव फार भिडस्त असल्यामुळें ते फारसे कोणापाशीं बोलत नसत. सद्गुरूंचा उपदेश ऐकावा, व घरीं जाऊन स्मरण करून त्याचें टांचण करून ठेवावें, असा यांचा क्रम असे. पुढें स्वामी विवेकानंदांच्या मार्फत **श्रीरामकृष्णांचें** नांव व बोधामृत या देशांत व परदेशांतहि पसरल्यावर महेंद्रांनीं **श्रीरामकृष्णांच्या** बोधामृताचे कांहीं भाग ( Leaves from the Gospel of Sri Ramakrishna ) मद्रासच्या ' ब्रह्मवादिन् ' नामक मासिकांत प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. बरेचसे भाग प्रसिद्ध झाल्यावर '**रामकृष्ण-बोधामृत**' नांवाचें एक स्वतंत्र पुस्तक ब्रह्मवादिन् संस्थेनें १९०७ सालीं प्रसिद्ध केलें. याच ग्रंथाचें मराठींत भाषांतर देण्याचा हा प्रयत्न आहे.

महेंद्रांनीं बंगालींतहि ' **रामकृष्णकथामृत** ' चे चार भाग प्रसिद्ध केले आहेत. इंग्रजींत ब्रह्मवादिन् संस्थेमार्फत १४ भागांचा एकच ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. आणखी पुढील भाग ग्रंथरूपानें प्रसिद्ध करण्याचा महेंद्रांचा हेतु आहे. या इंग्रजी ग्रंथांतील त्यांची भाषा फारच मधुर,

खोंचदार व सोपी असून ती बायबलाच्या भाषेसारखी वाटते. इतकें भाषेविषयीं सांगितलें असतां पुरे. त्यांतील विचार तर इतके उत्कृष्ट व उदात्त आहेत, कीं, याच्या तोडीचे ग्रंथ जगाच्या वाङ्मयांत फारच थोडे आढळतील. याच्यासारखा साधारण दुसरा ग्रंथ ह्मटला ह्मणजे प्लेटोनें आपल्या गुरूचे—साक्रेटीसचे प्रसिद्ध केलेले 'संवाद' (Plato's Dialogues) हा होय, असें ह्मणतात. प्लेटोच्या 'संवादा'पेक्षां महेंद्रांच्या ग्रंथांत कांहीं विशेष आहे. वाचकांनां मोठ्या प्रेमानें हातांत धरून महेंद्र हे त्यांनां अगदीं **श्रीरामकृष्णां**समोर नेऊन सोडतात, व त्यांचा उपदेश जशाचा तसा—जणूं काय याचवेळीं तो चालला आहे अशा रीतीनें ऐकावयास लावितात, आणि आपण स्वतः मागें राहतात. **परमहंसां**चा उपदेश ऐकून वाचकांचें मन तृप्त झाल्यावर, **परमहंसां**च्या ज्ञानाची व भक्तीची तारीफ करावी, कीं, महेंद्रांच्या निरहंकारतेची तारीफ करावी, हें त्यांनां समजत नाहींसें होतें. **परमहंसां**ची व दुसऱ्या सत्पुरुषांची ओळख व सहवास करून दिल्याबद्दल महेंद्रांचे आभार मानण्याकरितां वाचक जेव्हां मागें वळून पहातात, तेव्हां त्यांनां महेंद्रांचा कांहींच पत्ता लागत नाहीं ! कारण, महेंद्रांनीं आपलें पूर्ण नांव गांव वगैरे सर्व 'गुप्त' ठेविलें आहे. निरभिमानपणाचा व नम्रतेचा हा धडा सर्वांनीं महेंद्रांपासून शिकण्यासारखा आहे.

एम्. चें इंग्रजींतील **श्रीरामकृष्णां**चें बोधामृत वाचल्यावर आमचे मन अगदीं वेडावून गेलें. आमच्या कांहीं मित्रांचीहि गत पण तशीच झाली. त्यामुळें त्या पुस्तकाचें भाषांतर करण्याची, आणि आमच्या महाराष्ट्रीय बंधुभगिनींनां **परमहंसां**च्या बोधामृताचा लाभ करून देण्याची अनावर इच्छा मनांत उत्पन्न होऊन भाषांतराची परवानगी मिळविण्यासाठीं आह्मीं एम्. चा शोध चालविला, व परमेश्वरकृपेनें आह्माला त्यांत यश आलें; आणि 'एम्' हें महेंद्र या नांवाचें पहिलें अक्षर आहे, असें कळलें.

# प्रस्तावना.

आमच्या विनंतीला मान देऊन महेंद्रांनीं भाषांतर करण्याची परवानगी दिल्याबद्दल व ' महेंद्र ' असें आपलें नांव आमच्या पुस्तकांत प्रसिद्ध करण्यास लिहिल्याबद्दल, आणि परमहंसांनीं ह्मटलेलीं पदें, स्तोत्रें वगैरे पाठविल्याबद्दल आह्मीं त्यांचे मानावे तितके आभार थोडेच आहेत ! आमचे परम मित्र श्रीयुत दत्तात्रेय बाळकृष्ण कालेलकर, बी.ए., यांनीं हें भाषांतर तपासण्याच्या कामीं, व श्रीयुत अनंत रामदास मर्ढेकर यांनीं भाषांतराचे बरेचसे भाग सुवाच्य लिहून काढण्याच्या कामीं बरीच मदत केली आहे. तसेच मूळ बंगाली पदांचें मराठींत सुंदर रूपांतर करण्याच्या-कामीं मनोरंजनाचे साहाय्यक संपादक श्रीयुत विठ्ठल सीताराम गुर्जर यांनीं,आणि पुस्तकाचें बहिरंग अंतरंगास साजसें करण्याच्या कामीं मित्रवर्य श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र यांनीं, शक्य तितके प्रयत्न केलेले आहेत. परमहंसांचे स्तोत्र मित्रवर्य श्रीयुत विठ्ठल कृष्ण कामत यांनीं केलेलें आहे. या सर्वांचे आह्मी मनापासून आभार मानितों.

**परमहंसांचे** जीवनचरित्र लिहिण्याच्या कामीं, प्रोफेसर मॅक्स मुल्लर साहेबांचा 'रामकृष्ण.' ( चरित्र व बोधवचनें ) हा इंग्रजी ग्रंथ, स्वामी विज्ञानानंद जींचा 'रामकृष्ण परमहंसका जीवनचरित्र और सदुपदेश' हा हिंदी ग्रंथ, ब्राह्मो पंडित शिवनाथ शास्त्री यांचा १९१० नोवेंबरच्या मॉडर्न रिव्ह्यूमधील ' रामकृष्ण परमहंसांच्या आठवणी ' हा लेख, या सर्वांचा फार उपयोग झाला आहे. या सर्वांचेहि आह्मी आभार मानितों.

महाराष्ट्र वाचकवर्गाची सेवा करण्याचा हा आमचा दुसरा प्रयत्न आहे. **स्वामी रामतीर्थांच्या** ( पहिल्या ) सेवेप्रमाणें **श्रीरामकृष्णांची** ही (दुसरी) सेवा सज्जन वाचक, न्यून पूर्ण करून गुणग्राहकबुद्धीनें गोड करून घेतील, अशी उमेद आहे. अशीच सेवा वारंवार आमच्या हातून घडो, अशी त्या सच्चिदानंद जगन्मातेची प्रार्थना करून ही अल्प प्रस्तावना पुरी करितों.

बेळगांव,
श्रावण पौर्णिमा, शके १८३४. }

ॐ **राप** ॐ

# श्रीरामकृष्णपरमहंस यांचें जीवनचरित्र.

साधनें तरी हींच दोन्ही । जरी कोणी साधील ॥ १ ॥
परद्रव्य परनारी । यांचा धरी विटाळ ॥ २ ॥
देवभाग्यें घरा येती । संपत्ती त्या सकळा ॥ ३ ॥
तुका ह्मणे तें शरीर । गृह भांडार देवाचें ॥ ४ ॥

—तुकाराम.

जगांतील मुख्य मुख्य देशांच्या इतिहासाकडे पाहिलें असतां असें दिसून येतें, कीं, आजपर्यंत धर्माच्या नांवाखालीं पुष्कळ तंटेबखेडे, लढाया, खून रक्तपात इत्यादि बरेच अनर्थ ओढवले आहेत. गेल्या दोनतीन शतकांत, विशेषतः गेल्या शतकांत आधुनिक शास्त्रांची बरीच प्रगति झाल्यामुळें, व ज्ञानाचा सर्वत्र प्रसार झाल्यामुळें, धर्मवेडाचें बंड कमी होत चाललें; पण त्याबरोबरच दुसरा एक असा परिणाम घडून येऊं लागला, कीं, खऱ्या धर्माचा ऱ्हास होऊन जडवाद (Materialism) बळावत चालला. या जडवादाची लाट मार्गें सारून खऱ्या धर्माचें स्वरूप व रहस्य लोकांपुढें मांडण्याकरितां, आणि तसेंच, सर्व धर्मांना परमेश्वराचा सारखाच आधार आहे, हिंदु, बुद्ध, खिस्ती आणि मुसलमान इत्यादि सर्व लोक एकाच जगन्मातेचीं लेंकरें आहेत, व सर्व धर्म हे त्या मातेप्रत जाण्याचे मार्ग आहेत, इत्यादि उदात्त तत्वें अनुभवानें सांगून सर्व धर्म संप्रदायांमध्यें प्रेम आणि ऐक्यभाव उत्पन्न करण्याकरितां जे अगदीं थोडे महात्मे या पृथ्वीतलावर अवतीर्ण झाले, त्यांत श्रीरामकृष्णपरमहंस यांची प्रमुखत्वानें गणना आहे. त्यांचें जीवनचरित्र फारच बोधप्रद आणि मनोरंजक असल्यामुळें तें येथें थोडक्यांत देतों.

# जीवनचरित्र.

जन्मभूमि.

श्रीरामकृष्णांचा जन्म बंगाल प्रांतांत हुगली जिल्ह्यांत जहानाबादहून चार कोसांवर असलेल्या कमरपुकर गांवीं शके १७५६ सौर दशमी फाल्गुन शु. द्वितीया, ह्मणजे ता. २० फेब्रुवारी १८३४ रोजीं झाला.

मातापिता.

श्रीरामकृष्णांच्या वडिलांचें नांव खुदिराम चट्टोपाध्याय असें होतें. हे गरीब असून निष्ठावान् आणि तेजस्वी होते. गांवांतील सर्व लोक यांनां फार मान देत असत. पूर्वी हे कमरपुकरहून ᵢᵣ कोसावर असलेल्या डेरे या गांवीं रहात होते. त्या गांवच्या जहागिरदाराच्या तर्फे कोर्टांत खोटी साक्ष देण्याचें नाकारिल्यामुळें त्यांनां तो गांव सोडावा लागला. यामुळें ते सकुटुंब कमरपुकर येथें येऊन राहिले. यांनीं वाक्-सिद्धि व इतर कांहीं सिद्धि मिळविल्या होत्या, असें ह्मणतात. ते एकदां गयेच्या यात्रेस गेले असतां 'मी तुझा पुत्र होईन' असा गदाधरजीचा (विष्णूचा) स्वप्न-दृष्टांत* झाल्यामुळें, त्यांनीं आपल्या पुत्राचे नांव गदाधर असें ठेविलें. पुढें यांचें नांव रामकृष्ण असें पडलें. यांच्या मातेचें नांव चंद्रामणी देवी असें होतें. ही स्वभावानें फार सौम्य असून दया आणि क्षमा यांची केवळ मूर्तिच होती. वृद्धपणीं गंगातटाकीं राहण्याची इच्छा झाल्यावरून ती आपल्या पुत्राजवळ दक्षिणेश्वरीं येऊन राहिली. तेथें रहात असतांना राणी राशमणीचे जामात आणि राम-कृष्णांचे शिष्य मथुरबाबु हे तिला कांहीं हजार रुपये दान देतों, स्वीकार करावा असा आग्रह करूं लागले; पण ती ह्मणाली, कीं, "मी येथें मोठया सुखानें रहात आहें; मला कांहीं कमी नाहीं; मला नित्य गंगास्नान घडतें आणि भगवती कालीचा प्रसाद मिळतो. मला कोणत्याहि वस्तूची जरूरी नाहीं!" हें ऐकून मथुरबाबु पुनःपुन्हां दान घेण्याविषयीं आग्रह करूं लागले. त्यांचा तो आग्रह पाहून त्यांनां नाहीं असें उत्तर देण्याचें तिच्या जीवावर आलें; व शेवटीं तिनें सांगितलें, कीं, "असें आहेच तर मला दोन पैशांचा सुर्ती तंबाखु आणून द्या!" हें तिचें उत्तर ऐकून मथुरबाबु फार विस्मित होऊन ह्मणाले, कीं, "आपण जर अशा नसतां तर रामकृष्णांसारखा पुत्र आपल्या कुशीं कसा जन्म घेता!" '**शुद्ध बीजा पोटीं, फळें रसाळ गोमटीं**' या तुकारामोक्तीची प्रतीति येथें चांगली येते. रामकृष्णांच्या पितुःश्रीची सत्यनिष्ठा व मातुःश्रीची निरिच्छता हीं लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत.

---

* असा स्वप्नदृष्टान्त बहुतेक महात्म्यांच्या जन्माच्या मूळाशीं असतो, असें आढळतें. अशा स्वप्नदृष्टान्तावर कितपत विश्वास ठेवावा, हा एक प्रश्न आहे.

# श्रीरामकृष्ण.

**बाळपण.**

लहानपणीं रामकृष्ण फार सुंदर आणि गोजिरवाणे दिसत. त्यामुळें गांवांतील सर्व लोक त्यांनां **'गदाई'** असें ह्मणून नेहमीं प्रेमानें कडेवर घेत. पांचसहा वर्षांचे झाल्यावर त्यांनां गांवांतील एका प्राथमिक शिक्षणाच्या पाठशाळेंत घालण्यांत आलें, व तेथें ते थोडेंसें लिहणेंवाचणें शिकले. बेरीज, वजाबाकी इत्यादि गणिताचे विषय ते फारसे शिकले नाहींत. अंकगणितानें आपलें डोकें बिघडवून सोडिलें, असें ते केव्हां केव्हां ह्मणत असत.

प्राथमिक शिक्षणाच्या शाळेंत थोडेंसें शिक्षण झाल्यावर गदाधर घरींच राहूं लागले. कुलदेवतेची—रघुवीराची पूजा करण्याचें काम त्यांच्यावर सोंपविण्यांत आलें होतें. सकाळीं कांहीं स्तोत्रें व भूपाळ्या ह्मणून झाल्यावर फुलें, तुळशी आणून स्नान करून रघुवीराची पूजा करावी, असा त्यांचा त्या वेळचा क्रम असे. रामायण, महाभारत व भागवत इत्यादि ग्रंथांतील कथा ऐकणें त्यांनां फार आवडे व त्यांची स्मरणशक्ति चांगली असल्यामुळें ऐकिलेल्या कथा त्यांच्या नीट ध्यानांतहि रहात असत. त्यांचा आवाजहि फार गोड असे. जत्रेंतील गाणी व नाटकें एकदां ऐकिलीं ह्मणजे तीं त्यांनां तोंडपाठ ह्मणतां येत. कृष्णलीला पाहिल्यावर आपल्या संवगड्यांनां जमवून त्यांतील सर्व भाग त्यांनां शिकवून त्या सर्व लीला झाडाखालीं करून दाखविण्याचा त्यांनां फार नाद असे. देव-देवतांच्या प्रतिमेंतील गुणदोष त्यांनां लहानपणापासून कळत व त्यांनां स्वतः उत्तम मूर्ति बनवितां येत असत. त्यांनीं दुरुस्त केलेली श्रीकृष्णांची मूर्ति अद्याप दक्षिणेश्वरांतील देवालयांत आहे.

पुरीस जाणाऱ्या यात्रेकरूंचा रस्ता कमरपुकरवरून गेला असल्यामुळें पुष्कळ साधुसंत त्या गांवच्या जमीनदारांनीं बांधिलेल्या धर्मशाळेंत वस्तीस रहात असत. गदाधर नेहमीं त्यांच्यापाशीं जाई आणि त्यांची सेवा करी; त्यांचा उपदेश व त्यांच्या कथा, प्रवासांतील गोष्टी वगैरे ऐके. साधुसंतहि गदाधरावर प्रेम करीत व केव्हां केव्हां त्याचें गांव आणि त्याचें घर पाहण्यासाठीं प्रेमानें त्याच्याबरोबर येत. सुमारें दहा अकरा वर्षांचे असतांना गदाधर एके दिवशीं शेतांतून अनूर गांवास जात होते, तेव्हां आकाश फार स्वच्छ व निरभ्र होतें, आणि कांहीं बगळे वर उडून जात होते. त्या वेळचें रंगवैचित्र्य फारच मोहक आणि तेजःपुंज होतें. त्याचा गदाधर यांचेवर परिणाम होऊन असे कांहीं विचार त्यांच्या मनांत आले,

कीं, त्यायोगें ते लागलीच मूर्च्छित होऊन पडले. कांहीं लोक याला मूर्छा असें ह्मणतात, तर कित्येक ही खरोखरीच समाधि होती, असें समजतात.

गांवांतील लाहा जमीनदाराच्या घरीं एकदां श्राद्धाच्या वेळीं एक परमार्थ-विषयक प्रश्न निघाला. बऱ्याच विद्वान् पंडितांनीं त्या प्रश्नाची पुष्कळ चर्चा केली, तरी त्याचा समाधानकारक निकाल लागेना. या सभेंत एका कोंपऱ्यास बसलेल्या बारातेरा वर्षांच्या गदाधरानें एकदोन गोष्टी आपल्या सोप्या भाषेंत सांगून त्या प्रश्नाचा समाधानकारक निकाल लाविला. त्यामुळें तेथें जमलेल्या सर्व मंडळीस मोठें आश्चर्य वाटलें.

युवावस्था.

खुदिराम चट्टोपाध्याय यांनां तीन पुत्र आणि दोन कन्या अशीं पांच अपत्यें होतीं. सर्व पुत्रांत गदाधर हे लहान होते. ज्येष्ठ पुत्र रामकुमार चट्टोपाध्याय यांची कमरपुकर गांवांत एक पाठशाळा होती. वडील निवर्तल्यावर रामकुमार आपला लहान बंधु गदाधर याला घेऊन कलकत्त्यास आला व तेथें त्यानें आपली पाठशाळा सुरू केली. या वेळीं गदाधर यांचें वय सुमारें सोळासतरा वर्षांचें होतें. ते आपल्या बंधूच्या पाठशाळेंत जाऊन बसूं लागले, पण शिक्षणाकडे त्यांचें मन लागेना. पूर्वीप्रमाणें ते तेथेंहि गांवांत इकडेतिकडे फिरूं लागले. एके दिवशीं त्यांनीं आपल्या बंधूस स्पष्ट सांगितलें, कीं, "केळीं आणि तांदूळ व फार झालें तर कांहीं पैसा मिळविण्याची विद्या शिकण्याचें मला प्रयोजन नाहीं! या जड पदार्थांहून फार श्रेष्ठ वस्तु (देव) ज्या विद्येनें मिळते तिचा–आत्मविद्येचा आपण अभ्यास करणार."

या दिवसानंतर त्यांनीं शाळेंत जाण्याचें अगदीं सोडून दिलें.

कालीमातीचें देवालय.

इसवी सन १८५४।५५ च्या सुमारास जानबाजारची राणी राशमणी या प्रसिद्ध, श्रीमंत आणि धार्मिक बाईनीं गंगातटाकीं दक्षिणेश्वरांत कालीमातचें सुंदर देवालय बांधिलें. रामकृष्णांचे वडील बंधु रामकुमार यांनां तेथील पुजारी नेमण्यांत आलें. राणी राशमणी ही कोळी जातीची असल्यामुळें, देवालयांत कोणी ब्राह्मण व इतर उच्च वर्णांचे लोक भोजनास येणार नाहींत, या शंकेनें देवालयाचे सर्व कागदपत्र तिनें आपल्या गुरूच्या नांवें करविले होते. मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेच्या दिवशीं मोठा उत्सव व भोजनसमारंभ झाला. या दिवशीं आपल्या बंधूबरोबर रामकृष्ण देवालयांत आले आणि शूद्र बाईची नोकरी पत-

करल्याबद्दल आपल्या बंधूची कानउघाडणी करूं लागले. देवालयांत त्या दिवशीं त्यांनीं कांहीं तोंडांत घातलें नाहीं. १५।२० हजार लोकांचें भोजन झालें, पण हे एकटेच उपवासी राहिले! रात्रीं जवळच्या एका वाण्याच्या दुकानांत पैशाच्या लाह्या त्यांनीं घेतल्या व त्या खाऊन ते कलकत्त्यास निघून गेले. एक आठवड्या-नंतर ते पुन्हां बंधुप्रेमामुळें परत आले व देवालयांतच राहूं लागले. प्रथम कांहीं दिवस गंगातटाकीं ते आपल्या हातानें स्वयंपाक करून भोजन करूं लागले. कांहीं महिन्यांनीं त्यांचे बंधु आजारी पडले आणि पूजेचें काम रामकृष्णांच्या अंगावर येऊन पडलें. कांहीं दिवस रामकृष्णांचे दुसरे बंधु रामेश्वर हेहि पूजेचें काम पाहत असत.

**पूजेची तऱ्हा.**

रामकृष्ण देवाची पूजा इतक्या एकाग्रतेनें व तल्लीनतेनें करीत, कीं, ती पाहून लोक फार चकित होत. त्यांनां पूजा करितांना पाहणाराला वाटे, कीं, देवीचें जणू साक्षात् दर्शन यांनां घडतें आहे, अगर स्वत: देवी यांच्यासमोर येऊन पूजा घेत आहे. ते केव्हां केव्हां देवीसाठीं आपल्या हातांनीं फुलांच्या माळा गुंफीत असत, तर कधीं कधीं देवीच्या चरणांवर बिल्वपत्रें व जपापुष्पें अर्पण करून ते फार आनंदित होत असत. काली देवीचें भजन व स्तोत्रें मन लावून ते गात व नेहमीं अशी प्रार्थना करीत, कीं, "हे माते, माझ्यावर दया कर, मला दर्शन दे. मला धन, मान, प्रतिष्ठा वगैरे कांहीं नको. दया कर. माते, माझ्यावर दया कर!"

ज्याच्यावर आपला विश्वास नाहीं तें मुळीं करावयाचें नाहीं, पण जें कांहीं करावयाचें तें अगदीं मन लावून खऱ्या कळकळीनें करावयाचें, असा राम-कृष्णांचा स्वभाव होता. कालीदेवीच्या मूर्तीला ते आपली माता, जगन्माता असें मानूं लागले. ती मूर्ति जीवंत असून आपल्या हातचा नैवेद्य ग्रहण करिते, असें त्यांनां वाटूं लागलें. नेहमींची पूजा आटोपल्यावर ते कालीदेवीच्या मूर्तीसमोर स्तोत्रें गात, प्रार्थना करीत, आणि जसें एकादें मूल आपल्या आईशीं बोलत खेळत असतें, त्याप्रमाणें तिच्याशीं बोलत कित्येक तास राहूं लागले. आपल्या इच्छेप्रमाणें मातेचें दर्शन घडत नाहीं म्हणून तासचे तास ते रडून घालवूं लागले, आणि मग कांहीं केल्यानें त्यांचें समाधान होईनासें झालें.

हा वेडा झाला आहे, असें कांहींजण म्हणूं लागले, तर दुसरे कित्येक हें वेड म्हणजे भक्तीचें चिन्ह आहे, असें मानूं लागले. लग्न केलें असतां हे

निवळतील, असें रामकृष्ण यांच्या मातुःश्रीस आणि बंधूंस वाटून त्यांनीं त्यांनां कमरपुकर येथें नेलें आणि रामचंद्र मुखोपाध्याय नांवाच्या गृहस्थाच्या शारदादेवी नामक पांच वर्षांच्या कन्येशीं त्यांचें लग्न केलें. विवाहसमयीं त्यांचें वय सुमारें २३-२४ वर्षांचें असावें. असें सांगतात, कीं, जेव्हां माता आणि बंधु नवरीचा शोध करूं लागले, तेव्हां अमक्याची कन्या दैवी स्वभावाची आहे, ती माझी पत्नी होण्यास लायक आहे, तिच्याशीं माझा विवाह करावा, असें रामकृष्णांनीं सांगितल्यावरून ते गेले आणि नवरीला शोधून घेऊन आले.

**लग्न.**

लग्न झाल्यावर रामकृष्ण परत दक्षिणेश्वरास आले, आणि पुन्हां कालीमातेचा पिच्छा पुरवूं लागले. पुन्हां त्यांच्या प्रार्थना, त्यांचीं कालीमातेशीं भाषणें इत्यादि प्रकार सुरू झाले. त्यांचें रडणें पूर्वीपेक्षां अधिक जोरानें चालू लागलें आणि त्यांच्या नेत्रांतून एकसारख्या अश्रुधारा वाहूं लागल्या. एकुलतें एक मूल मृत झालें असतां त्याची आईहि असें रुदन व असा शोक करणार नाहीं ! सूर्यास्ताच्या वेळीं रामकृष्ण विरहानें त्रस्त होऊन " माते, हाहि दिवस गेला, तुझें अद्याप दर्शन घडलें नाहीं ! " असें रडून ह्मणत असत. पुष्कळ लोक त्यांचें सांत्वन करण्याची खटपट करीत, पण त्यांचें रडणें ह्मणून थांबत नसे. हा आतां अगदीं वेडा झाला, असें लोक ह्मणूं लागले. मथुरबाबूंचें रामकृष्णांवर बरेंच प्रेम होतें. रामकृष्णांचें हें वेड जावें ह्मणून त्यांनीं कलकत्त्याच्या पुष्कळ नामांकित वैद्यांचीं त्यांना औषधें देऊन पाहिलीं; पण कांहीं गुण दिसेना. डाकाच्या एका वैद्यानें मात्र सांगितलें, कीं, "हा मनुष्य मोठा योगी किंवा तपस्वी आहे. याच्या वेडावर—हें वेड ह्मणजे खरोखर रोग असेल तर—आपल्या औषधाची मात्रा चालणार नाहीं."

**कालीमातेचें दर्शन.**

रामकृष्णांची भक्ति दिवसेंदिवस वाढत चालली. एके दिवशीं तर त्यांनां कालीमातेचा विरह अत्यंत दुःसह होऊन त्यांनीं आत्महत्या करण्याचें मनांत आणिलें, आणि त्याप्रमाणें करण्यास जाणार इतक्यांत त्यांचें देहभान नाहींसें झालें आणि त्यांनां समाधींत देवीचें दर्शन घडलें.

यानंतर त्यांनां देवीचे दृष्टांत ( दर्शनें ) वारंवार होऊं लागले आणि ते बरेच शांत होऊन निवळत चालले. हे दृष्टांत खरे आहेत किंवा कसे, याची त्यांनां केव्हां केव्हां शंका येऊं लागली. तेव्हां अमुक गोष्ट घडली तर हा दृष्टांत खरा, समजेन, असें ह्मणून ते त्या दृष्टान्ताचा पडताळा पाहूं लागले. त्यांनीं ह्मटल्या-

प्रमाणें त्या त्या वेळीं तें तें घडून येऊं लागून दृष्टांतांची सत्यता त्यांनां पटूं लागली. एके दिवशीं श्रीरामकृष्ण ह्मणाले, कीं, " आज दुपारीं राणी राशमणीच्या दोन्ही तरुण मुली या देवालयांत येतील आणि या मोठ्या वडाखालीं उभ्या राहून माझ्याशीं बोलतील, तर मी हे दृष्टांत खरे मानीन आणि ते माझ्या मेंदूचे विकार नाहींत असें समजेन." आश्चर्य हें, कीं, त्या मुली नेमलेल्या वेळीं त्या ठिकाणीं आल्या आणि त्यांनीं रामकृष्णांस हांक मारून ह्मटलें, कीं, "कालीमाता तुझ्यावर दया करील. स्वस्थ हो !" या मुली पडदानशीन (गोषांतील) होत्या. त्या कधीं बाहेर पडत नसत; पण त्या दिवशींच देवालय पाहण्याची त्यांनां उत्कट इच्छा झाली, आणि त्यांनीं तेथें जाण्याची परवानगी मिळविली.

याप्रमाणें त्यांनां वारंवार साक्षात्कार होऊं लागले. आणि बराच वेळ ते समाधींत—ध्यानांत—घालवूं लागले. यामुळें पूजेचें काम त्यांच्या हातून नीट होईनासें झालें. पुढें पुढें तर त्यांची भक्ति इतकी वाढली, आणि कालीमातेशीं ते इतके तन्मय होऊन जाऊं लागले, कीं, पूजेचीं फुलें आपल्याच मस्तकावर ते धारण करूं लागले, आणि आपणच कालीमाता असे समजून देवीचा नैवद्य आपणच घेऊं लागले. प्रथम हा प्रकार मथुरबाबूंनं आवडला नाहीं; पण लगेच त्यांनां रामकृष्ण हे श्रीशंकराच्या स्वरूपानें दिसले, असें सांगतात. तेव्हांपासून ते रामकृष्णांनां ईश्वर असें मानून ' पिताजी ' असें त्यांनां ह्मणूं लागले. पूजेचें सर्व काम त्यांनीं रामकृष्णांच्या हृदय नामक भाच्यावर सोंपविलें, आणि रामकृष्णांनां वाटेल तें करण्यास मुभा दिली.

**साधुसंतांचा समागम, व त्यांचा उपदेश; खडतर तपश्चर्या.**

पुरी आणि जगन्नाथ येथें जाणारे यात्रेकरू, साधुसंत वाटेंत दक्षिणेश्वरांत कांहीं दिवस रहात असत. त्यांचा रामकृष्णांनां वारंवार सहवास घडत असे. साधुसंतांच्या वचनांवर दृढ श्रद्धा, आणि त्यांनीं सांगितल्याप्रमाणें तंतोतंत आचरण हा रामकृष्णांचा विशेष गुण असे. 'कनक आणि कांता हीं विषाप्रमाणें असून ईश्वरप्राप्तींत विघ्न आणतात, याकरितां त्यांचा त्याग केला पाहिजे,' हा उपदेश त्यांच्या मनावर ठसला, आणि ते कनककांता यांच्यापासून अलिप्त राहण्याचे प्रयत्न करूं लागले. एका हातांत कांहीं नाणें व दुसऱ्या हातांत माती घेऊन ते गंगातटाकीं बसत आणि ध्यानस्थ

होऊन ह्मणत कीं, " हे मना ! हा रुपया आहे. यावर राणीचा शिक्का आहे.

**कनक.**

यानें निर्वाहाचे सर्व पदार्थ मिळतील पण सच्चिदानंद परमात्मा मात्र मिळत नाहीं ! तसेच ही माती आहे, जडपदार्थ आहे, यात धान्य उत्पन्न होईल; पण या पदार्थानेंहि सच्चिदानंद परमात्मा कांहीं मिळत नाहीं ! यासाठी रुपया व माती हीं दोन्ही सारखींच आहेत." रुपया माती आहे, माती रुपया आहे, असें ह्मणत ह्मणत दोन्ही पदार्थांची योग्यता सारखी आहे अशी मनाला खात्री पटल्यावर त्यांनीं ते गंगेत फेंकून द्यावेत.

याप्रमाणें त्यांनीं पैशाच्या तिरस्काराचा आपला अभ्यास इतका वाढविला, कीं, कोणी जरी त्यांच्या अंगाला कळत नकळत एकादें नाणें लाविलें, तर त्यांनां थरकांप सुटून लगेच झटके येत. ही गोष्ट पुष्कळदां बऱ्याचजणांनीं अनुभवून पाहिली आहे. नाहीं तर '**समलोष्टाश्मकांचनः**' ( सोनें आणि माती यांनां सारखेंच लेखणारा) याचा, 'सोन्याकरितां जसें आह्मी भांडतों तसेंच एका मातीच्या ढेंकळाकरितांहि भांडूं' असा अर्थ करणारे, व त्याप्रमाणें वागणारे बोलके वेदान्ती आमच्यांत कांहीं कमी नाहीत !

मथुरबाबूंनीं एकदां पन्नास हजार रुपये रामकृष्णांच्या नांवावर कोणत्या तरी कंपनींत ठेवून देण्याचा विचार केला. रामकृष्णांनीं ही गोष्ट नाकबूल केली. यांत कांहीं विशेष नाहीं – आपणास कांहीं एक करावें लागणार नाहीं, असें मथुरबाबूंनीं सांगतांच रामकृष्णांनीं उत्तर दिलें, कीं, "हें सर्व खरें, पण त्यांचा स्वीकार केल्यावर हे रुपय माझे आहेत, असा डाग—ध्यास माझ्या मनाला लागेल !"

**कामिनी.***

कनकाच्या मोहाप्रमाणें कामिनीच्याहि मोहापासून अगदीं अलिप्त राहण्याचा रामकृष्णांनीं बराच अभ्यास केला, व त्यांतहि पूर्ण यश मिळविलें. ते कोणाहि स्त्रीला आपल्याजवळ येऊं देत नसत. आणि एकादे वेळीं जर कोणी स्त्री चुकून जवळ आलीच, तर ते तिला ह्मणत, कीं, "माते, तेथेंच उभी रहा, कृपा करून जवळ येऊं नको !" बायकांनां जवळ येऊं देण्याविषयीं आपणास इतकी भीति कां वाटते, असें ब्राह्मो-गृहस्थ पंडित शिवनाथशास्त्री यांनीं एकदां त्यांना विचारतां ते ह्मणाले " मला फार जबरदस्त धक्का बसेल आणि मी मूर्च्छित होऊन जाईन."

---

* 'कामिनी' किंवा 'कांता' यांचा शब्दशः अर्थ ह्मणजे 'स्त्री' असा घेऊं नये. स्त्रियांनां उपदेश करितांना पुरुषाचा त्याग करावा असें रामकृष्ण सांगत. 'कामिनी' किंवा 'पुरुष' याचा अर्थ कामवासना किंवा विषयलालसा असाच करावा.

रामकृष्णांचा भाचा हृदय, राणी राशमणी व तिचे जामात मथुरबाबु इत्यादिकांनीं रामकृष्णांनां कामिनीच्या मोहांत पाडण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला; पण त्यांत त्यांनां यत्किंचित्‌हि यश न येतां शेवटीं रामकृष्णच विजयी झाले. एकदां ते जगन्मातेला ह्मणाले, कीं, "माते, जर एकादा कुविचार माझ्या मनांत येईल तर मीं माझ्या गळ्यावर सुरी ठेविलीच ह्मणून समज !"

रामकृष्णांचें लग्न झालें होतें, तरी स्वतःच्या पत्नीविषयींसुद्धां त्यांच्या मनांत कामेच्छा उत्पन्न झाली नाहीं. त्यांची पत्नी आपल्या माहेरीं खेडेगांवीं असे. एकदां पंडित शिवनाथशास्त्री जमलेल्या मंडळीस 'रामकृष्णांनीं आपल्या पत्नीकडे दुर्लक्ष्य केलें आहे, विधवेसारखी तिची वस्तुतः स्थिति आहे,' इत्यादि सांगत असतां, रामकृष्णांनीं शिवनाथाला आपल्याजवळ बोलावून त्याच्या कानांत सांगितलें, कीं, "तूं उगीच कां तक्रार करितोस ? तुझें ह्मणणें सर्व व्यर्थ आहे. आतां माझी कामवासना अगदीं नष्ट झाली आहे." दुसऱ्या एका प्रसंगीं शिवनाथ अशीच टीका करीत होते. ब्रह्मसमाजांत स्त्रियांचा समावेश होतो, स्त्रियांनां शिक्षण आणि स्वातंत्र्य देण्याची ब्राह्मधर्मांत मुभा आहे, ब्राह्मधर्म हा सामाजिक आणि प्रापंचिक आहे, इत्यादि ते सांगत होते. आपल्या ठरलेल्या कल्पनेच्याविरुद्ध आपल्यासमोर चाललेलें भाषण ऐकून रामकृष्ण थोडेसे चिडले आणि ह्मणाले "मूर्खांनों, चालते व्हा आणि स्त्रियांनीं तुह्मांकरितां तयार केलेल्या गर्तेंत ( खळग्यांत ) जाऊन पडा." नंतर शिवनाथाकडे टक लावून ते ह्मणाले "हें पहा, माळी लहान रोपटें लावीत असतांना गाईनां व बकऱ्यांनां खातां येऊं नये ह्मणून त्या रोप्याभोंवतीं तो कुंपण घालीत नाहीं काय ? तोच रोपा वाढून त्याचा मोठा वृक्ष झाल्यावर तो तें कुंपण काढून टाकून त्या वृक्षाला मोकळें सोडून स्वच्छंदपणें वाढूं देत नाहीं काय ?"

शिवनाथ ह्मणाले "होय. माळी असें करितात खरें."

रामकृष्ण ह्मणाले "तुमच्या आध्यात्मिक उन्नतीविषयीं तुह्मी तसेंच करा. प्रथमारंभीं स्त्रियांचा संसर्ग टाळा. प्रथम बलवान आणि पूर्ण व्हा, नंतर स्त्रियांनां पाहिजे तर जवळ येऊं द्या."

शिवनाथ ह्मणाले "जनावरांप्रमाणें स्त्रियांचें काम आमच्या आध्यात्मिक उन्नतीचा नाश करण्याचें आहे हें मत मला मान्य नाहीं. आध्यात्मिक उन्नतीच्या आणि सामाजिक सुधारणेच्या कामीं स्त्रिया आमच्या सहचारिणी आणि साथीदार आहेत."

रामकृष्णांनां हें मत न आवडल्यामुळें मान हालवून त्यांनीं आपली नापसंती दर्शविली व संध्याकाळ बरीच झाली होती हें पाहून ते थट्टेनें ह्मणाले "आतां आपण येथून निघण्याची वेळ झाली आहे. सांभाळा, उशीर करूं नका. नाहीं तर तुमची सहचारिणी तुह्मांला आपल्या खोलींत घेणार नाहीं."

हें ऐकून तेथें जमलेली सर्व मंडळी पोट धरून हंसली.

**अहंकार.**

अहंकाराचा त्याग करून अत्यंत नम्र व्हावें, असाहि उपदेश रामकृष्णांनीं ऐकिला. लागलींच ते अहंकाराला मारून टाकण्याच्या उद्योगास लागले. "हे माते, माझ्या अहंकाराचा नाश कर, मी सर्वांत दीन आहें असा भाव नेहमीं माझ्या मनांत राहूंदे," अशी प्रार्थना ते करूं लागले, आणि नुसत्या प्रार्थनेंतच संतुष्ट न राहतां हातानें ते तशी कृतिहि करूं लागले. रात्रौ शौचकूपांतील भांडीं चोरून गंगातटाकीं न्यावीं, व त्यांतील मळ टाकून देऊन तीं धुऊन पुन्हां शौचकूपांत ठेवावीं. हें काम त्यांनीं कांहीं दिवस केलें. लोकांच्या नजरेस आल्यावर त्यांनीं हा प्रकार बंद करविला. तसेंच अंत्यजांच्या घरीं जाऊन त्यांच्या अंगणांत झाडलोट करणें, कालीवाडींत भिकाऱ्यांच्या उष्ट्या पत्रावळी काढून टाकणें, इत्यादि कामेंहि त्यांनीं कांहीं दिवस केलीं; आणि अशा रीतीनें त्यांनीं आपल्या अहंकारास नाहींसें करून टाकिलें.

**खरी कळकळ.**

रामकृष्णांनीं आचरिलेल्या उपायांपेक्षां अधिक चांगले उपाय नाहींत, असें नाहीं. कोणा मनुष्यानें कोणत्या उपायाचें अवलंबन केलें, ही महत्त्वाची गोष्ट नव्हे. तर त्याचे प्रयत्न खऱ्या आस्थेनें व कळकळीनें झाले पाहिजेत व त्याला तीव्र मुमुक्षा असली पाहिजे, ह्मणजे झालें. साधुसंत जें कांहीं सांगतील त्याप्रमाणें तंतोतंत वागण्याचें रामकृष्णांस माहीत होतें. कांहीं तरी क्लृप्ति काढून साधुसंतांच्या वचनांचा अर्थ फिरविणें, आणि त्यांतून बाहेर निसटून जाण्याचे प्रयत्न करणें, हा 'शहाणपणाचा' उर्फ चित्तशाठयाचा मार्ग त्यांनां माहीत नव्हता. ईश्वराच्या मर्जीनुरूप राजी राहणें असेल तर हनुमानाप्रमाणें आपली वृत्ति असावी, असें एका साधूनें सांगितलें. लगेच मारुतिरायाच्या वृत्तीचा अभ्यास करण्याचें रामकृष्णांनीं सुरू केलें. त्यांनीं एक शेंपूट तयार करवून तें लावून घेतलें, आणि स्वतःस कांहीं दिवस खोलींत कोंडून घेऊन 'रामा मी तुझा दास आहें' असें ह्मणून ते उड्या मारीत राहिले.

याशिवाय आहार व निद्रा यांविषयीं बरेच कडक नियम त्यांनीं पाळिले. कित्येक दिवस त्यांनीं एकसारखा उपवास केला, आणि कांहीं जागरणें केलीं. या सर्व उग्र तपस्येचा परिणाम असा झाला, कीं, त्यांची शरीरप्रकृति फार बिघडली, त्यांच्या घशांत व्रण पडला, आणि त्यांनां मज्जातंतूचा एक विकार जडला. कोणताहि मनोविकार प्रबल झाला किंवा क्षोभाचें कांहीं कारण घडलें, कीं, लगेच त्यांचें देहभान नाहींसें होई आणि चेहरा तेजःपुंज होऊन आंतील क्षुब्धता दर्शवी. अशा तऱ्हेची स्थिति भाविक व नाजुक मनोवृत्तीच्या व्यक्तींनां केव्हां केव्हां प्राप्त होते; पण चैतन्य, महम्मद आणि रामकृष्ण यांच्यासारख्या पुरुषांनां ही अवस्था नेहमीं जडलेली असते. या अवस्थेला इतर लोक मज्जातंतूचा विकार असें नांव देतात; पण धार्मिक व अनुभविक लोक तिला **भावावस्था** असें ह्मणतात.

या तीव्र तपस्येच्या दिवसांत रामकृष्णांनां खाणें जेवणें इत्यादि बाह्य गोष्टींची विशेषशी स्मृति नसे. त्यांचा भाचा हृदय हा त्या वेळीं त्यांची काळजी घेत असे, व केव्हां केव्हां अन्न भरवीत असे. एकदां पंडित शिवनाथशास्त्री व कांहीं श्रीमंत लोक रामकृष्णांनां भेटण्यास आले होते. मध्येंच कांहीं कामाकरितां रामकृष्ण उठून बाहेर गेले, तेव्हां हृदय सर्वांना सांगूं लागला, कीं, रामकृष्णांची देवाची भक्ति इतकी वाढलेली आहे, कीं, त्यांनां बाह्य जगाची पुष्कळदां स्मृति नसते. इतक्यांत रामकृष्ण परत आले आणि त्यांनीं हृदयचें अर्धेंमुर्धें भाषण ऐकिलें. त्याबरोबर ते हृदयला रागें भरून ह्मणाले, कीं, "तूं हलकट झाला आहेस! या श्रीमंतांसमोर तूं माझी स्तुति चालविली आहेस. त्यांचे ऐटदार कपडे, सोन्याचीं घड्याळें आणि सांखळ्या तुझ्या डोळ्यांत भरून त्यांच्याकडून पैसे उपटण्याचा तुझा बेत दिसतो!" नंतर त्या श्रीमंतांकडे वळून ते ह्मणाले " मित्रांनों, माझ्याविषयीं हृदयनें सांगितलेलें खरें नाहीं! मला बाह्य जगाची विस्मृति पडली, ती ईश्वराच्या भक्तीमुळें नव्हे, तर येथें आलेल्या साधूंच्या ह्मणण्याप्रमाणें मीं अक्षरशः वागण्याचा प्रयत्न केला आणि त्यामुळें माझें मन थोडेंसें बिघडलेलें आहे." ही त्यांची सत्योक्ति ऐकून सर्वांनां मोठें आश्चर्य वाटलें, आणि शिवनाथांचा त्यांच्याविषयींचा प्रेमादरभाव अतिशय वाढून त्यांची अशी खात्री झाली, कीं, अशी तीव्र मुमुक्षा असलेला आणि ईश्वरप्राप्तीसाठीं इतके कष्ट व त्रास सोसलेला असा दुसरा प्राणीच आपण पाहिला नाहीं, व आतां साधकदशा संपून यांनां सिद्धदशा प्राप्त झाली आहे.

**ब्राह्मणी.** यानंतर सर्वशास्त्रज्ञ अशी एक ब्राह्मणी तेथें आली. तिचें पांडित्य पाहून वैष्णवचरणसारखे पंडितहि आश्चर्य पावले. रामकृष्ण वेडा झाला आहे, असें बहुतेक लोक मानूं लागले होते. या ब्राह्मण स्त्रीनें रामकृष्णाला पाहिल्याबरोबर सांगितलें, कीं, हा वेडा नाहीं, परमभक्त आहे. याला जे जे विकार झालेले दिसतात तीं सर्व भावावस्थेचीं लक्षणें आहेत, आणि हेच विकार श्रीचैतन्यालासुद्धां झालेले होते. ती रामकृष्णाला ह्मणाली "बेटा, हें तुझें वेड नव्हे. तुझ्यासारखे कांहीं अधिक वेडे या जगांत असते तर किती चांगलें झालें असतें! हें जग ह्मणजे वेड्यांचें एक मोठें हास्पिटल आहे. येथें कोणी धनासाठीं तर कोणी स्त्रीसाठीं, कोणी मानासाठीं तर कोणी कीर्तीसाठीं हपापलेले, बहुतेक लोक ईश्वराशिवाय इतर क्षुल्लक गोष्टींसाठीं वेडे झालेले आढळून येतात. प्रत्येकाला आपलेंच वेड चांगलें वाटतें. धनार्थी वेडा ह्मणतो, कीं, पैसा मिळविणारा आणि त्याकरितां खटपट करणारा मनुष्यच खरा शहाणा, बाकी इतर सर्व खुळे! खुळ्यांनांहि वाटतें, कीं, आपण तेवढे शहाणे आणि इतर लोक वेडे आहेत. अशी सर्वत्र स्थिति असल्यामुळें ईश्वराकरितां वेडा झालेला मनुष्य लोकांनां कसा समजणार? अशा भक्ताला हा वेडा झाला, याचें डोकें फिरलें आहे, असें लोक ह्मणणारच. याकरितां लोक कांहीं ह्मणोत, तुझेंच वेड बरोबर आहे." ही ब्राह्मणी दक्षिणेश्वरांत बरेच दिवस राहिली आणि तिनें रामकृष्णांचे सर्व विकार बरे केले, व त्यांनां योगाभ्यासाची माहिती सांगितली. रामकृष्णांनीं अष्टांग योगाचें साधन सुरू केलें आणि त्या ब्राह्मणीला जितकें कांहीं शिकवितां आलें तितकें सर्व कांहीं ते शिकले.

**तोतापुरी.** कांहीं दिवस गेल्यानंतर तोतापुरी नांवाचे एक सिद्ध पुरुष तेथें आले. रामकृष्णांनां आणखी अधिक शिकण्याची हांव होतीच. तोतापुरीनें त्यांनां निर्विकल्प समाधी कशी लावावी हें शिकविलें, आणि रामकृष्णांनीं तें अवघ्या तीनच दिवसांत साध्य केलें. हें पाहून तोतापुरी आश्चर्यानें ह्मणाले, कीं, "बेटा, मला चाळीस वर्षांनीं जें साध्य झालें तें तूं अवघ्या तीनच दिवसांत केलेंस. तुला आतां मी माझा शिष्य ह्मणत नाहीं, तूं माझा मित्र आहेस!" तोतापुरीचें रामकृष्णांवर इतकें प्रेम जडलें, कीं, एका क्षेत्रांत तीनच दिवस राहण्याचा आपला नियम मोडून ते तेथें अकरा महिने राहिले, व त्या आपल्या शिष्यापासूनहि कांहीं गोष्टी शिकले. तोतापुरी धुमी पेटवीत आणि तिला फार पवित्र मानीत. एकदां

एका मनुष्यानें त्या धुमींतील विस्तव घेऊन आपली चिलीम पेटविली. हें पाहून तोतापुरी फारच क्रुद्ध झाले. तेव्हां रामकृष्ण शांतपणें ह्मणाले "ब्रह्मन् ! सर्व कांहीं ब्रह्म आहे हें आपण असेंच पहातां काय ? हा मनुष्य आणि विस्तव हे दोन्ही ब्रह्म नाहींत काय ? ज्ञान्याच्या दृष्टीनें उच्च आणि नीच असें काय आहे ? "

तोतापुरी मनांत समजले आणि ह्मणाले " भाई, तुझें ह्मणणें बरोबर आहे, मी यापुढें केव्हांहि रागावणार नाहीं." आणि यापुढें त्यांनीं तें आपलें वचन पाळिलें.

तोतापुरी ज्ञानी असल्यामुळें रामकृष्णांची जगन्मातेविषयींची भक्ति त्यांनां नीट समजेना. हा धर्मभोळपणा आहे, असें ह्मणून ते रामकृष्णांची थट्टा करीत असत. रामकृष्णांनीं त्यांनां आपल्या भक्तीचें स्वरूप नीट समजावून सांगितलें. तोतापुरींनीं रामकृष्णांनां संन्यास दिला आणि ' **परमहंस** ' असें त्यांनां प्रथम पुकारिलें.

तोतापुरी निघून गेल्यावर रामकृष्ण परमहंसांनीं निर्विकल्प समाधीचा अभ्यास चालविला. कित्येक महिने ते त्या समाधींतच रहात असत. त्यांनां समाधींतून उतरविण्यास आणि त्यांच्या तोंडांत अन्नपाणी घालण्यास फारच खटपट करावी लागे. सहा महिन्यांनंतर त्यांच्या शरीराला बराच त्रास होऊन त्यांनां अतिसाराचा विकार जडला. या विकारानें एकदोन महिन्यांत ते देहभानावर आले. अतिसाराचा उपद्रव बरा झाल्यावर त्यांनां वैष्णवी भक्तीचा नाद लागला. स्त्रीसारखा वेष धारण करून श्रीकृष्णाचा साक्षात्कार करून घेण्याचे प्रयत्न त्यांनीं चालविले आणि त्यांतहि त्यांनां यश मिळालें.

**इतर धर्मांचा अनुभव.**

नंतर त्यांनीं पंचनामी, बाउल, शीख, मुसलमानी इत्यादि धर्मांच्या पंथांप्रमाणें अनुष्ठान करण्याचें सुरू केलें. त्या त्या धर्मांचा कोणी तरी सिद्ध पुरुष येऊन त्यांनां भेट देई, आणि त्याचें अनुष्ठान कितीहि कठीण असलें तरी तें तीनचार दिवसांत पुरें होई. सर्व सामुग्रीचा मेळ कसा अवचित जुळून येई, हें मोठें आश्चर्यच आहे. एकदां तर असें झालें, कीं, रामकृष्ण पंचवटीच्या* वृक्षाखालीं निवांत ठिकाणीं बसले असतांना तेथें साधन करण्यासाठीं एक लहान कुटिका तयार करावी, असें त्यांच्या मनांत आलें. तोंच भरती-

* वट, अंजिर, पिंपळ, निंब, आमलकी ( आंवळा ) आणि बेल हीं झाडें रामकृष्णांच्या इच्छेप्रमाणें कालीवाडींत एके ठिकाणीं लाविलेलीं होतीं. त्या वृक्षांच्या समुदायाला पंचवटी असें ह्मणतात.

बरोबर कुटिकेचें सर्व सामान वाहून आलें. लगेच माळ्याच्या साहाय्यानें त्यांनीं तेथें एक लहानशी कुटिका बांधिली. प्रसिद्ध दानशूर गृहस्थ शंभुचरण मलिक यांच्यापासून त्यांनीं बायबलाचा पाठ ऐकिला, आणि ख्रिस्ती धर्माप्रमाणें अनुष्ठान करण्याचें मनांत आणिलें. त्या वेळीं ते येशु ख्रिस्ताशिवाय दुसरा कांहीं विचार करीत नसत, आणि दुसरें कांहीं बोलत नसत. शेवटीं त्यांनां ख्रिस्ताचाहि साक्षात्कार झाला, असें ह्मणतात. त्यांच्या साक्षात्कारांमध्यें हा एक विशेष असे, कीं, त्यांनां ते ते दिव्य पुरुष ( राम, शिव, काली, कृष्ण, ख्रिस्त इत्यादि ) आपल्याबाहेर दिसत, आणि ते गुप्त झाले ह्मणजे त्यांच्या आंत शिरत.

याप्रमाणें अनुभव घेऊन त्यानीं आपलें असें मत ठरविलें, कीं, सर्व धर्म खरे आहेत; प्रत्येक धर्म सच्चिदानंद प्रभूच्या कांहीं गुणधर्मांचा विचार करितो; प्रत्येक धर्म त्या प्रभूकडे जाण्याचा निरनिराळा मार्ग आहे.

**पवित्र माता श्रीशारदादेवी.**

या इतक्या वर्षांत आपलें लग्न झालेलें आहे, ही गोष्ट ते अगदीं विसरले होते. स्वतःच्या देहाचीसुद्धां त्यांनीं पर्वा केली नाहीं, मग इतर गोष्टींची वास्तपूस कोण करितो ? त्यांच्या पत्नीचें वय या सुमारास सतराअठरा वर्षांचें झालें होतें. आपला नवरा वेडा झाला आहे असें कांहींजणांकडून तिनें ऐकिलें, तर दुसऱ्या कित्येकांनीं तिला सांगितलें, कीं, तो ईश्वराचा परमभक्त झालेला आहे. खरा प्रकार काय आहे हें स्वतः पहावें ह्मणून आपल्या मातेची परवानगी घेऊन शारदादेवी दक्षिणेश्वरीं चालत आल्या. श्रीरामकृष्णांनीं तिचें स्वागत केलें, पण तिला स्पष्ट सांगितलें, कीं, " जुना रामकृष्ण मेला आणि आतांचा नवा रामकृष्ण प्रत्येक स्त्रीला माता असें लेखतो. कितीहि प्रयत्न केला तरी काली मातेशिवाय तुझ्यांत दुसरें मला कांहीं दिसत नाहीं ! " असें ह्मणून त्यांनीं तिला " माते !" अशी हांक मारिली, तिच्या मस्तकावर फुलें ठेवून तिची पूजा केली, आणि लेंकराप्रमाणें ते तिचा आशीर्वाद मागूं लागले आणि समाधिस्थ झाले.

शारदादेवी आपल्या पतीप्रमाणेंच खंबीर होत्या.त्या ह्मणाल्या "पति या नात्यानें मी आपल्यापासून कांहीं इच्छीत नाहीं; पण आपल्यापाशीं राहून आपली सेवा करण्याची परवानगी द्यावी. आपण ईश्वराच्या प्राप्तीचा मार्ग मला दाखवावा."

त्या दिवसापासून त्या तेथेंच राहिल्या, आणि श्रीरामकृष्णांची सेवा करून ते सांगतील तसें अनुष्ठान करूं लागल्या. मथुरबाबूनें शारदादेवींनां एकदां दहा हजार रुपये देऊं केले, तेव्हां त्यांनीं सांगितलें, कीं, "सुवर्ण आणि सर्व ऐहिक सुखें यांनां

झुगारून आपल्या पतीनें पूर्णता मिळविली आहे, आपणहि त्याच मार्गाचें अनुकरण करणार."

यानंतर कांहीं दिवसांनीं मथुरबाबू सकुटुंब यात्रेस निघाले. परमहंसांनांहि त्यांनीं बरोबर घेतलें. वृंदावनपर्यंत त्यांनीं यात्रा करून पुष्कळ देवालयें पाहिलीं, आणि पुष्कळ साधुसंतांचें—विशेषतः काशीचे तैलंगस्वामी आणि वृंदावनची गंगामाता यांचें दर्शन घेतलें. यात्रेंत त्यांनीं मथुरबाबूकडून बराच दानधर्म करविला.

**श्रीरामकृष्णांची प्रसिद्धि.**

'गुलाबाची कळी उमलली ह्मणजे भ्रमर आपोआप तिच्याकडे धांवत येतात,' या ह्मणीचा अनुभव आतां येऊं लागला. ब्रह्मानंद केशव चंद्र सेन हे १८७५।७६ च्या सुमारास दक्षिणेश्वराहून तीन मैलांवर असलेल्या बेलगडिया बागेंत एकांतवासाकरितां राहिले होते. त्यांनां भेटण्यास श्रीरामकृष्ण गेले. प्रथम ते इतके साधे आणि नम्र दिसले, कीं, त्यांच्याकडे फारसें कोणाचें लक्ष्य गेलें नाहीं. पण त्यांचें उदात्त, सुंदर आणि मधुर भाषण ऐकून ब्रह्मानंद केशवचंद्रसेन, प्रतापचंद्र मुझुमदार इत्यादि सर्वजण मोहित होऊन गेले. त्यानंतर ब्रह्मानंद केशवचंद्र दक्षिणेश्वरीं श्रीरामकृष्णांनां भेटण्यास येऊं लागले, व श्रीरामकृष्णहि त्यांच्याकडे जाऊं लागले. याप्रमाणें या दोघां सत्पुरुषांमध्यें सख्य व प्रेम वाढूं लागलें. ब्रह्मानंद केशवचंद्र यांनीं श्रीरामकृष्णांच्या उपदेशांतील कांहीं भाग छापून प्रसिद्ध केल्यावर कलकत्त्यांतील बडे बडे लोक श्रीरामकृष्णांच्या दर्शनास आणि त्यांचा उपदेश ऐकण्यास येऊं लागले.

नरेंद्र ( स्वामी विवेकानंद ) आणि श्रीरामकृष्णांचे इतर प्रिय शिष्य १८७९ ते १८८२ च्या अवधींत आले. कोणाची आध्यात्मिक उन्नति किती झाली आहे, हें श्रीरामकृष्णांनां लवकर समजत असे. त्यांनां पुष्कळ सिद्धि प्राप्त झाल्या तरी त्यांनीं त्यांचा कांहीं उपयोग करून घेतला नाहीं. सिद्धि ह्मणजे मोक्षमार्गातील विघ्नें आहेत, असें ते ह्मणत असत. एका सिद्धीचा मात्र ते वारंवार उपयोग करीत. नुसत्या स्पर्शाच्या योगानें ते मनुष्याचे विचार बदलून टाकीत असत. कित्येकांनां त्यांच्या स्पर्शानें समाधि लागे आणि त्यांनां बाह्यजगाचें ज्ञान नाहींसें होऊन देवदेवतांचें दर्शन घडे. दुसऱ्या कित्येकांनां त्यांच्या स्पर्शानें आपल्या विचारांत एक नवीन क्रांति झाली आहे, आणि आपलें आध्यात्मिक उन्नतींत एक पाऊल

पुढें पडलें आहे, असें वाटे. कांहीं स्त्रियाहि त्यांच्या शिष्यवर्गांत होत्या. त्या सर्वांनां ते काली मातेचे अवतार समजून माता* अशी हांक मारीत.

ब्रह्मसमाजाचे लोक, कलकत्त्यांतील दुसरे विद्वान् लोक आणि इतर स्त्रिया व पुरुष यांच्या झुंडीच्या झुंडी श्रीरामकृष्णांच्या दर्शनास येऊं लागल्या. श्रीरामकृष्ण सर्वांशीं मोठ्या प्रेमानें बोलत आणि त्यांनां योग्य उपदेश करीत. अहोरात्र बोलण्याचें आणि उपदेश करण्याचें काम एकसारखें चालू असे. भक्तीविषयीं सांगतांना झोंप वगैरे सर्व कांहीं ते विसरून जात. त्यांची शरीरप्रकृति बिघडत चालली तरी त्यांचें उपदेशाचें काम थांबेना! यामुळें १८८५ च्या सुमारास त्यांचा घशांतील विकार बळावत चालला. त्यांनां दक्षिणेश्वराहून कलकत्त्यांत नेण्यांत आलें, व बाबु महींद्रलाल सरकारसारख्या नामांकित डॉक्टरांचें औषध देण्यांत आलें. कांहीं न बोलतां श्रीरामकृष्णांनीं स्वस्थ रहावें, असें डॉक्टरांनीं पुष्कळ सांगितलें; पण हें कांहीं श्रीरामकृष्णांच्या हातून होईना! पुष्कळ दूरदूरचे लोक त्यांच्या मुखांतून कांहीं तरी ऐकावें ह्मणून धांवून येत, आणि श्रीरामकृष्ण त्यांच्यावर दया करून उपदेश करूं लागत. उपदेश करितां करितां पुष्कळदां देहभान जाऊन त्यांची समाधि लागे, आणि समाधि उतरतांच ते पूर्वीप्रमाणें एकसारखें बोलूं लागत, यामुळें त्यांनां फार त्रास होई आणि त्यांचा विकार फार असह्य होई. कांहीं दिवसांनीं त्यांच्या घशांतून पातळ अन्न किंवा पाणीहि खालीं जाईनासें झालें, तरी त्यांचें बोलण्याचें आणि उपदेश करण्याचें काम कांहीं केल्या बंद होईना! शेवटीं तारीख १६ आगष्ट १८८६ रोजीं १० वाजतां त्यांनां समाधि लागली आणि त्या समाधींतून ते पुन्हां देहभानावर आलेच नाहींत!

**शेवटची समाधि.**

श्रीरामकृष्णांनीं आपल्या पत्नीस चांगल्या रीतीनें वागविलें नाहीं, उलट त्यांची तिच्याशीं वागणूक निर्दयपणाची होती, या पंडित शिवनाथ आणि प्रतापचंद्र मुझुमदार इत्यादिकांच्या आक्षेपाला प्रोफेसर मॅक्स मुल्लरसाहेबांनीं पुढील उत्तर दिलेलें आहे. ते ह्मणतात "शारदादेवीनें पत्नीचें नातें सोडून शिष्याच्या नात्यानें राहण्याचें

**रामकृष्ण आणि शारदादेवी.**

* स्त्रियांनां माता मानणे ही कल्पना पाश्चिमात्त्य कल्पनेच्या विरुद्ध आहे ही आर्यांची राष्ट्रीय कल्पना आहे. स्त्रीवर्गाला माता मानिल्यावांचून कोणीहि पूर्णतेस पोहोंचणार नाहीं, असा आर्यांचा सिद्धांत आहे.

खुषीनें कबूल केलें होतें. शिवाय, श्रीरामकृष्णांनीं तिला चांगल्या रीतीनें वागविलें. श्रीरामकृष्णांनीं सन्यस्तवृत्तीनें रहावें अशी तिनें कबुली दिल्यापासून ती त्यांची मित्र झाली, आणि तिला नेहमीं उपदेश मिळूं लागला. जरी ती अपत्यसुखास मुकली, तरी ती आध्यात्मिक दृष्टीनें पुष्कळांची माता झाली, आणि तिला लोकहि 'पवित्र माता' असें संबोधूं लागले." मॅक्स मुल्लरसाहेब पुढें ह्मणतातः– "शारदादेवीनें संन्यासिनी या नात्यानें त्यांच्यापाशीं राहण्याचा निश्चय केला, याला मुझुमदारसारख्या विद्वान् व अनुभवी गृहस्थांनीं छळ किंवा निर्दयपणाची वागणूक ह्मणणें, हें विलक्षण आहे. तिला स्वतःला असें कांहीं वाटलें नाहीं, व श्रीरामकृष्णांनीं तिला कोणताहि त्रास दिला असें ऐकिवांत नाहीं. तिला जर आपल्या स्थितींत समाधान वाटलें, तर दुसऱ्याला तकरार करण्यास कोठें जागा आहे? आणि प्रजोत्पादनाशिवाय पति आणि पत्नी यांमध्यें प्रेम असणें अशक्य आहे काय? विलायतेंत अशा बाबतींत आह्मी कितीहि साशंक असलों, तरी हिंदूंच्या प्रामाणिकपणावर आह्मीं विश्वास ठेविला पाहिजे. तें कसेंहि असो, या आध्यात्मिक लग्नाबद्दल दुसरे कोणी नाखुष झालेले मला माहीत नाहींत."

**रामकृष्ण आणि ब्रह्मसमाज.**

ब्रह्मसमाजाचे आचार्य आपल्या शिष्यांसहित श्रीरामकृष्णांस भेटण्यास येत असत, आणि श्रीरामकृष्णहि त्यांनां भेटण्यास जात असत. महर्षि देवेंद्रनाथ टागोर यांची आणि श्रीरामकृष्णांची भेट झाली होती, आणि आदि ब्रह्मसमाजांत उपासना चालली असतां तेथें श्रीरामकृष्ण एकदां गेले होते. तसेंच ब्रह्मानंद केशवचंद्र सेन यांच्या देवालयांत आणि साधारण ब्रह्मसमाजांतहि उपासनेच्या वेळीं ते गेले होते. केशवचंद्र सेन यांच्या घरीं ते केव्हां केव्हां जात आणि केशवचंद्र सेनहि दक्षिणेश्वरांत यांचा उपदेश ऐकण्यास वारंवार येत, किंवा यांनां आगबोटींतून सहल करण्यास घेऊन जात. श्रीरामकृष्ण आणि केशवचंद्र सेन यांच्यामध्यें परस्परांविषयीं बराच प्रेमादरभाव असे; पण पुढें दोघांच्या अनुयायांमध्यें बराच लढा पडला. श्रीरामकृष्णांचे अनुयायी ह्मणूं लागले, कीं, केशव चंद्र सेनानें श्रीरामकृष्णांस गुरु मानून त्यांची पूजा केली, व केशवचे अनुयायी ह्मणूं लागले, कीं, श्रीरामकृष्णांची प्रसिद्धि केशवनेंच केली. पण या दोघांच्याहि ह्मणण्यामध्यें विशेष अर्थ नाहीं, असें मॅक्स मुल्लरसाहेब ह्मणतात. कारण, केशवानें श्रीरामकृष्णांला गुरु असें मानलें असतें तर त्यानें तसें कबूल केलें असतें, आणि पुष्कळदां शिष्यच (उदाहरणार्थ स्वामी विवेकानंद), गुरूची प्रसिद्धि करीत नाहींत काय? खरी गोष्ट अशी

दिसते, कीं, श्रीरामकृष्णांला केशवानें गुरु असें मानलें नाहीं, पण त्यांच्या उपदेशाचा केशवावर पुष्कळ परिणाम झाला. श्रीरामकृष्णांप्रमाणें केशवहि ईश्वराला माता असें संबोधूं लागला आणि त्यांच्याप्रमाणें तोहि मातेशीं बोलूं लागला. मूर्तिपूजेविषयीं केशवाचें मत बदलून मूर्तिपूजेंतहि ग्राह्यांश आहे, असें त्यानें जाहीर केलें.[1]

श्रीरामकृष्णांनीं प्रत्येक पंथांतून चांगलीं तत्त्वें–गोष्टी निवडून काढून आपला उपदेश सर्वांगसुंदर बनविला होता. केशवाच्या 'नवसंहितें'त ( New Dispensation ) या सारात्मक तत्वज्ञानपद्धतीची बरीच छटा दिसून येते.

श्रीरामकृष्णांचें आध्यात्मिक ज्ञान कसें होतें, त्यांचा आपपरभाव कसा पूर्ण नाहींसा झाला होता, आणि ते सर्वांना कसा उपदेश करीत असत, हें खालीं दिलेल्या कांहीं गोष्टींवरून चांगलें कळतें.[2]

[ १ ]

**रामकृष्ण आणि ख्रिस्ती मिशनरी.**

भवानीपुर येथील एक ख्रिश्चन उपदेशक पंडित शिवनाथशास्त्री यांच्याबरोबर श्रीरामकृष्णांला भेटण्यास आला. शिवनाथशास्त्री यांनीं त्याची ओळख करून देतांना सांगितलें, कीं, "हे ख्रिस्ती उपदेशक आहेत आणि माझ्याकडून आपल्याविषयीं ऐकून आपली भेट घेण्याकरितां आले आहेत."

यावर रामकृष्ण आपलें डोकें जमिनीवर ठेवून ह्मणाले "मी येशूला वारंवार प्रणाम करितों."[3]

---

1 "Hindu Idolatry is not altogether to be rejected or overlooked. As we explained sometime ago, it represents millions of broken fragments of God. Collect them together and you get the indivisioble Divinity. &c. &c," Keshab's life and Teachings by P. C. Muzumdar, Thacker Spink & Co,s edition. P. 215.

२ यांपैकीं दहावी गोष्ट महेंद्राच्या बोधामृतांतली व बाकीच्या पंडित शिवनाथशास्त्री यांनीं सांगितलेल्या आहेत.

३ दक्षिणेश्वरीं श्रीरामकृष्णाच्या खोलींत, हिंदु देवता, भगवान बुद्ध इत्यादिकांचीं चित्रें होतीं; इतकेंच नव्हे, तर येशु ख्रिस्ताचेंहि चित्र लाविलेलें होतें. या चित्रांत, बुडणाऱ्या पिटर नामक आपल्या शिष्याला येशू वर काढीत आहे, आणि वादळ शांत करीत आहे, असे दाखविलें आहे. हें चित्र अद्याप त्यांच्या खोलींत पहाण्यास सांपडतें.

नंतर दोघांमध्यें पुढील संभाषण झालें.

मिशनरी ह्मणाले "आपण येशूला प्रणाम करितां हें कसें ? त्यांच्याविषयीं आपलें काय मत आहे ?"

श्रीरामकृष्ण ह्मणाले "कां, मी त्यांनां देवाचा अवतार मानतों."

"देवाचा अवतार ! आपल्या ह्मणण्याचा काय अर्थ आहे हें अधिक स्पष्ट करून सांगाल काय ?"

"आमच्या रामाप्रमाणें किंवा कृष्णाप्रमाणें अवतार असें मी मानतों. भागवतांत विष्णूचे ह्मणजे देवाचे अनंत अवतार आहेत असें सांगितलें आहे, हें आपणास माहीत नाहीं काय ?"

"कृपा करून अधिक स्पष्ट करून सांगा. मला तें बरोबर समजत नाहीं."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "आपण समुद्र पाहिला आहेना ? समुद्र ह्मणजे पाण्याचा अनंत विस्तार होय. कांहीं ठिकाणच्या विशिष्ट परिस्थितीमुळें—कारणामुळें या समुद्राचे कांहीं भाग थिजून जातात आणि त्यांचें बर्फ बनतें. बर्फ नंतर हातांत घेतां येतें आणि कांहीं कामाकडे त्याचा उपयोग होतो. अवतार ह्मणजे कांहींसें यासारखें आहे. सागराच्या अनंत विस्ताराप्रमाणें परमात्मा सर्व जगतांत भरून राहिला आहे. पण कांहीं विशेष कारणांकरितां* ती परमात्मशक्ति मूर्तस्वरूप धारण करिते. या स्वरूपालाच तुह्मी महात्मा असें ह्मणतां, पण वस्तुतः हें त्या परमात्म्याचें व्यक्त स्वरूप ह्मणजे अवतार आहे. मनुष्याचा मोठेपणा हा तत्त्वतः त्या दिव्य शक्तीचें व्यक्त स्वरूप होय."

"आतां आपलें ह्मणणें मी बरोबर समजलों. आह्मांला हें पूर्ण मान्य नाहीं. (शिवनाथाकडे वळून) यावर आमच्या ब्राह्मो मित्राचें काय ह्मणणें आहे ?"

श्रीरामकृष्ण ह्मणाले "त्या मूर्खोविषयीं (ब्राह्मोंविषयीं) बोलूं नका ! या गोष्टी पाहण्याला त्यांनां डोळेच नाहींत !"

शिवनाथ ह्मणाले "महाराज, मानवजातींतील महात्म्यांनां मोठेपणा परमेश्वरापासूनच प्राप्त होतो, आणि या दृष्टीनें ते महात्मे ह्मणजे परमात्म्याच्या विचाराचीं मूर्तरूपें—अवतार आहेत असा आमचा विश्वास नाहीं, असें आपणांस कोणीं सांगितलें ?"

श्रीरामकृष्ण ह्मणाले "खरोखर तुमचा तसा विश्वास आहे काय ? मला हें माहीत नव्हतें."

---

* 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥'

यानंतर पुन्हां बरेंच भाषण होऊन श्रीरामकृष्णांनीं बरींच आध्यात्मिक तत्त्वें आपल्या सोप्या भाषेंत समजावून सांगितलीं, आणि तीं सर्व त्या मिशनऱ्याला फार आश्चर्यकारक आणि महत्त्वाचीं वाटलीं.

[ २ ]

शिवनाथ आणि इतर मंडळी श्रीरामकृष्णांनां भेटण्यास आली होती. श्रीरामकृष्ण कोठें बाहेर गेले होते. खोलींत मंडळी ईश्वराच्या कांहीं गुणधर्मांवर बोलूं लागली. बोलतां बोलतां वाद मोठा कडाक्याचा जुंपला आणि शिवनाथाला त्या वादाचा कंटाळा येऊं लागला. इतक्यांत श्रीरामकृष्ण तेथें आले. आंत येतांना वादाचा कांहीं भाग त्यांनीं ऐकिला आणि मंडळी बरीच संतप्त झाली आहे असें त्यांनां दिसून आलें. त्यांनीं वादविवाद एकदम बंद केला. ते ह्मणाले "थांबा, थांबा, ईश्वराच्या गुणांवर वादविवाद करून उपयोग काय? प्रार्थनेंत पुष्कळ वेळ घालविल्यानें आणि विचार केल्यानें जें कांहीं आपणांस समजतें, तें नुसत्या गुणांविषयींच्या वादविवादानें कळत नाहीं. उदाहरणार्थ तुह्मी ह्मणतां, ईश्वर चांगला आहे; पण वादविवादानें त्याच्या चांगुलपणाविषयीं माझी खात्री आपण करूं शकाल काय? दक्षिण सवाझपुर येथें नुकतेंच समुद्राच्या अतिक्रमणामुळें–जलप्रलयामुळें, झालेलें नुकसान पहा. लाखों स्त्रीपुरुष आणि मुलें हीं सर्व पुरांत बुडून मेलीं. चांगला देव–कल्याणकारक शक्ति याच्या हुकुमानें हें सर्व झालें, असें तुह्मी कसें सिद्ध करितां? अतिवृष्टीनें सर्व घाण नाहींशी झाली, भिजलेली जमीन सुपीक झाली, इत्यादि फायदे तुम्हीं कदाचित् दाखवाल; पण मी विचारतों, कीं, लाखों निरपराधी प्राण्यांचा बळी घेतल्याशिवाय भल्या देवाला हें करितां आलें नसतें काय?"

**ईश्वराच्या गुणधर्मांविषयीं वाद.**

असें श्रीरामकृष्ण ह्मणत आहेत इतक्यांत एकानें मध्येंच असा प्रश्न विचारिला कीं, "तर मग ईश्वर क्रूर आहे असें आह्मीं समजावें काय?"

श्रीरामकृष्ण ह्मणाले " वेड्या, असें कर ह्मणून तुला कोण सांगतो? आदरभावानें आणि नम्रतेनें हात जोड आणि प्रार्थना कर, कीं, हे परमेश्वरा! तुझें स्वरूप आणि तुझीं कृत्यें ( लीला ) समजण्यास आह्मी अगदीं असमर्थ आहों. आमच्या बुद्धीला तूं प्रकाशित कर!"

नंतर श्रीरामकृष्णांनी हें चांगलें समजण्याकरितां दोघां मित्रांची कथा सांगितली. ते ह्मणाले " दोघे मित्र एका बागेंत गेले. त्यांपैकीं एक व्यवहारचतुर

होता, तो आंब्याचीं झाडें किती आहेत, प्रत्येक झाडाला किती आंबे लागले आहेत, बागेची अजमासें किंमत काय होईल, याची गणती करूं लागला. दुसरा मित्र बागेच्या मालकाकडे गेला, आणि त्याची मैत्री संपादन करून त्याच्या परवानगीनें एका झाडाचे आंबे काढून यथेच्छ खाऊं लागला. आतां या दोघांत शहाणा कोण? आंबे खाल्ले तर क्षुधेची शांति होईल. पानांची, झाडांची आणि इतर रिकामटेकडी मोजदाद करीत बसण्यांत काय फायदा आहे? बुद्धिमान् गर्विष्ठ मनुष्य ही सृष्टि कां आणि कशाकरितां उत्पन्न केली याचा व्यर्थ काथ्याकूट करितो, आणि शहाणा नम्र मनुष्य ईश्वराशीं सख्य जोडतो आणि या जगांत परमानंद प्राप्त करून घेतो."

[ ३ ]

**गुरु करावा कीं नाहीं?**

एकदां पुष्कळ मंडळी श्रीरामकृष्णांपाशीं बोलत बसली होती. एकानें प्रश्न केला, कीं, आध्यात्मिक उन्नति करून घेण्यासाठीं गुरूची आवश्यकता आहे काय? श्रीरामकृष्णांनीं उत्तर दिलें "होय. जर योग्य गुरु सुदैवानें मिळाला तर तें फार फायद्याचें होतें. तसा गुरु आपल्या शिष्याला चांगली मदत करील. शिष्याला स्वतःच्या प्रयत्नांनीं आपली उन्नति करून घेतां येत नाहीं, असें नाहीं; पण चांगल्या गुरूच्या सहवासानें शिष्याचा मार्ग सुगम होतो."

नंतर नदीकडे वळून तेथें जात असलेल्या एका आगबोटीकडे बोट दाखवून श्रीरामकृष्णांनीं त्या प्रश्न करणाऱ्या गृहस्थाला विचारिलें "ती आगबोट चिनसुऱ्यास केव्हां जाऊन पोहोंचेल असें तुला वाटतें?"

गृहस्थ ह्मणाला "संध्याकाळीं पांचसहा वाजतां."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "त्या बोटीच्या मागें एक लहानशी होडी दोरीनें बांधलेली दिसते, तीहि त्या आगबोटीच्या मदतीनें चिनसुऱ्यास त्याचवेळीं जाईल; पण ती होडी जर आगबोटीपासून वेगळी केली, आणि एकटीच चालविण्यांत आली, तर ती त्या ठिकाणीं केव्हां जाईल?"

गृहस्थ ह्मणाला "बहुतकरून दुसऱ्या दिवशीं सकाळीं."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "आमच्या आध्यात्मिक उन्नतीचें असेंच आहे! आह्मीं स्वतःच यत्न करूं लागलों तर आमच्या दोषांमुळें व चुकांमुळें आमची उन्नति होण्यास फार काळ लागतो; पण चांगल्या गुरूचा समागम मिळाला असत दहाबारा तासांचा मार्ग चार तासांत आक्रमितां येतो."

[ ४ ]

एकदां श्रोत्यांपैकीं एकानें असा प्रश्न केला, कीं, "ज्ञान आणि भक्ति या दोहोंपैकीं चांगलें कोणतें?" यावर श्रीरामकृष्ण ह्मणाले "ज्ञान हें पुल्लिंगी* असल्यामुळें पुरुषासारखें आहे, आणि भक्ति ही स्त्रीलिंगी असल्यामुळें स्त्रीसारखी आहे. यामुळें ज्ञानाचा प्रवेश जगन्मातेच्या अंत:पुराच्या बाहेरच्या ओसरीपर्यंतच असतो; आणि भक्तीचा प्रवेश अंत:पुरांत होऊन तिला जगन्मातेच्या समीप जातां येतें."

**ज्ञान श्रेष्ठ कीं भक्ति श्रेष्ठ ?**

[ ५ ]

एकदां मंडळीपैकीं एकानें असा प्रश्न केला, कीं, "प्रपंचांतील काळज्या, चिंता, गरजा व कर्तव्यकर्में हीं सर्व आह्मांला भंडावून सोडीत असतां देवाकडे आमचें लक्ष्य कसें लागावें?"

श्रीरामकृष्णांनीं यावर उत्तर दिलें "त्या ढेकीवाल्याच्या बायकोकडे पहा. ती किती निरनिराळ्या कामांत गुंग झाली आहे! एका हातानें पोह्यांचा घाणा ती ढेंकामध्यें ( उखळांत ) सारते आहे. दुसऱ्या हातानें मुलाला पोटाशीं धरून त्याला पाजीत आहे, आणि इकडे गिऱ्हाइकाशीं पोह्याचा सौदा जमवीत आहे. याप्रमाणें तिचीं कामें जरी अनेक आहेत, तरी तिचें सर्व लक्ष्य घाण्याचें मुसळ आपल्या हातावर पडून तो चेंचून जाऊं नये, या गोष्टीकडे आहे. त्याप्रमाणें तुह्मीं संसारांत अवश्य रहावें; पण आपलें सर्व लक्ष्य सदा परमेश्वराकडे ठेवावें, तें भलतीकडे जाऊं देऊं नये."

**ईश्वराकडे लक्ष्य कसें लागावें?**

[ ६ ]

एकदां भाषणाच्या ओघांत "माळेचे मणी ओढून जप करण्यांत कांहीं फायदा आहे किंवा नाहीं?" असा प्रश्न निघाला.

श्रीरामकृष्ण ह्मणाले "भावनेवांचून नुसतें नाम घेण्यांत कांहीं फायदा नाहीं. उदाहरणार्थ, राघु नेहमीं 'राधाकृष्ण, राधाकृष्ण' असें देवाचें नांव तोंडपाठ ह्मणत असतो; पण त्याला मांजरानें धरिलें, कीं, तो लगेच 'क्यां क्यां' अशा आपल्या स्वाभाविक शब्दानें

**भावनेवांचून जप.**

* संस्कृत व्याकरणाचे ज्ञान नसल्यामुळे रामकृष्णांची ही चूक झालेली आहे. पण ही चूक होऊनहि दृष्टांत फारच बहारीचा आणि समर्पक झाला आहे असे पंडित शिवनाथ ह्मणतात.

ओरडतो. त्याप्रमाणें ऐहिक सुखाच्या आशेनें संसारी जन हरिनामाचा जप करितात; परंतु जेव्हां विपत्ति, दुःख, दारिद्र्य आणि मृत्यु हीं येतात, तेव्हां ते देवाचें नाम विसरून जातात आणि आपल्या नेहमींच्या संशयवृत्तींत सांपडतात. जिला संसारांतील विपत्तींशीं झगडून त्यांनां पादाक्रांत करण्याचें सामर्थ्य आमच्या अंगीं आणतां येत नाहीं, ती खरी श्रद्धाच नव्हे !"

[ ७ ]

**सर्वसेवक.**

श्रीरामकृष्णांनीं पुष्कळ वेळां निरोप पाठविला, तरी शिवनाथशास्त्री बरेच दिवस त्यांनां भेटण्यास गेले नाहींत. ब्रह्मसमाजाचें बरेंच काम करावयाचें असल्यामुळें त्यांनां सवड मिळाली नव्हती. श्रीरामकृष्ण दुसऱ्या कोणास भेटावयास जात असतां वाटेंत एकदम ते शिवनाथाच्या घरीं आले, आणि ह्मणाले "मीं पुष्कळदां बोलाविणें पाठविलें, आणि भेटण्यास येतों ह्मणून आपण पुष्कळदां वचनेंहि दिलीं, असें असून आपण अद्याप माझ्याकडे कां आलां नाहीं?"

शिवनाथ ह्मणाले "ब्रह्मसमाजाचें काम माझ्या आड येतें. तूर्त मी फार कामांत आहें."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "आपल्या मित्रांनां भेटण्यास फुरसत न देणारा तुझा ब्रह्मसमाज नष्ट होवो ! (शिवनाथाच्या तोंडाकडे पाहून आणि हंसून) मी जेव्हां तुझ्याकडे येण्यास निघालों तेव्हां ते बेटे (नवे शिष्य) मला ह्मणाले, कीं, तुह्मीं ब्राह्मोच्या घरीं कां जावें ? आपण भेटावयास जाण्याइतक्या योग्यतेचा तो नाहीं. मीं त्यांनां काय उत्तर दिलें हें तुला माहीत आहे काय ?"

शिवनाथानें विचारिलें "आपण त्यांनां काय सांगितलें ?"

"मीं त्यांनां सांगितलें, कीं, हें पहा, धंदा सुरू करण्यापूर्वी जिनें आपलें नांव सार्वजनिक रजिष्टरांत दाखल करून घेतलें, त्या स्त्रीला पाहिजे त्याच्याकडे जाण्यास पूर्ण मुभा आहे ! मी सर्वांचा सेवक आहें !"

[ ८ ]

**ब्राह्मोत्सवांत गान.**

एकदां डमडम येथें एका बागेंत होणाऱ्या ब्रह्मसमाजाच्या उत्सवाला हजर राहण्याचें आमंत्रण श्रीरामकृष्णांनां दिलें होतें. शिवनाथशास्त्री तेथें थोडे उशिरां गेले. श्रीरामकृष्ण कांहीं मंडळीच्या मध्यभागीं उभे राहून गात आहेत असें त्यांनां दिसून आलें. शिवनाथास पहातांच त्याला आलिंगन देऊन श्रीरामकृष्ण ह्मणाले "आतां माझें मन समाधान पावलें !"

नंतर पुन्हां त्यांचें गाणें उत्साहानें व जोरानें चाललें.

[ ९ ]

आणखी एका प्रसंगीं शिवनाथ दक्षिणेश्वरांत भेटण्यास गेल्यावेळीं, श्रीरामकृष्ण हातांत तीरकमठा घेऊन कावळ्यांनां झाडांवरून हुसकावून लावीत होते. शिवनाथ मोठया आश्चर्यानें ह्मणाले " आपण तिरंदाज केव्हांपासून बनलां ?"

शिवनाथाला पाहतांच हातांतील तीरकमठा टाकून देऊन त्याला मिठी मारण्यास ते धांवले. पुष्कळ दिवसांनंतर ही भेट झाल्यामुळें त्यांनां इतका आनंद झाला, कीं, त्यांचें देहभान गेलें. शिवनाथ त्यांनां खोलींत घेऊन गेले आणि खाटेवर निजवून त्यांनां वारा घालूं लागले. शुद्धीवर येतांच त्यांनीं लहान मुलाप्रमाणें सरकारी बगीच्यांतील सिंह–दुर्गेचें वाहन पाहण्यास जाऊं असें मोठया आनंदानें सांगितलें.

**दुर्गेचें वाहन सिंह याचें दर्शन.**

"आपण तेथील सिंह पुष्कळदां पाहिले आहेत," असें शिवनाथानें उत्तर दिलें.

श्रीरामकृष्ण ह्मणाले " माझ्याबरोबर येऊन सिंह पाहण्यांत आपणास मौज वाटणार नाहीं काय ?"

" होय, मौज वाटेल, पण आपणास दुसरीकडे काम आहे, तेथें गेलें पाहिजे." शिवनाथांनीं सांगितलें.

पुढें गाडींत बसून शिवनाथ आणि श्रीरामकृष्ण सुकीया स्ट्रीटपर्यंत आले. वाटेंत शिवनाथ यांनां मोठया प्रेमानें प्रियकर असें मानून ते आलिंगन देऊं लागले, व आलिंगन देतां देतां समाधिस्थ झाले. शुद्धीवर येतांच ते मातेची प्रार्थना करूं लागले, कीं, "माते, प्रियकर माते, मला बेशुद्ध करूं नकोस, मी सिंह पाहण्यास जात आहें. मी कदाचित् गाडींतून पडेन. सिंह पाहून परत येईतोंपर्यंत मला नीट सांभाळ."

लगेच ते बेशुद्ध होऊन शिवनाथाच्या हाताला टेंकून बसले. पुन्हां शुद्धीवर आल्यावर लहान मुलासारखे बोलूं लागले. इतक्यांत गाडी सुकीया स्ट्रीटवर येतांच शिवनाथ आपल्या कामास निघून गेले, आणि नरेंद्र ( स्वामी विवेकानंद ) त्यांनां घेऊन सरकारी बगीच्यांत सिंह पाहण्यास घेऊन गेले.

[ १० ]

**बेल व फुलें तोडणें.**

देवाच्या पूजेसाठीं श्रीरामकृष्ण फुलें जमा करीत असत. एकदां ते पंचवटीपाशीं बिल्वपत्रें तोडीत असतांना झाडाची साल बाहेर आली. आपल्यामध्यें आणि सर्व वस्तूमध्यें असलेल्या परमात्म्याला मोठी जखम झाली असें श्रीरामकृष्णांनां वाटलें आणि यापुढें त्यांनीं बेलाचीं पानें खुंटण्याचें सोडून दिलें. दुसऱ्या एका प्रसंगीं कालीमातेच्या पूजेसाठीं ते फुलें जमा करीत होते. एकदम त्यांच्या मनांत अशी कल्पना आली, कीं, हीं फुलझाडें ह्मणजे विराट-स्वरूपास शोभा आणणारे गुच्छ (झुबके) होत, आणि यांच्या योगें परमात्म्याची पूजा अहोरात्र अखंड चाललेली आहे. यानंतर देवाच्या पूजेकरितां फुलें तोडण्याचेंहि त्यांनीं अजिबात सोडून दिलें.

[ ११ ]

**परमात्म्याच्या आवृत्ति-अवतार.**

श्रीरामकृष्णांच्या अंतकालाच्या पूर्वी कांहीं वर्षें शिवनाथ शास्त्री त्यांच्या भेटीस गेले नाहींत. श्रीरामकृष्णांचा स्वभाव बालकाप्रमाणें असल्यामुळें त्यांचे कांहीं नवीन शिष्य त्यांनां नाटकांनां घेऊन जाऊं लागले, आणि नटांनां उत्तेजन देववूं लागले. अशा मंडळीबरोबर मिसळणें हें पंडित शिवनाथशास्त्री यांनां आवडलें नाहीं. तसेंच श्रीरामकृष्णांचे कांहीं नवीन शिष्य, ते (रामकृष्ण) सर्वशक्तिमान् परमेश्वर आहेत, असें प्रसिद्ध करूं लागले. श्रीरामकृष्णांस भेटा-वयास गेल्यास या ( अवतार ) विषयावर वाद जुंपणार, असें वाटून शिवनाथांनीं तेथें जाण्याचें टाळलें. शेवटीं जेव्हां श्रीरामकृष्ण अगदीं अव्यवस्थ आहेत असें त्यांनां कळलें, तेव्हां काम वगैरे सर्व सोडून ते तडक दक्षिणेश्वरास गेले. अशा तऱ्हेनें हयगय केल्याबद्दल व पुष्कळ दिवस भेट न दिल्याबद्दल श्रीरामकृष्णांनीं त्यांची चांगली खरडपट्टी काढिली. शिवनाथांनी आपला अपराध कबूल केला, आणि भेटीस न येण्याचें खरें कारण सांगितलें. ते ह्मणाले " एकाद्या ग्रंथाच्या जशा पुष्कळ आवृत्ति निघतात, त्याप्रमाणें सर्वशक्तिमान् परमेश्वराच्याहि पुष्कळ आवृत्ति आहेत, आणि आपले शिष्य आपणाला त्याची एक नवी आवृत्ति बन-वीत आहेत."

श्रीरामकृष्ण हंसून ह्मणाले " काय पहा ! सर्वशक्तिमान् परमेश्वर घशांतील व्रणानें मृत्युपंथास लागलेला आहे ! हे बेटे किती तरी मूर्ख असले पाहिजेत !"*

---

* हें रामकृष्णांचें उत्तर महाराष्ट्रांतील आधुनिक साधुसंतांनीं आणि त्यांच्या भगतांनीं मनन करण्याजोगें आहे.

श्रीरामकृष्ण नेहमीं स्वतःला सर्व स्त्रीपुरुषांचा सेवक असें ह्मणत असत. सर्वांनां ते देव मानीत. आपण कोणाचा गुरु किंवा उपदेशक आहों, असें ते स्वतःला कधीं ह्मणवून घेत नसत. आपण श्रेष्ठ किंवा उच्च आहों, ही कल्पना त्यांनां कधींही शिवली नाहीं. समाधि अवस्थेंत मात्र आपण समर्थ आहों, पाहिजे तें करूं शकूं, आणि कोणाला पाहिजे तें देऊं, माझ्यावर सर्व भार ठेवा, माझें भजन करा, येथें येतजात चला, अधिक कांहीं करूं नका, इत्यादि बोलत; आणि उत्कट भक्तीच्या कालांत आपण ईश्वर आहों या भावनेनें देवावर वहावयाचीं फुलें आपल्याच मस्तकावर धारण करीत. सुफी तत्वज्ञ आणि भक्तहि ईश्वराच्या ध्यानांत–समाधींत मग्न असतां ' अनहलक ' ( अहं ब्रह्मास्मि ) असें ह्मणत असत. आपलें व्यक्तित्व पूर्णपणें विसरून गेल्यामुळे आणि परमात्म्याशीं तन्मय झाल्यामुळें असे उद्गार निघत असतील. यावरून हे सर्वशक्तिमान् परमेश्वराचे केवळ अवतार होत, असें मानणें योग्य होणार नाहीं. गीतेंतील यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा। तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें यांच्यामध्यें परमात्म्याच्या तेजाचा बराच मोठा अंश असला पाहिजे, यांत संशय नाहीं.

**उपदेशाचें सार.**

बाबु प्रतापचंद्र मुजुमदार यांनीं ह्मटल्याप्रमाणें श्रीरामकृष्ण जरी हिंदु होते, तरी ते साधे हिंदु नव्हते. ते शाक्त नव्हते, शैव, वैष्णव किंवा वेदान्ती नव्हते. तर ते या सर्वांचा समुदाय–सर्व कांहीं होते. ते मूर्तिपूजक होते, तसेच अखंड सच्चिदानन्द ब्रह्माचे उपासकहि होते. ' देव प्रत्यक्ष जाणतां येतो, आणि देवालयें बांधण्यांत, सार्वजनिक उत्सव करण्यांत, व्याख्यानांत, कथापुराणांत, अनेक मतांतरांत खरा धर्म नसून, देवाला जाणण्यांत–त्याचा साक्षात्कार करून घेण्यांत तो आहे. हा खरा खरा धर्म साधण्याचा मुख्य उपाय ह्मणजे त्याग—ईश्वराप्रीत्यर्थ स्वार्थाचा, अहंकाराचा, कनककांता यांचा, सर्व काम्य कर्मांचा त्याग होय.* सर्व धर्म परस्परविरोधी नसून त्यांत ऐक्य आहे, किंबा हे सर्व एकच सनातन—खऱ्या—धर्मांचीं स्वरूपें—एकाच जगन्मातेकडे ( परमात्म्याकडे ) जाण्याचे मार्ग आहेत ' असें ते अनुभवानें सांगत असत. त्यांचें शिष्यमंडळ हिंदुस्थानांतच नव्हे, तर युरोप, अमेरिका, आस्ट्रेलिया इत्यादि परदेशांतहि वाढत चाललें आहे.

अशा या महात्म्याच्या बोधामृतापासून महाराष्ट्र वाचकवर्गानेंहि आपला लाभ करून घ्यावा, असें सुचवून हें जीवनचरित्र येथें पुरें करितों

---

* न कर्मणा न प्रजया धनेन त्यागैनैक अमृतत्वमानशुः ॥ कैवल्यौपनिषद.

# श्रीरामकृष्णपरमहंसस्तोत्र.

रामकृष्ण साधुवर्य वंगदेशिं जाहला,
काळिं या असा न कोणिं ऐकिलाहि पाहिला;
दूर सारण्या कलिप्रभाव वाटतें मला
श्रीहरीच भूवरी नृजन्म घेइ तो भला!

पूर्वनाम तें असे जयाप्रती गदाधर,
दिव्य तो ह्मणोनि 'रामकृष्ण' बोलती नर;
जन्म जाहला यदीय धन्य हो कमर्पुरीं,
चंद्रमनी सुमाय धन्य, शारदाहि सुंदरी.

कालिकाभवानिभक्त शिष्यही तिचा तसा,
पूर्वकाळिंही न कोणि जाहला जगीं असा;
देवदेविचे अनेक भक्त होति निश्चितीं,
सद्गुरू उपास्य देव! ही क्वचिच्चमत्कृती.

'लाभ तो विशेष काय यांत?' कोणि बोलती,
प्रेमसौख्य थोर तें न ठाउकें तयांप्रती;
'गूढ हें रहस्य' साधु एकनाथही ह्मणे,
भाग्यवंत लोकिं तेचि जाणतात या खुणे.

उत्कटा अतीव झालि देविची उपासना,
जिच्या बळें विलोपली उपासकत्वभावना;
गंध पुष्प धूप दीप अर्पि आपणाप्रती,
नाहिं जाहली कुणाचि भूवरी अशी स्थिति!]

स्वानुभूतिदृष्टीनें उपास्य तें उपासका,
आपणा अभिन्न हें कळेचि सर्व साधकां;
चित्तबुद्धि वृत्ति हो परंतु राहती रित्या,
रामकृष्णसाधुच्या अशा न राहिल्याचि त्या.

ज्ञानियाप्रति स्थिती न ही कळेचि सांगुनी,
सर्वही गुरूसुता सदा न गम्य हें जनीं;
धन्य धन्य अद्वितीय साधु रामकृष्ण हो,
सद्गुरुचि पाश्चिमात्यही जनांसि तो अहो!

गोपि राधिका स्वतांसि भावुनी हरीप्रती]
भर्तृभाव देउनीहि जो भजे महामती;
शेखि अन्य धर्मिंचीं उपास्य दैवतेंहि तीं,
तो भजे बळेंचि नित्य मारण्यां अहंकृति.

यामुळें पहा वसे तदीय शिष्य ते बरे
वंद्य सर्वधर्मियां अतांचि जाहले खरे;
सर्व धर्म सर्व लोक आपुलेचि जो ह्मणे,
विश्वही तयास मायबाप आपुला गणे.

'विप्र मी' गळावयासि वृत्ति ही सुदुर्मदा,
अंत्यजांचि अंगणेंहि झाडि दाढिनें सदा;
द्रव्य आणि मृत्तिका समान बाणण्यासि तो,
हातिं घेउनी कितीक निष्क नीरिं अर्पितो.

ब्रह्मचर्य पाळल्याविना गुरूकृपा बरी
होइनाच, तो असें वदे सदा सुनिर्भरीं;
ब्रह्मचारि तो नरेंद्र पट्टशिष्य जाहला,
पूर्वसत्कृतेंचि तत्कृपेसि पूर्ण पावला.

जानकीश राम दावि लोकिं साधकस्थिति,
कृष्ण दावि पूर्ण सिद्ध साधु केविं वर्तती;
रामकृष्णरूपि तो महंत होउनी बरा,
ज्ञानदान सर्वही गदाधरू करी खरा.

द्वादशप्रफुल्लकंजहार हा यथामति
श्लोकरूपि मी करोनि अर्पिला तयाप्रती;
अन्य कांहिंही करावयासि शक्ति ना मला,
घेउनी करांत चामरेंचि ढाळितों भला.

ठायिं ठायिं लोक थोर थोर सन्मती बरे,
स्थापिताति रामकृष्णआश्रमासि ते खरे;
भुक्तिमुक्तिमार्ग आक्रमावया परस्परां
साह्य ते करोत दास मागतो दिगंबरां.

# श्रीरामकृष्ण.

## प्रथमपरिच्छेद

### १८८२.

### अध्याय पहिला.

### सद्गुरूंची प्रथम भेट.

इसवी सन १८८२ चा कुसुमाकर वसंतऋतु. दक्षिणेचा सुखकारी मलयानिल मंद मंद वाहत होता. मार्च महिन्यांतल्या एका रम्य दिवशीं सायंकाळीं जगन्माता—कालीच्या मंदिरानजीक सूर्य अस्तास जात आहे, निसर्गदेवता प्रमुदित अंत:करणानें स्मित करीत आहे, अशा वेळीं मला सद्गुरूंचें—त्या ईश्वरी पुरुषाचें प्रथम दर्शन झालें.

श्रीरामकृष्ण बरींच व. राहत असलेलें कालीमातेचें देवालय दक्षिणेश्वर नांवाच्या खेड्यांत गंगानदीच्या पूर्व किनाऱ्यावर कलकत्त्याहून उत्तरेस चार मैलांवर आहे.

श्रीरामकृष्ण आपल्या खोलींतील एका लहान माचावर बसले होते. समोरून वाहत जाणारा गंगेचा पवित्र प्रवाह या खोलींतून चांगला दृष्टीस पडतो. शिष्यगण आणि इतर भक्तजन जमिनीवर बसले होते. त्या सर्वांची दृष्टि सद्गुरूंच्या प्रसन्न आणि कल्याणकारी मुद्रेकडे एकसारखी लागलेली होती, आणि त्यांच्या पवित्र मुखांतून स्त्रवणाऱ्या उपदेशामृताचें ते पान करीत होते. सद्गुरु पूर्वेकडे तोंड करून हसत हंसत भगवद्गुणनपर बोलूं लागले.

नुसतें दर्शन मात्र झालें, माझी वाचाच कुंठित झाली ! आपल्यासमोर ईश्वराविषयीं बोलणारा हा शुकदेवच आहे काय ? या दैवी उपदेशकाचा सद्बोध ऐकण्याकरितां सर्व तीर्थें जेथें धांवून आलीं आहेत अशा पवित्र भूमीवर मी उभा आहें काय ? भगवान् श्रीकृष्णांच्या अगम्य लीलांचें आणि यांच्या पवित्र नामाचें

गान करीत रामानंद, स्वरूप आणि इतर प्रेमळ शिष्य यांसहित पुरीच्या पवित्र भूमींत श्रीगौरंग (चैतन्य) देवच आपल्यासमोर बसलेले आहेत काय, असें मला वाटलें.

**ईश्वराकरितां कर्मांचा न्यास.**

श्रीरामकृष्ण ह्मणाले "ईश्वराचें नांव घेतांच तुमच्या मस्तकावर व अंगावर रोमांच उभे राहिले, किंवा तुमच्या नेत्रांतून खळकन् आनंदाश्रु वाहूं लागले, तर तुमच्या नित्यनैमित्तिक कर्मांची (द्विजांकरितां सांगितलेल्या त्रिकाल संध्येची वगैरे) मर्यादा निःसंशय संपली. असा प्रकार होईपर्यंत कर्मे सोडण्याचा तुह्मांला अधिकार नाहीं! ज्या वेळीं तशी स्थिति होते, त्या वेळीं कर्मे आपोआप गळून पडतात. आत्मिक उन्नतीच्या या स्थितींत भक्तानें फक्त ईश्वराचे नाम (राम, हरि किंवा ॐ) घेत असावें, ह्मणजे झालें. दुसरीं कर्मे करण्याची आवश्यकता नाहीं."

सद्गुरु पुन्हां ह्मणाले "संध्येचें पर्यवसान गायत्रींत होतें, व गायत्रीचे पर्यवसान प्रणवांत होतें."

मी दक्षिणेश्वराजवळ बाऱ्हा नगरांत राहत असें. सिधु नांवाच्या एका मित्राबरोबर सायंकाळीं फिरतफिरत मी देवालयांतील उद्यानाकडे आलों. रविवार असल्यामुळें आह्मांला सुटी होती. फिरत जातांना मी प्रथम बानर्जींच्या घरीं गेलो होतों. तेथें सिधु मला ह्मणाला "गंगेच्या तीरावर एक रम्य उद्यान आहे तिकडे जाऊंया, तेथें एक साधु राहतात, त्यांना परमहंस ह्मणतात."

तेथें येतांच मी अगदीं स्तिमित झालों. मी मनांत ह्मणालों "किती रम्य हें स्थान! किती पवित्र हा सत्पुरुष! याचे शब्द तरी किती मधुर आणि मोहक! एथून जाण्याची कल्पनाच किती दुःसह होते! पण प्रथम इकडे तिकडे फिरून देवालय नीट पाहून घेऊंया, आणि नंतर परत येऊन यांच्या पायांजवळ बसूं या."

मीं खोलींतून बाहेर येऊन शिव, राधाकांत आणि काली इत्यादि देवतांचें दर्शन घेतलें.

संध्याकाळचा समय. देवाच्या पूजेची वेळ झाली. मृदंग, घंटा, झांज इत्यादि वाद्यांच्या गजरांत पूजारी आरती करीत आहेत. देवळाच्या दक्षिण बाजूस गवयाचें सुस्वर गायन चाललें आहे. अनेक वाद्यें वाजत आहेत आणि त्यांचा तो मधुर आलाप मंदमंद पवनाच्या योगानें गंगानदीच्या पृष्ठभागावरून दूरवर

जाऊन अनंतामध्यें लय पावत आहे. दक्षिणेकडून वाहणारा मलयवायु विविध पुष्पांतील सुगंधानें किती रम्य व सुवासिक होऊन गेला आहे ! चंद्र नुकताच वर आला आहे, आणि त्यामुळें देवालय आणि उद्यान हीं जणूं काय शुभ्र चंद्रिकेनें स्नात झालीं आहेत. निसर्ग आणि मानव या दोघांनां आनंद झाला आहे, आणि पूजेकरितां दोघेहि सुस्नात होऊन सज्ज होत आहेत.

हा पावन प्रदेश पाहून मी आनंदभरित झालों. सिधु मला ह्मणाला " हेंच तें राशमणीचें देवालय ! एथेंच दर दिवशीं देवांची अहोरात्र पूजाअर्चा केली जाते. एथेंच साधुसंतांनां आणि गोरगरिबांनां देवाच्या नैवेद्यांतून प्रत्येक दिवशीं अन्नसंतर्पण केलें जातें. "

आह्मी त्या विस्तीर्ण चौकांतून परत श्रीरामकृष्णांच्या खोलीकडे वळलों. दरवाजापाशीं येऊन पाहतों तों दरवाजा आंतून लावून घेतलेला होता. मी इंग्रजी ' एटिकेट ' शिष्टाचार जाणत असल्यामुळें परवानगीशिवाय आंत जाणें अनुचित होय, अशी माझी समजूत होती. मला आंत जावेंसें वाटेना.

थोडया वेळापूर्वी धूप जाळला होता. दरवाजापाशीं वृंदा नांवाची मोलकरीण होती. मी तिला ह्मणालों " बाई, साधूजी आंत आहेत काय ? "

वृंदेनें उत्तर केलें " होय, आहेत. "

" ते किती दिवस एथें राहत आहेत ? "

" कितीतरी वर्षें ! "

" वाचनांत आणि अध्ययनांत त्यांचा बराच वेळ जात असेल, नाहीं ? "

वृंदा ह्मणाली "कुठलं वाचन आणि कुठलं अध्ययन ! साध्या गोष्टी काय किंवा ब्रह्मज्ञान काय, सर्व कांहीं आपोआप त्यांच्या मुखांतून निघत असतं. ईश्वरी वाणीच ती ! "

मी नुकताच कॉलेजांतून सुटलों होतों. आणि अशा वेळीं, सद्गुरु कांहीं विद्वान् नाहींत असें मला कळलें. मला याचा कांहींच उलगडा होईना. मी अगदीं चकित झालों. वृंदेला मी ह्मणालों " बरें, आतां त्यांची संध्या चालली आहे काय ? आह्मांला आंत जाण्यास कांहीं हरकत आहे काय ? त्यांनां भेटण्याची आमची इच्छा आहे, असें कृपा करून त्यांनां कळविशील काय ? "

यावर वृंदा ह्मणते " त्याला कसली हरकत ! खुषाल आंत जा ! जाच, आणि त्यांच्यापुढें बसा. "

इतकें झाल्यावर आह्मीं खोलींत शिरलों.

एका लहान खाटेवर सद्गुरु एकटेच बसलेले आहेत, जवळ दुसरें कोणी नाहीं, धूप जळत आहे व दरवाजे बंद आहेत. मीं हात जोडून नमस्कार केला. सद्गुरूंच्या सांगण्यावरून आह्मी तेथें असलेल्या एका चटईवर बसलों.

सद्गुरूंनीं मोठ्या प्रेमानें प्रश्न विचारले "तुझें नांव काय? कुठें राहतोस? काय करतोस? बाऱ्हा नगराला कां आलास?"

मीं सर्व कांहीं सांगितलें; पण लौकरच बोलतां बोलतां मला कळून आलें कीं, श्रीरामकृष्णांचें लक्ष निराळयाच एका वस्तूच्या ध्यानामध्यें मग्न झालें आहे.

दिवसांतून पुष्कळ वेळां त्यांनां समाधि लागत असे, आणि या स्थितींत त्यांनां बाह्य जगाची स्मृति नसते, असें मला नंतर समजलें.

मीं श्रीरामकृष्णांनां ह्मटलें "महाराज, आपणास आतां संध्या करावयाची असेल! तसें असल्यास आतां आह्मी आपणांस तसदी देऊं इच्छित नाहीं. पुन्हां केव्हां तरी आपल्या दर्शनास येऊं."

यावर श्रीरामकृष्ण ह्मणाले "छे, छे, आपणास घाई करण्याचें कांहीं कारण नाहीं!"

पुन्हां कांहीं वेळ ते स्तब्ध बसले, आणि नंतर ह्मणतात "संध्या-काय! संध्येविषयींच आपण कांहींसें ह्मणालांना?"

कांहीं वेळ गेल्यावर मीं सद्गुरूंनां प्रणाम केला. सद्गुरूंनीं मला निरोप दिला आणि सांगितलें "पुन्हां ये हो!"

बाऱ्हा नगराला परत जातांनां वाटेंत मी आपल्याशींच म्हणालों "हे साधूजी कोण असावेत? माझा जीव यांनां भेटण्यास कां बरें तळमळतो? विद्वान् नसूनहि कोणी मनुष्य मोठा महात्मा होऊं शकेल काय? माझें मन यांचेकडे इतकें कां ओढावें? त्यांनींहि मला पुन्हां येण्याविषयीं सांगितलें आहे; उद्यां किंवा परवां आपण त्यांनां भेटणारच!"

---

## अध्याय दुसरा.

### गुरु आणि शिष्य.

दोन दिवसांनीं सकाळीं सुमारें आठ वाजतां मी सद्गुरूंचे दर्शनास गेलों. सद्गुरू या वेळीं स्मश्रू करवून घेत होते. वसंतऋतु होता, तरी हिंवाळयाची थंडी अजून

गेली नव्हती. सद्गुरूंच्या अंगावर एक सुंदर शाल होती. मला पाहतांच सद्गुरु ह्मणाले " आलास आं ! बरें झालें, बैस एथें."

पायांत जोडे घालून व अंगावर शाल घेऊन सद्गुरु हजामतीस बसले होते. हजामत चालली असतां सद्गुरु माझ्याशीं बोलूं लागले. त्यांचा चेहरा नेहमीं-प्रमाणें प्रसन्न होता. सद्गुरु बोलतांनां मात्र थोडेसे अडखळत–चाचरत–असत.

सद्गुरूंनीं मला विचारिलें " तुझें घर कुठें आहे ? "

मीं सांगितलें " कलकत्त्यांत, महाराज. "

" एथें बाऱ्हा नगरांत तूं कुणापाशीं राहतोस ?"

" माझ्या बहिणीजवळ—ईशन कविराजाच्या घरीं मी राहतों. "

केशवचंद्रसेन.

सद्गुरु ह्मणाले "अस्सें, अस्सें ! ईशनच्या घरीं ? हल्लीं केशवचंद्राची प्रकृति कशी आहे हें तुला माहीत आहे काय ? तो अत्यवस्थ आहे, असें मीं ऐकिलें आहे. "

" होय महाराज, मींहि तसेंच ऐकिलें होतें. बहुतकरून ते आतां बरे असावेत."

" केशव बरा व्हावा ह्मणून मीं जगन्मातेला कोवळे नारळ व साखर यांचा नवस केला आहे. मीं मध्यरात्रीं उठावें आणि जगन्मातेची रडत प्रार्थना करावी कीं, हे माते, केशवाला जीवदान दे ! केशव जर जगला नाहीं तर मी कलकत्त्यास गेल्यावर कुणापाशीं बोलावें . "

कांहीं वेळानें सद्गुरु पुन्हां ह्मणाले "कलकत्त्यांत नुकतेच मिस्टर कुक नांवाचे एक गृहस्थ आलेले आहेत, तें तुला माहित असेलच. तो व्याख्यानें देतो ह्मणे ! केशवानें मला परवां एका जहाजावर नेलें होतें, तेथें तो गृहस्थ होता."

मीं ह्मटलें " होय महाराज, मीं त्या गृहस्थांविषयीं बरेंच ऐकलें आहे; पण त्यांचें व्याख्यान ऐकण्याचा योग मला आला नाहीं व त्यांच्याविषयीं मला विशेष माहिती नाहीं. "

पित्याचें कर्तव्य कर्म.

सद्गुरु ह्मणतात "प्रतापाचा बंधु एथें कांहीं दिवस राहिला होता. 'आपल्याला एथेंच रहावाचें आहे,आपल्याला दुसरा कांहीं कामधंदा नाहीं, मीं आपल्या बायकामुलांनां आपल्या सासऱ्याच्या हवालीं केलें आहे,' असें तो ह्मणत होता. स्वाभिमान नसल्याबद्दल मीं त्याला खूप झाडला ! स्वताच्या मुलांनां लहानाचें मोरें करण्याचें सोडून त्यानें असें भटकत राहणें गैर नव्हे काय ? दुसऱ्या परकी गृहस्थानें येऊन त्याचीं

मुलें पोसावीं आणि वाढवावीं काय? आपल्या कुटुंबाची दुसऱ्यानें काळजी वहावी, आपलें ओझें घ्या ह्मणून दुसऱ्यास विनवावें, याची त्याला लाज वाटत नाहीं, यांचें मला आश्चर्य वाटतें! मीं त्याची बरीच निंदा केली, आणि कांहीं तरी काम पहा, असें त्याला सांगितलें. त्याचा मूर्खपणा जेव्हां त्याच्या चांगला नजरेस आणला तेव्हां तो एथून निघून गेला."

नंतर सद्गुरु मला ह्मणाले "बरें, तुझें लग्न झालें आहे काय?"

**लग्न केल्याबद्दल निषेध.**

मीं सांगितलें "होय, महाराज!"

श्रीरामकृष्ण हे शब्द ऐकून दचकले आणि ह्मणतात "अरेरे! यानें बायको करून घेतली आहे एकुण? ईश्वरानेंच आतां याच्यावर दया करावी!"

मी हे शब्द ऐकून गोंधळलों आणि एकाद्या मोठ्या गुन्हेगाराप्रमाणें खालीं मान घालून स्तब्ध राहिलों. मी आपल्याशींच ह्मणालों "लग्न करणे हें खरोखर इतकें वाईट आहे काय?"

सद्गुरु पुढें ह्मणतात "तुला कांहीं मुलें झालीं आहेत काय?"

हा प्रश्न ऐकतांच तर माझें काळीज धडधडूं लागलें. मीं उत्तर दिलें "होय, महाराज."

हें ऐकतांच सद्गुरूंनां धक्का वसल्याप्रमाणें झालें.

कांहीं वेळानें सद्गुरु माझ्याकडे कृपादृष्टीनें पाहून प्रेमळ वाणीनें ह्मणाले, "बेटा, तुझीं कांहीं चिन्हें चांगलीं दिसतात. डोळे, कपाळ व चेहऱ्याकडे पाहिलें ह्मणजे मला तीं लक्षणें समजतात. पूर्वजन्मीं ईश्वरचिंतनांत ज्यांनीं आपलें आयुष्य घातलेलें असतें अशा योग्यांच्या नेत्रांत एक विलक्षण तेज दिसतें. कांहीं जण नुकतेंच ध्यान विसर्जन केल्याप्रमाणें दिसतात. बरें, आतां सांग पाहूं, तुझ्या पत्नीविषयीं तुझें मत काय आहे? ईश्वराकडे किंवा ज्ञानाकडे नेणारी ती विद्याशक्ति आहे, किंवा ईश्वरापासून दूर अंधकाराकडे नेणारी अविद्याशक्ति आहे?"

मी ह्मणालों "आहे-बरी आहे—पण अज्ञानी आहे—"

"ती अज्ञानी आणि आपण मात्र ज्ञानी! आपणाला ज्ञान प्राप्त झालें आहे असें तुला वाटतें, होय ना?"

ज्ञान आणि अज्ञान हीं कशीं असतात, हें मला मुळींच ठाऊक नव्हतें. जो पुस्तकें वाचतो तो शाहणा, ज्ञानी अशी माझी कल्पना. ही माझी चुकीची

समजूत नंतर दूर झाली, आणि देवाला जाणणें हेंच खरें ज्ञान, आणि त्याला न जाणणें हेंच अज्ञान, असें शिकविण्यांत आलें.

"आपणाला ज्ञान प्राप्त झालें आहे असें तुला वाटतें काय ? " असें जेव्हां सद्गुरूनीं मला विचारलें, तेव्हां माझ्या अभिमानाला दुसरा धक्का बसला !

सद्गुरु पुढें ह्मणाले "ईश्वराचें ध्यान तुला साकार रूपानें करावेंसें वाटतें, का निराकार रूपानें करावेंसें वाटतें ? "

**मूर्तिपूजा देव साकार आहे का निराकार ?**

या प्रश्नानें मी पुन्हा घोटाळ्यांत पडलों आणि विचार करूं लागलों कीं, "निराकार देवावर श्रद्धा असून पुन्हा तो साकार मानणें हें शक्य आहे काय ? किंवा देव साकार आहे असें मानून पुन्हा तो निराकार आहे असा विचार मनांत तरी कसा यावा ? एकाच वस्तूमध्यें परस्परविरोधी असे दोन गुणधर्म असूं शकतील काय ? दुधासारख्या शुभ्र वस्तू काळ्याहि असूं शकतील काय ? "

कांहीं वेळ विचार करून मी ह्मणालों "साकार देवापेक्षां निराकार देवाचें ध्यान करणें मला अधिक आवडतें ! "

सद्गुरु ह्मणतात "हें चांगलें आहे. कोणत्याहि दृष्टीनें ईश्वराकडे पाहणें, त्याचें ध्यान करणें, यांत कांहीं तोटा नाही. होय, देव निराकार आहे असें मानणें अगदी बरोबर आहे; पण दुसरें सर्व कांहीं चूक आहे, असा समज करून घेऊं नकोस ! साकार देवाचें ध्यान करणें हेंहि बरोबर आहे. तुला अनुभव येईपर्यंत --ईश्वराचा साक्षात्कार होईपर्यंत तुझ्या मतालाच तूं चिकटून राहावेंस. अनुभवानंतर सर्व कांही स्पष्ट होईल. "

मीं पुन्हां स्तब्ध झालों. परस्परविरोधी गोष्टी (धर्म) ईश्वराविषयीं सत्य आहेत, असें सद्गुरूंच्या मुखांतून मला वारंवार ऐकूं येऊं लागलें. माझ्या पुस्तकांत तर मला अशा गोष्टी कधीं आढळल्या नाहींत, आणि माझें सगळें ज्ञान तर पुस्तकी ! माझ्या अभिमानाला आणखी एक धक्का बसला; पण त्याचा अद्याप पूर्ण पाडाव न झाल्यानें मीं पुन्हां आणखी कांहीं प्रश्न विचारून सद्गुरूंशीं थोडा वादविवाद करूं लागलों.

मीं विचारिलें "महाराज, देव साकार आहे असें एक वेळ मानतां येईल; पण लोक ज्या पार्थिव मूर्तीची पूजा करितात त्या मात्र खास देव नव्हत ! "

सद्गुरू ह्मणाले " पण बाबा, तूं त्याला मातीची जड मूर्ति कां ह्मणतोस ? ईश्वरी प्रतिमा तर चैतन्याची केलेली असते. "

हें कांहीं माझ्या डोक्यांत शिरेना. ह्मणून पुन्हां मी विचारूं लागलों " तुह्मी ज्याची पूजा करतां त्या मूर्ति कांहीं ईश्वर नव्हत. ह्मणून पूजा करतांना पार्थिव मूर्तीकडे दृष्टि न ठेवतां ईश्वराकडेसच दृष्टी ठेवावी असें मूर्तिपूजकांनां सांगणें हें आपलें कर्तव्य नाहीं काय ?"

**सार्वजनिक व्याख्यानें.**

श्रीरामकृष्ण जोरानें ह्मणाले " आजकाल लोकांनां लेक्चरें द्यावीं व दुसऱ्यांनां शहाणें करावें, हीच कायती तुह्मां कलकत्तेकरांची 'फॅशन' होऊन बसली आहे! पण कृपा करून, स्वःतला शहाणें कसें करणार, तें सांगा ? दुसऱ्याला शिकविणारे तुह्मी कोण ? जरूर असेल तर विश्वचालक मानवजातीला शिकवील. ज्या परमेश्वरानें सूर्य, चंद्र, मनुष्यें, पशुपक्षी निर्माण केले; ज्यानें त्यांच्या जीविताकरितां अनेक वस्तु निर्माण केल्या; ज्यानें त्यांची काळजी घेऊन त्यांचें संगोपन करण्याकरितां त्यांनां मातापितरें दिलीं; ज्या परमेश्वरानें अशा अनेक वस्तू निर्माण केल्या, तो परमेश्वर त्यांनां ज्ञान देण्याची कांहींच तजवीज करणार नाहीं काय ? खचित, हवी असेल तर तो अवश्यमेव करील ! मानवी देहाच्या मंदिरांत तो परमेश्वर वास करतो, तो आमच्या अंतःकरणांतील विचार जाणतो. मूर्तिपूजेमध्यें कांहीं चूक किंवा दोष असेल; पण सर्व पूजा ईश्वरासाठीच आहे, हें तो जाणत नाहीं काय ? आपल्याकरितां ही पूजा आहे असें समजून तो आनंदानें पूजेचा स्वीकार करील. तुझ्या आवांक्याबाहेरच्या, तुझ्या बुद्धीस अगोचर, अशा गोष्टींनीं तूं व्यर्थ त्रास कां करून घेतोस ? ईश्वरास जाणण्याची व त्याची अर्चा करण्याची खटपट कर, देवाची भक्ति कर, हेंच तुझें आद्य आणि मुख्य कर्त्तव्य आहे. "

माझा अहंकार आतां पार मावळला. मी आपल्याशींच विचार करूं लागलों कीं, सद्गुरू ह्मणतात तें अक्षरशः खरें आहे. दुसऱ्यांनां उपदेश करीत सुटण्याची माझी काय योग्यता ? मीं स्वतः देवाला जाणलें आहे काय ? माझ्यामध्यें ईश्वरभक्ति आहे काय ? 'स्वतःला नाहीं हांतरी आणि दुसऱ्याला हांका मारी !' त्याच्यासारखाच हा प्रकार आहे! ईश्वराविषयीं मला स्वतःला कांहीं माहिती नाही. तेव्हां दुसऱ्यांनां उपदेश करण्याचा विचारसुद्धां मनांत आणणें ही मूर्खपणाची व वेडेपणाची कमालच होय! याबद्दल मला लाज वाटली पाहिजे ! एथें कांही गणित, इतिहास, किंवा वाङ्मय शिकविण्याचें नसून ब्रह्मविद्येशीं गांठ आहे. होय, खरोखर या थोर महात्म्याचे शब्द मला पूर्णपणें पटले.

## प्रथमपरिच्छेद–अध्याय दुसरा.

सद्गुरूंशीं वादविवाद करण्याचा माझा हा पहिलाच प्रसंग आणि सुदैवानें तो अखेरचाच झाला! कारण, यापुढें मीं त्यांच्याशीं कधींहि वादविवाद केला नाहीं.

सद्गुरु म्हणाले " तूं मृत्तिकेच्या मूर्तीविषयीं बोलत होतास, तशा मूर्तींची देखील पूजा करण्याची आवश्यकता केव्हां केव्हां असते. ईश्वरानेंच पूजेचे हे प्रकार उत्पन्न केले आहेत. ज्ञानाच्या निरनिराळ्या पायरीवर असलेल्या निरनिराळ्या लोकांसाठीं परमेश्वरानें ही सर्व व्यवस्था केली आहे. आपल्या जेवणासाठीं आपली आई अशी व्यवस्था ठेवते, की, प्रत्येकाला मानवत असेल तोच पदार्थ मिळतो. उदाहरणार्थ, एका आईला पांच मुलें आहेत, व एकाच माशाचा जरी स्वयंपाक करावयाचा असला तरी ती त्याचे निरनिराळे पदार्थ करिते. प्रत्येक मुलाला जें कांहीं बरोबर पाहिजे, तेंच ती त्याला देऊं शकते. एकाला माशाचा चमचमीत पुलाव मिळतो, तर पचनशक्ति कमी असलेल्या मुलाला नुसती माशाची आमटीच मिळते; तिसऱ्याकरितां आंबट चिंच घालून मासळीचें सार ती तयार करते, आणि चवथ्याला तळलेले मासे मिळतात. अशीच सर्वांची सोय होते. प्रत्येकाच्या कोठ्याला पचेल असेंच त्याला मिळतें. आलें का लक्षांत ? "

मीं म्हटलें " होय महाराज, आतां समजलें. नवशिक्यानें मातीच्या मूर्तीलाच ईश्वर किंवा चैतन्य समजून ईश्वराची पूजा केली पाहिजे. उन्नति होत गेली म्हणजे भक्तानें मानसपूजा करावा."

सद्गुरु म्हणतात "भगवद्दर्शन झालें म्हणजे प्रत्येक वस्तु, मूर्ति वगैरे सर्व कांहीं, ईश्वराचें–चैतन्याचें व्यक्त स्वरूप आहे, असा अनुभव येतो. त्याच्या दृष्टीनें मूर्ति मातीची केलेली नसून ती चैतन्यरूपच असते. कारण, परमेश्वर चैतन्यस्वरूप आहे."

मी म्हणालों " महाराज, देवाकडे आपलें मन कसें लावावें ?"

**एकांतवासाची महती.**

सद्गुरु म्हणाले " हें साध्य होण्याकरितां ईश्वराचें नाम आणि गुण गात राहिलें पाहिजे. तसेंच, नेहमीं साधुसंतांच्या समागमांत असावें. ईश्वराच्या भक्तांमध्यें किंवा ईश्वराकरितां ज्यांनीं ऐहिक वस्तु टाकून दिल्या आहेत, अशा लोकांमध्यें वारंवार मिसळत असावें. संसाराच्या काळजींत आणि चिंतेंत असतांना ईश्वरावर मन लावणें फार कठीण आहे. याकरितां वरचेवर ईश्वराचें ध्यान करण्यासाठीं एकांतवासाचा स्वीकार केला पाहिजे. आत्मिक उन्नतीच्या प्रथम दशेमध्यें

एकांतवासाशिवाय भागत नाहीं. तरुण रोपटें लावलें असतां, त्याच्या संरक्षणासाठीं त्याच्यासभोंवार कुंपण घातलें पाहिजे, नाहीं तर बकरी व गाई त्या रोप्याला खाऊन टाकतील. मन, एकांतवास आणि अरण्य हीं ध्यानाचीं तीन स्थानें आहेत. विवेक, आत्मा (देव), अनात्मा ( दृश्य जग ) याविषयींहि विचार प्रत्येकानें केला पाहिजे. असा विचार केला ह्मणजे वैषयिक सुखें, संपत्ति, कीर्ति आणि सत्ता इत्यादि ऐहिक वस्तूंची आसक्ति नाहींशी करतां येईल. ''

मीं विचारिलें "महाराज, गृहस्थाश्रमी या नात्यानें मनुष्यानें या जगांत कसें रहावें ? ''

**गृहस्थाश्रमाच्या दृष्टीनें जीविताच्या प्रश्नाचें उत्तर.**

सद्गुरु ह्मणाले " ईश्वराच्या ठिकाणीं मन लावून आपलीं सर्व कर्तव्यें करीत जा. आईबाप, बायकामुलें हीं तुझींच आहेत असें समजून त्यांच्या उपयोगीं पडत जा. त्यांची सेवा कर. पण तुझ्या अंतःकरणांत मात्र असें पक्कें वाटत असावें कीं, हीं सर्व आपलीं नव्हत ! हीं सर्व माणसें ईश्वरावर प्रेम करणारीं असलीं तर मात्र गोष्ट निराळी ! खरोखर, ईश्वर आणि ईश्वरभक्त हेच कायते तुझे आहेत. एकाद्या श्रीमंताची मोलकरीण आपलीं कामें करीत असतांना देखील तिचे सर्व विचार आपल्या स्वतःच्या घराविषयीं असतात. तिच्या यजमानाचें घर हें कांहीं तिचें घर नव्हे. 'माझा रामा, माझा हरि ' असें ह्मणून ती आपल्या यजमानांच्या मुलांचा जणूंकाय तीं आपलीं स्वतःचीं मुलें आहेत, अशा रीतीनें संभाळ करील; पण तिला हें पक्कें माहीत असतें, कीं, हीं मुलें कांहीं आपलीं स्वतःचीं नव्हत ! कांसवी भक्ष्याच्या शोधार्थ पाण्यांत फिरते, पण तिचें मन कुठें असावें असें तुला वाटतें ? खात्रीनें नदीकिनाऱ्यावर आपलीं अंडीं घातलेल्या ठिकाणीं ! याप्रमाणें तूं आपलीं जगांतील कर्तव्यें करीत जा, पण तुझें मन सदोदित ईश्वराच्या पवित्र चरणीं ठेवण्याची खबरदारी घे. भक्तीचें साधन केल्याशिवाय जर तूं संसारांत शिरलास, तर खात्रीनें अधिक मोहजालांत गुंतून राहशील. संकटें, शोक आणि मनुष्याच्या पाठीस लागलेलीं अनेक दुःखें हीं तुझ्या चित्ताची समता बिघडवून सोडतील. जितका अधिक तूं संसारांत पडशील आणि सांसारिक गोष्टींविषयीं काळजी घेशील, तितकी तुझी संसारावरील आसक्ति अधिक वाढेल. फणस फोडावयाचा असेल तर प्रथम हाताला तेल चोळून घे. असें केलें नाहींस तर फणसाचा चीक तुझ्या हाताला

चिकटेल. प्रथम भक्तीचें तेल हाताला माखून घे आणि मग खुषाल जगांत–संसारांत व्यवहार कर; पण हें साधण्याकरतां एकांतवास हाच कायतो आवश्यक उपाय आहे. समज, तुला लोणीं काढावयाचें आहे, तर प्रथम दूध एका निवांत जागीं, कोणाचा हात न लागेल अशा जागीं, ठेवून तें चांगलें विरजूं दे. वरचेवर हालविल्यास दहीं चांगलें लागणार नाहीं; नंतर दुसरी क्रिया ह्मणजे पुन्हा निवांत जागीं बसून तें घुसळणें, ही होय. एकांतवासांत तूं जर ईश्वराकडे मन लावशील, तर त्यागाची आणि भक्तीची वृत्ति तुझ्या अंगीं जडेल. पण तेंच मन जर तूं संसारांत घालशील, तर तें ग्राम्य होईल, आणि संसाराचाच—कनक आणि कांता—यांचाच विचार करीत राहील. संसाराला पाण्याची आणि मनाला दुधाची उपमा देतां येईल. शुद्ध दूध जर का एकदां पाण्यांत मिसळलें, तर तें पुन्हां शुद्धस्थितींत परत मिळणार नाहीं; पण त्याच दुधाचें लोणी करून नंतर तें लोणी पाण्यांत ठेविलें तर तें न मिसळतां शुद्ध राहील. याकरितां एकांतवासांत साधनांच्या अभ्यासानें मनोरूपी दुधाचें भक्तिरूप नवनीत तयार कर. ह्मणजे, हें नवनीत पाण्याशीं न मिसळतां वरच तरंगत राहील. ह्मणजे, तुझें मन संसाराविषयीं अनासक्त राहील. संसारांत असूनहि तें संसारी होणार नाहीं. ज्ञान किंवा भक्ति प्राप्त झाली ह्मणजे मन संसारापासून विरक्त असें राहील. ह्या साधनाबरोबरच ‘ कनककांता मिथ्या आहेत, ईश्वरच कायतो सत्य आहे, ’ असा विचार नेहमीं करावा. कनकाचा उपयोग काय? त्यानें अन्न, कपडेलत्ते आणि राहण्यास घर हीं मिळतात; एवढाच त्याचा उपयोग, अधिक कांहीं नाहीं. पैशाच्या मदतीनें ईश्वराचें दर्शन घेतां येत नाहीं, किंवा पैसा हें आयुष्याचें इतिकर्तव्य नव्हे! अशा तऱ्हेचा विचार करावा, समजलें काय?”

**एकांतवासात देवाचें ध्यान.**

मीं ह्मटलें “होय महाराज, मला समजलें. नुकताच ‘प्रबोधचंद्रोदय’ नांवाचा ग्रंथ वाचावयास मिळाला, त्यांत विचारासंबंधी भाग मीं वाचला होता.”

सद्गुरु ह्मणाले “ हें पहा, संपत्ति किंवा स्त्रियांचें सौंदर्य यांत काय आहे? तूं जर नीट विचार करशील, तर तुला असें आढळून येईल कीं, एकाद्या अत्यंत सुंदर स्त्रीची काया देखील हाड, मांस, स्नायु, रक्त यांची बनलेली असते; इतकेंच नव्हे, तर बाकीच्या प्राण्यांप्रमाणें आंतडीं, मूत्र, पूरिष यांनीं युक्त असते. पण आश्चर्य हें कीं, मनुष्य ईश्वरी तत्वाला विसरून जातो आणि असल्या वस्तूंकडेसच आपलें मन लावतो! ”

मीं विचारिलें " महाराज, देवाला पाहणें शक्य आहे काय ?"

सद्गुरु ह्मणाले " होय, खात्रीनें शक्य आहे ! देवाला पाहण्याचे कांहीं उपाय हे आहेत:-( १ ) वेळोवेळां एकांतवासांत राहणें; ( २ ) ईश्वराचे नाम व गुण गाणें; ( ३ ) विचार किंवा विवेक; ( ४ ) दर्शन घेण्याच्या उत्सुकतेनें व खऱ्या कळकळीनें ईश्वराची प्रार्थना करणें."

देवाला कसें पाहावें ?

मीं विचारिलें " महाराज, मनाच्या कोणत्या स्थितींत ईश्वराचा साक्षात्कार होतो ?"

सद्गुरु ह्मणाले " खऱ्या अंतःकरणानें देवाची करुणा भाक, ह्मणजे तो तुझ्या दृष्टीस पडेल. आपल्या बायकामुलांकरितां लोक घडाभर अश्रु ढाळतील; पैशाकरितां आपल्या अश्रूंच्या पुरांत वाहून जातील; पण ईश्वराकरितां कोण रडतो ? ढोंग करण्याकरितां–दाखविण्याकरितां–नव्हे, तर खऱ्या अंतःकरणानें आणि कळकळीनें ईश्वराकरितां अश्रु ढाळ ! सूर्योदयापूर्वी उषेचा आरक्त प्रकाश –अरुणोदय येतो, त्याप्रमाणें खरी कळकळ बाळगणारें अंतःकरण ईश्वरी प्रसादाचें–साक्षात्काराचें पूर्व चिन्ह होय. संसारी मनुष्याची ऐहिक वस्तूवरील आसक्ति, आईची आपल्या मुलावरील आसक्ति, आणि पतिव्रतेची आपल्या पतीवरील आसक्ति ह्या तिन्ही जर एकवटल्या, आणि ह्या एकवटलेल्या आसक्तीएवढें ईश्वरावरील प्रेम जोरदार झालें, तर तुज ईश्वर दृष्टीस पडेल. असें आहे कीं, ईश्वरास पाहणें असेल तर मनापासून, अंतःकरणापासून, त्यावर प्रेम केलें पाहिजे. आपण आपल्या प्रार्थना अशा रीतीनें केल्या पाहिजेत, कीं, त्या जगन्मातेला पोंचतील. मांजराच्या पिलाला ' म्यांव म्यांव ' करून आपल्या आईला रडून दाखविण्याचें फक्त माहीत असतें; बाकी सर्व कांहीं भाटीला माहीत असतें. ती आपल्या पिलाला वाटेल तेथें स्वयंपाक घरांत अगर घरांतील मऊ बिछान्यावर ठेविते. खरोखर, पिलाला फक्त आईला रडून कसें दाखवावें एवढेंच काय तें समजतें. "

## अध्याय तिसरा.

### आपलें आचरण.

मी बाऱ्हानगर येथें माझ्या बहिणीच्या घरीं राहत असें. बाऱ्हानगर देवालयापासून सुमारें एक मैल अंतरावर आहे. सद्गुरूंनां भेटल्यापासून माझ्या

मनांत एकसारखे त्यांच्याविषयीं विचार घोळत असत. आपल्या डोळ्यां-समोर सद्गुरूंची प्रसन्न मूर्ति आहे, आणि आपण त्यांचे अमृतोपम मधुर शब्द ऐकत आहों, असें मला वाटलें. मीं आपल्याशींच विचार केला, ह्या अकिंचन ब्राह्मणाला जीवित, आत्मा इत्यादि विषयांसंबंधी प्रश्न कसे सोडवितां येतात ? त्याचा उपदेश तरी किती सुंदर आणि स्पष्ट! माझ्या मनोवृत्ति अत्यंत खळबळून गेल्या, आणि अहोरात्र सद्गुरूंची पुन्हां दुसऱ्यांदां भेट केव्हां होईल, अशी मोठ्या उत्सुकतेनें मी वाट पाहूं लागलों. पुढील रविवारीं दुपारीं तीनचार वाजण्याचे सुमारास बाऱ्हानगरच्या नेपाळबाबूंनां बरोबर घेऊन मी देवालयाकडे आलों.

सद्गुरु या वेळीं आपल्या खोलीमध्यें ओट्यावर बसलेले होते. भक्तगणांनीं खोली गच्च भरून गेली होती. रविवार असल्यामुळें सर्वांनां सुट्टी होती. मला त्यांपैकीं कोणाचीहि ओळख नव्हती. मीं सद्गुरूंनां नमस्कार करून एका बाजूस बसलों. सद्गुरू हंसत भक्तांशीं बोलत होते.

विवेकानंद. दुर्जनाशीं कसें वागावें ?

सद्गुरूंचे शब्द विशेषत: नरेंद्र—विवेकानंद—नांवाच्या एका एकोणीस वर्षांच्या तरुणाला अनुलक्षून आहेत, असें माझ्या लक्षांत आलें नरेंद्र हा कॉलेजांतील एक विद्यार्थी असून 'साधारण ब्राह्मसमाजा'चा सभासद होता. त्याच्या शब्दांत तेज आहे, त्याचे डोळे मोठे आणि काळेभोर आहेत, त्याची विद्वत्ता, आणि आत्मिकबल हीं त्याच्या नेत्रांतून जणूं काय स्पष्ट दिसतात, ईश्वराच्या भक्तासारखी त्याची नजर आहे, असें दिसून आलें.

संभाषणाचा विषय ' दुर्जनांची वागणूक ' हा असून, ईश्वराला शोधणारांची जे लोक निंदा करतात, अशा भक्तनिंदक लोकांशीं कसें वागावें, हा प्रश्न चालू होता.

सद्गुरु सस्मित मुद्रेनें नरेंद्रास ह्मणत'त "नरेंद्र ! तूं काय ह्मणतोस ? संसारी लोक भक्तांनां नाना तऱ्हेनें नांवें ठेवितील? रस्त्यांतून हत्ती चालूं लागला, ह्मणजे कुत्रीं व इतर सटरफटर जनावरें भुंकत ओरडत त्याच्या मागें लागलेलीं असतात; पण हत्ती त्यांच्या ओरडीकडे बिलकूल लक्ष न देतां आपल्या वाटेनें निघून जातो. बेटा, समज, तुझ्या पाठीमागें लोक तुझी निंदा करतात, मग तुला त्यांचेविषयीं काय वाटेल ? "

नरेंद्र ह्मणाला " माझ्यामागें भुंकणारीं तीं कुत्रीं आहेत, असें मी समजेन !"

यावर सद्गुरु हंसत ह्मणतात “ छे, इतक्या थरावर जाऊं नको! बेटा, चराचर वस्तूंमध्यें ईश्वराचा वास आहे हें पक्कें समज, आणि ह्मणून प्रत्येक वस्तु, मग ती मनुष्य, पशु, पक्षी, वनस्पति किंवा खनिज पदार्थ इत्यादि कांहीं असो, पूजार्ह आहे! लोकांशीं वागतांना आपण एवढी काळजी घेतलीच पाहिजे, कीं, सज्जनांची संगति धरावी, आणि दुर्जनांची संगति टाळावी. वाघामध्येंहि देव आहे हें खरें; पण आह्मीं त्याच्या गळ्याशीं लागावें आणि त्याला मिठी मारावी, असें कांहीं ठरत नाहीं! एथें एकादा असें विचारील कीं, वाघामध्यें देव (निराळ्या रूपानें) आहे, तर मीं त्यापासून कां पळावें? याला उत्तर येवढेंच आहे कीं, वाघापासून दूर पळावें असें जे कोणी आह्मांला सांगतात तेहि निराळ्या व्यक्त-स्वरूपांत ईश्वरच आहेत, त्यांच्या शब्दांकडे आह्मी दुर्लक्ष कां करावें? एका अरण्यांत एक साधू राहत होता. त्याचे बरेच शिष्य होते. एके दिवशीं त्यानें त्या सर्वांनां उपदेश केला कीं, ‘ ईश्वर सर्व वस्तूंमध्यें आहे हें जाणून जगांतील प्रत्येक वस्तूसमोर आपण पूज्य बुद्धीनें डोकें लवविलें पाहिजे.’ त्यानंतर एकदां असें घडलें कीं, एक शिष्य यज्ञार्थ समिधा आणण्याकरितां जात असतां एकदम ‘ पैस व्हा, बाजू व्हा, माजलेला हत्ती धांवत आहे! ’ अशी आरोळी त्याच्या कानांवर आली. या शिष्याखेरीज रस्त्यावरील सर्व इसम दूर झाले. शिष्यानें आपल्याशींच विचार केला कीं, हत्ती ईश्वराचेंच एक स्वरूप आहे, तेव्हां आपण त्यापासून कां पळावें? आपल्या जागेवरून न हालतां त्यानें हत्तीला प्रणाम करून त्याची स्तुति आरंभिली. हत्तीवरील महात ‘ दूर व्हा, बाजूस चला ’ असें एकसारखें ओरडतच होता; पण तो शिष्य एक पाऊलहि हालेना! शेवटीं हत्तीनें त्याला सोंडेनें वर उचलून जोरानें दूर एका बाजूस फेंकून दिलें. गरीब बिचाऱ्या मुलाला बरीच दुखापत झाली, त्याच्या अंगांतून रक्त वाहूं लागलें, आणि तो बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. गुरूला हें वर्तमान कळतांच तो शिष्यांसहित तेथें आला. त्या शिष्याला घरीं नेऊन औषधोपचार करण्यांत आले. तो शुद्धीवर आल्यावर मंडळीनें त्याला विचारलें ‘ जेव्हां महातानें मत्त हत्ती धांवून येत आहे असें ओरडून सांगितलें तेव्हां तूं दूर कां गेला नाहींस?’ त्यानें उत्तर दिलें ‘ आमच्या गुरूंनीं एकदां सांगितलें होतें, कीं, ईश्वर मनुष्या-मध्यें तसाच इतर प्राण्यांत व्यक्त होतो. मीं हत्तीरूपी ईश्वराकडे दृष्टी दिली आणि त्या जागेपासून हाललों नाहीं.’ गुरु ह्मणाले ‘ बेटा, हत्तीरूपी ईश्वर

येत होता हें खरें; पण महातरूपी ईश्वरानें 'रस्त्यांतून दूर हो' अशी सूचना तुला दिली नाहीं काय? ईश्वर प्रत्येक वस्तूमध्यें आहे हें खरें. हत्तीमध्यें तो जर आहे, तर महातामध्यें तो अधिक व्यक्त होत नाहीं काय? तर त्याच्या सूचनेकडे तूं कां लक्ष दिलें नाहींस, हें सांग पाहूं?' धर्मग्रंथामध्यें असें लिहिलें आहे कीं पाणी हें ईश्वराचें स्वरूप आहे; पण कांहीं पाणी पूजेकरितां, कांहीं भांडीं किंवा मलिन कपडे धुण्याकरतां, आणि कांहीं भोजनानंतर तोंड व हात धुण्याकरतां घेतात. तोंड व हात धुण्याचें पाणी पिण्याकरितां किंवा पूजेकरितां कोणी घेत नाहींत! त्याचप्रमाणें जगांत चांगले आणि वाईट, ईश्वराची भक्ति करणारे ( भक्त ) आणि भक्ति न करणारे (अभक्त) असे लोक आहेत. या सर्वांच्या हृदयामध्यें परमेश्वर वास करतो, हे खरें आहे; पण वाईट आणि अभक्त अशा लोकांशीं व्यवहार ठेवणें इष्ट नाही. आपलें त्यांच्याशीं सलगीचें नातें असूं नये. त्यांच्यापैकीं कांहींजणांशीं नुसती तोंडओळखच असावी, आणि बऱ्याचजणांशीं तीसुद्धां असतां कामा नये! अशा लोकांपासून दूर राहणें हेंच योग्य होय!"

अप्रतिकाराचें तत्व.

यावर नरेंद्रानें विचारिलें " जर दुर्जन आम्हांला त्रास देण्यास आले, किंवा खरोखरीच त्यांनी आह्मांला उपसर्ग दिला, तर आह्मी स्वस्थ बसावें काय?"

सद्गुरु ह्मणाले " समाजांत, संसारांत, गृहस्थाश्रमी या नात्यानें राहणाऱ्या मनुष्यानें आत्मसंरक्षणासाठीं वाईटाचा प्रतिकार करण्याचा आव आणावा; पण जशास तसें या नात्यानें वागून कुणालाहि उपसर्ग देऊं नये, एवढी खबरदारी अवश्य घ्यावी! एका शेतांत कांहीं गुराख्याचीं पोरें गुरें राखीत असत. तेथें एक भयंकर विषारी सर्प होता. एके दिवशीं त्या वाटेनें एक साधू चालला होता. तीं मुलें पळत येऊन त्या साधूला सांगूं लागलीं 'महाराज, त्या वाटेनें जाऊं नका, तेथें एक मोठा सर्प आहे!' महात्मा ह्मणाला ' बरें आहे मुलांनों, पण मी तुमच्या सर्पाला भीत नाहीं. मला पुष्कळ मंत्र येतात आणि ह्मणून मला कांहींहि उपद्रव होणार नाहीं.' असें ह्मणून साधू त्या वाटेनें निघाला. मुलांनां त्या सर्पाची भीति असल्यानें तीं त्या वाटेच्या बाजूस गेलीं नाहींत. महात्म्याला पाहून सर्प आपली फणा वर उचलून धांवत आला; पण महात्म्यानें मंत्र म्हणतांच एकाद्या किड्याप्रमाणें निरुपद्रवी होऊन तो त्याच्या पायावर पडला.

महात्मा सर्पाला ह्मणाला 'तूं दुसऱ्यांनां त्रास देत कां फिरतोस? मी तुला एक मंत्र (जप) देतों, त्याचा नेहमीं जप कर, ह्मणजे ईश्वरावर तुझें प्रेम जडेल आणि शेवटीं तुला त्याचें दर्शन होईल. दुसऱ्यांनां त्रास देण्याची तुझी वासना आपोआप नाहींशी होईल.' सापानें महात्म्यापासून मंत्रग्रहण केलें, आणि गुरूपुढें प्रणाम करून तो ह्मणाला ' मोक्ष मिळविण्यासाठीं मीं आणखी काय करावें ?' गुरूनें सांगितलें 'पवित्र नामाचा—मंत्राचा जप कर, आणि कोणत्याहि प्राण्याला त्रास देऊं नको. मी पुन्हां येईन आणि तुझें कसें काय चाललें आहे तें पाहीन.' असें ह्मणून तो चालता झाला. या स्थितींत कांहीं दिवस गेले. गुराखी मुलांनीं पाहिलें कीं, साप कांहीं आतां चावत नाहीं. त्यांनीं त्याला दगड मारिले, तरीहि तो किड्याप्रमाणें निरुपद्रवी आणि थंड दिसला. एका मुलानें तर त्याचें शेपूट धरून गरगरां फिरवून त्याला बराच वेळ आपटला. साप रक्त ओकला आणि बेशुद्ध होऊन पडला. तो आतां मेला असें समजून मुलें निघून गेलीं. बरीच रात्र झाल्यावर साप शुद्धीवर आला. हळुहळू.व मोठ्या कष्टानें तो आपल्या बिळांत गेला. त्याचीं हाडें खिळखिळीं झालीं. थोड्या दिवसांत तो अगदीं वाळून अस्थिपंजर झाला आणि अन्नासाठीं बिळांतून बाहेर येण्याइतकी शक्ति येण्यास त्याला बरेच दिवस लागले. मुलांच्या भीतीनें तो रात्रींच अन्नशोधार्थ बाहेर येत असे. महात्म्याची दीक्षा घेतल्यापासून त्यानें कोणत्याहि प्राण्याला त्रास देण्याचें बंद केलें होतें. त्यानें आपला निर्वाह झाडपाल्यासारख्या पदार्थांवर चालविला होता. महात्मा लवकरच परत आला. त्यानें शोध केला, पण सर्प कुठें दिसेना. मुलांनीं सांगितलें कीं, तो सर्प मेला; पण आयुष्याचें इतिकर्तव्य पूर्ण झाल्याशिवाय ह्मणजे ईश्वराचें दर्शन झाल्याशिवाय मरण येणार नाहीं, अशी आपण दिलेल्या मंत्रांत अद्भुत आध्यात्मिक शक्ति होती, हें तो जाणून होता. ह्मणून त्यानें त्या सापाचा शोध चालविला आणि त्याच्या नांवानें हांका मारल्या. सर्प बिळाबाहेर येऊन त्यानें गुरूस प्रणाम केला. नंतर पुढें दिल्याप्रमाणें त्यांचें संभाषण झालें. महात्म्यानें विचारिलें ' तुझें कसें काय चाललें आहे ?'

सर्प ह्मणाला ' परमेश्वराच्या कृपेनें सर्व ठीक आहे महाराज. '

' तूं अगदीं वाळून अस्थिपंजर झाला आहेस, हें कसें ? तुला काय झालें ?'

' महाराज, मी आपल्या आज्ञेप्रमाणें कोणालाहि त्रास देत नाहीं, झाडपाला वगैरे खाऊन राहतों, त्यामुळें मी वाळून पूर्वीहून कृश झालों असेन.'

महात्मा ह्मणाला 'अज्ञानें तुझी अशी स्थिति झाली असेल असें मला वाटत नाहीं. दुसरें कांहींतरी घडलें असावें. पुन्हां विचार करून सांग पाहूं.'

सप ह्मणाला 'हां, मला आतां आठवलें. एके दिवशीं गुराखी मुलांनीं मला खूब मारिलें. त्यांनीं माझें शेंपूट धरून मला पुष्कळ वेळां जमिनीवर जोरानें आपटलें. त्या गरीब मुलांनां माझ्या स्थितींत काय बदल झाला आहे याची कल्पनाहि नव्हती. मी कुणालाहि चावणार नाहीं किंवा यत्किंचित्‌हि त्रास देणार नाहीं, हें त्यांनां कसें समजावें ?'

महात्मा ह्मणाला 'छे खुळ्या ! आपल्या शत्रूकडून होणारी अशी दुर्दशा कशी टाळावी हें न समजण्याइतका का तूं मूर्ख आहेस ! देवाच्या कोणत्याहि प्राण्यास चावण्याची मीं तुला मनाई केली होती; पण तुला जे जिवानिशीं मारणार होते, त्यांचेवर तूं फुसकारून त्यांनां घाबरवून कां सोडलें नाहींस ?'

श्रीरामकृष्ण पुढें ह्मणाले "फटाटोप करा, फुसकारा, पण चावूं नका ! दुर्जनांवर–आपल्या शत्रूंवर फुसकारण्यास कांहीं हरकत नाहीं ! वाईटाचा प्रतिकार कसा करावा, उसनें कसें फेडावें, हें आपणांस पूर्ण माहीत आहे असें दाखवून त्यांनां दूर पळवा ! शत्रूंच्या रक्तांत आपलें विष न ओतण्याची खबरदारी घेतली ह्मणजे झालें. दुसऱ्यानें वाईट केलें, ह्मणून तुह्मींहि परत वाईट करून सूड घेऊं नका ! आत्मसंरक्षणासाठीं प्रतिकार करतों असा आव आणण्यास तुह्माला कांहीं हरकत नाहीं."

यावर एक शिष्य ह्मणाला "या देवाच्या सृष्टींत वाईट लोक कां आहेत ? या जगांत पाप कां आहे ?'

**पापाचा प्रश्न. सर्व मनुष्यें समान आहेत काय ?**

सद्गुरु ह्मणाले "देवाच्या सृष्टींत वैचित्र्य हा साधारण नियम आहे, ह्मणून तेथें इष्टाप्रमाणें अनिष्टहि आहे. तसेंच जनावरें, वनस्पति, खनिज इत्यादि दुसऱ्या पुष्कळ तऱ्हेच्या वस्तु आहेत. पशूंमध्यें निरुपद्रवी आणि शांत असे कांहीं आहेत, तर दुसरे कांहीं वाघाप्रमाणें क्रूर आणि दुसऱ्या प्राण्यांनां खाणारे असेहि आहेत. कांहीं वृक्ष अमृतासारखीं मधुर फळें उत्पन्न करितात, तर कांहीं मृत्यु आणणारीं विषारी फळें देतात. तसेंच कांहीं लोक सज्जन, कांहीं दुर्जन, कांहीं पुण्यवान्, कांहीं पापी, कांहीं भक्त आणि कांहीं संसारी असे असतात. मनुष्याचे ४ वर्ग करतां येतील. १–बद्ध; २ मुमुक्षु;

३ मुक्त; ४ नित्य. **नित्य**—साधु नारद आणि त्यांसारखे दुसरे कांहीं. हे लोक दुसऱ्या लोकांच्या कल्याणासाठीं, त्यांनां सत्यज्ञान शिकविण्यासाठीं या जगांत राहतात. **बद्ध**–पैसा, मान, पदव्या, विषयोपभोग, सत्ता इत्यादि ऐहिक वस्तूंवर आसक्ति असलेले. हे लोक देवाला विसरून जातात आणि देवाविषयीं कधींहि विचार करीत नाहींत. **मुमुक्षु**–कनककान्तारूप संसार टाळण्यास हे फार खटपट करतात. पण त्यांचें ध्येय–मोक्ष–त्यांपैकीं फारच थोड्यांनां प्राप्त होतो. **मुक्त**–हे कनक किंवा कांता यांविषयीं आसक्त नाहींत. उदाहरणार्थ, साधुसंत. त्यांच्या मनांमध्यें या संसारी वस्तूंवर आसक्ति बिलकूल नसते. ते नेहमीं परमेश्वराच्या पवित्र चरणांचें ध्यान करितात. एका तळ्यांत जाळें टाकिलें आहे असें समजा. कांहीं मासे फार हुशार असतात आणि कोळ्याच्या जाळ्यांत ते कधींहि सांपडावयाचे नाहींत. पण असे फारच थोडे. **नित्य** यांचेसारखे होत. बहुतेक मासे जाळ्यांत सांपडतात व त्यांपैकीं कांहीं पळून जाण्याची शक्य ती खटपट करतात, हे **मुमुक्षु** होत. यांपैकीं एकाददुसरा मासा जाळ्यांतून पाण्यांत उडी घालतो. असे मासे आम्ही बरेच वेळां पाहतों. कोळी व दुसरे लोक 'पहा तो मोठा मासा पळतो आहे,' असें मोठ्यानें ओरडत असतांना हे मासे मोठ्या जोरानें उसळी मारून पाण्यांत निसटून जातात; पण बहुतेक माशांनां जाळ्याबाहेर जातां येत नाहीं, आणि आश्चर्य हें कीं, त्यांनां बाहेर जाण्याची इच्छाहि नसते! ते तळांतील चिखलांत जाऊन आपलें डोकें खालीं घालून बसतील आणि जाळ्यांत अडकलेल्या स्थितींतच स्वस्थ बसतील. जणूं काय आपण सुखरूप आहों, आणि आपणास कशाचीहि भीति नाहीं! त्या गरीब बिचाऱ्यांनां हें ठाऊक नसतें, कीं, लवकरच माशांनीं भरलेलें तें जाळें कोळी जमिनीवर नेऊन ठेवणार! **बद्ध** यांचेसारखे असतात. त्यांनां आपलीं चिखलाचीं घरें सुरक्षित वाटतात. पण हाय हाय! ते संसाराच्या जाळ्यांत अडकवून घेतात, त्यांनां जीवन नाहींसें होतें आणि जमिनीवर मारण्याकरितां ते खेंचले जातात. संसारांतील मुख्य बेडी ह्मणजे कनक आणि कांता यांची होय. तिनें बद्ध जीवांचे हातपाय बांधून टाकलेले असतात. तळ्याखालीं चिखलांत–कनक आणि कांता यांत–सुख, शांति आणि समाधान मिळेल, असें त्यांनां वाटतें; पण आपला नाश यामुळेंच होतो, हें त्यांनां समजत नाहीं. अशा तऱ्हेचा एकादा बद्ध जीव मरणोन्मुख झाला असतां त्याची पत्नी त्याला ह्मणते 'तुम्ही

आतां जग सोडून चाललां, मागें काय मिळकत ठेविली आहे ?' ती बिचारी स्त्री ईश्वराविषयीं शब्दहि बोलत नाहीं ! तो मरणोन्मुख मनुष्यहि संसारांत इतका आसक्त असतो, कीं, त्याला खोलींतील दिव्याचा प्रकाश सहन होत नाहीं, आणि तो ह्मणतो, कीं 'कोण आहे रे तेथें, एकापेक्षां अधिक वाती लावूं नका, आणि अगदीं जरूर आहे त्यापेक्षां अधिक तेल खर्च करूं नका !' संसारी मनुष्य देवाविषयीं विचार करीत नाहीं. जर त्याला फुरसत असेल आणि कांहीं काम नसेल तर तो शुष्क बडबड करीत राहील आणि ज्यापासून कोणाचाहि काडी इतका फायदा होणार नाहीं असें काम करीत बसेल. त्याला विचारल्यास तो उत्तर देईल, कीं, माझ्यानें स्वस्थ बसवत नाहीं, ह्मणून मी हें कुंपण लावीत आहें. त्याची वेळ जातां जात नाहीं, ह्मणून पत्ते किंवा विझीक यांचे डाव त्याला खेळावे लागतात."

एक शिष्य विचारतो "महाराज, संसारी मनुष्यानें आपला उद्धार कसा करून घ्यावा, त्याला कांहीं उपाय आहे किंवा नाहीं ?"

**श्रद्धेचें सामर्थ्य.**

श्रीरामकृष्ण ह्मणतात "होय, खचित आहे ! त्यानें साधूंची संगति धरावी. ईश्वराचें ध्यान करण्यासाठीं त्यानें वरचेवर आपल्या घरादारापासून दूर अशा एकांतीं जावें. त्यानें विवेकाचा अभ्यास करावा. 'हे जगन्माते, मला प्रेम (भक्ति) आणि श्रद्धा दे,' अशी खऱ्या कळकळीनें जगन्मातेची प्रार्थना करावी. एकदा का श्रद्धा तुला लाधली ह्मणजे तुझें काम झालें. **श्रद्धेपेक्षां श्रेष्ठ दुसरी कोणतीहि वस्तु नाहीं** !"

केदाराकडे वळून सद्गुरु पुढें ह्मणाले "श्रद्धेच्या सामर्थ्याविषयीं तूं ऐकिलें असशील ! रामचंद्र हा प्रत्यक्ष ईश्वरी अवतार, त्याला हिंदुस्थान आणि लंका यांमधील समुद्रावर सेतु बांधावा लागला, पण भक्तश्रेष्ठ हनुमानाची श्रद्धा परमेश्वराच्या नांवावर होती. त्यानें त्या नामाचा उच्चार केला आणि पहा, तो कसा एकदम समुद्राच्या पैलतीरावर पोहोंचला ! श्रद्धेचें सामर्थ्य दाखविण्या-करितां खुद्द परमेश्वरास सेतु बांधावा लागला आणि नामावर श्रद्धा असलेल्या भक्तास त्याची कांहींच जरूरी लागली नाहीं !" असें ह्मणून सद्गुरु हंसूं लागले व त्यांचेबरोबर सर्व शिष्यहि हंसूं लागले.

सद्गुरु पुढें ह्मणाले "परमेश्वराच्या दुसऱ्या एका भक्तानें एका पानावर राम असें नाम लिहिलें आणि समुद्र ओलांडून जाऊं इच्छिणाऱ्या गृहस्थास तें देऊन

म्हटलें कीं, 'मित्रा, तूं अगदीं भिऊं नको! श्रद्धा ठेवून तूं समुद्रांतून चालत जा. पण श्रद्धा नाहींशी किंवा कमी होऊं देऊं नको! लक्षांत ठेव, तसें केलेंस तर तूं पार बुडून जाशील!' त्या मनुष्यानें तें पान आपल्या धोतराच्या पदरांत बांधिलें आणि समुद्रावरून तो चालत गेला. कांहींसा पुढें गेल्यावर पानावर काय लिहिलें आहे हें जाणण्याची त्याला इच्छा झाली. त्यानें पान बाहेर काढून वाचलें. तों रामाचें नांव ठळक अक्षरांनीं लिहिलेलें त्याला आढळून आलें. यावर तो आपल्याशींच म्हणतो 'काय, फक्त रामाचें नांव! एवढेंच का सगळें!' पण श्रद्धा नाहींशी झाली मात्र, तोंच तो मनुष्य पाण्यांत बुडून मेला! परमेश्वरावर श्रद्धा मात्र असूंद्या, कीं मोक्ष खात्रीनें मिळालाच पाहिजे. मग त्याच्या हातून ब्रह्महत्या, स्त्रीहत्या, इत्यादि कसलींहि भयंकर पापें झालीं असोत, फक्त त्यानें 'देवा, मी पुन्हां असें करणार नाहीं' असें म्हणावें आणि परमेश्वराचें पवित्र नाम घ्यावें, म्हणजे झालें."

नंतर सद्गुरु गाऊं लागले:—

"आमि दुर्गा दुर्गा बले मा जदि मरि।
आखेरे ए दीने, ना तार केमने, जाना जाबे गो शंकरि॥
नाशि गो ब्राह्मण, हत्या करि भ्रूण, सुरापान आदि विनाशि नारि।
ए सब पातक, ना भावि तिलेक, ब्रह्मपद निते पारि॥"

**नित्य सिद्धाचीं लक्षणें.**

आपल्यासमोर बसलेल्या नरेंद्राविषयीं सद्गुरु म्हणतात "तुम्ही सर्व याला पाहतां, हा किती सरळ, शांत आणि निरभिमानी आहे. द्वाड मुलगा आपल्या बापाच्या समोर अगदीं शांत असतो; पण रस्त्यावर खेळतांना आणि धांवतांना तो कांहीं निराळाच दिसतो. नरेंद्रासारखा मुलगा नित्य सिद्धाच्या वर्गांत मोडतो संसाराच्या बंधनांनीं हे कधींहि बांधले जात नाहींत. हे थोडे वयांत आले म्हणजे त्यांनां आपल्या अंतःकरणांत आत्मजागृति भासूं लागते, आणि ते मग एकदम ईश्वराकडे धांव घेतात. मानवजातीचे गुरु या नात्यानें ते या जगांत येतात. संसारी वस्तूंवर त्यांचें प्रेम कधींहि बसत नाहीं. कनक आणि कांता यांच्यामागें त्यांचें मन कधींहि जात नाहीं. वेदामध्यें होम नांवाच्या पक्ष्याविषयीं उल्लेख आहे. तो पक्षी मेघाच्यावर, जगाच्या वर्दळीच्या फार दूर, अलिप्त अशा उच्च प्रदेशीं रहातो. तेथें तो पक्षी आपलें अंडें घालितो. अंडें लागलेंच पडूं लागतें. कित्येक दिवस अंडें खालीं पडतच असतें, आणि पडतां पडतां तें फुटतें. इतक्या उंची-

वरून तें अंडें खालीं पडतें, कीं, त्या अंड्यांतून निघणाऱ्या पिलाला खालीं येतां येतां पंख फुटतात, त्यांचे डोळे उघडतात. नंतर त्या पिलाला आपण फार जोरानें खालीं जात आहों आणि जमिनीचा स्पर्श ह्मणजे आपलें मरणच होय, असें समजूं लागतें. भूमीवर आदळण्याच्या भीतीनें तें पिलूं मेघांच्याहि वर उंच आकाशांत राहणाऱ्या आपल्या मातेच्या शोधार्थ वर उडूं लागतें. ही पक्ष्याची आई, ह्मणजे जगन्माता. ती अनंताच्या सहवासांत उच्च प्रदेशीं, या मायिक जगापासून दूर राहते. तिचीं अगदीं जवळचीं अपत्यें ह्मणजे हे शुद्ध व तरुण आत्मे होत. यांचे डोळे उघडून पंख फुटेपर्यंत जग त्यांनां एक मोठें गुह्य वाटतें. जगाची त्यांनां ओळखच नसते. डोळे उघडले कीं त्यांनां आपल्या समोर उभा असलेला मृत्यु स्पष्ट दिसतो. पैसा, कीर्ति, विषयसुख इत्यादि वस्तूंच्या बनलेल्या संसाराचा स्पर्श होतांच आपणास मृत्यु ठेवलेलाच, हें त्यांनां स्पष्ट दिसतें आणि लगेच ते आपला जीवितक्रम बदलून ईश्वराकडे धांवतात. कारण, त्यांनां कळून चुकलेलें असतें, कीं, आपल्या अस्तित्वाचा आश्रय, खरें सत्य व सर्व ज्ञानाचा आणि चैतन्याचा उगम अशी काय ती एक आपली जगन्माताच होय."

नरेंद्र तेथून उठून गेला. केदार, प्राणकृष्ण, मी आणि इतर मंडळी सद्गुरू-बरोबर खोलींत होतों. सद्गुरु अद्याप नरेंद्राविषयीं हांसत बोलत होते. सद्गुरु शिष्यास ह्मणतात " तुह्मी पहा कीं, नरेंद्र प्रत्येक बाबतींत पारंगत आहे. गाणें, बजावणें, वाचन किंवा लिहिणें कोणतीहि गोष्ट घ्या, तींत तो प्रवीण आहे. परवां केदारबरोबर त्याचा वाद जुंपला होता. केदारच्या तोंडांतून शब्द निघतात, तोंच त्यानें त्याच्या चिंध्या उडवून दिल्या. " असें ह्मणून सद्गुरु हंसूं लागले व त्यांचेबरोबर इतर सर्व मंडळीहि हंसूं लागली.

सद्गुरु नंतर मला उद्देशून ह्मणाले "वादविवादावर—तर्कावर एकादा इंग्रजींत ग्रथ आहे काय ?"

मीं उत्तर दिलें " होय, त्याला लॉजिक असें ह्मणतात. "

सद्गुरूंनीं सांगितलें "तो ग्रंथ कसा असतो याची थोडी कल्पना मला दे पाहूं."

मजवर हा मोठा कठीण प्रसंग गुदरला ! पण हिंम्याकरून मी ह्मणालों "तर्कशास्त्राचा एक भाग, सामान्य सिद्धांतापासून एकदेशी सिद्धांताकडे जाणें; हा असतो. उदाहरणार्थः—सर्व मानव मर्त्य आहेत; पंडित मानव

आहेत—ह्मणून पंडित मर्त्य आहेत! दुसरा भाग, एकदेशी सिद्धांतावरून सामान्य सिद्धांताकडे जाणें हा असतो. उदाहरणार्थः—हा कावळा काळा आहे; तो कावळा काळा आहे; आणखी दुसरा कावळा काळा आहे; त्या अर्थी सर्व कावळे काळे आहेत. एकदेशी सिद्धांतावरून अनुमान काढण्यांत कदाचित् चूक होण्याचा संभव असतो. कारण, एकाद्या अज्ञात प्रदेशांत पांढरे कावळे सांपडूं शकतील."

श्रीरामकृष्णांनीं या शब्दांकडे विशेष लक्ष्य दिलें नाहीं. ते त्यांनीं कानांनी ऐकिलें असें केलें. यामुळें या विषयावरील संभाषण बंद झालें. नंतर मंडळी उठली. शिष्य बागेंत हिंडूं लागले. मी एकटाच पंचवटीजवळ फिरत होतों. संध्याकाळचे पांच वाजले असतील. सद्गुरूंच्या खोलीच्या उत्तरेच्या बाजूस सोप्यावर येतांच मला एक विलक्षण देखावा दिसला. सद्गुरु स्वस्थ उभे आहेत, नरेंद्र एक स्तोत्र गात आहे. तो आणि दुसरे तीनचार शिष्य सद्गुरूंला मध्यें घालून उभे आहेत.

**समाधि.**

मी त्या गाण्यानें तल्लीन झालों. जन्मांत मीं असें सुस्वर गाणें ऐकिलें नव्हतें! सद्गुरूकडे पाहून मला अत्यंत आश्चर्य वाटलें आणि मी स्तब्ध झालों. सद्गुरु एकाग्र दृष्टीनें पाहत उभे आहेत. त्यांचे डोळे बिलकुल हालत नाहींत. त्यांचा श्वासोच्छ्वास चालला आहे कीं नाहीं हेसुद्धां सांगणें कठीण असें दिसून आलें.

या दैवी आनंदाच्या स्थितीला समाधि ह्मणतात, असें एका शिष्यानें मला सांगितलें. मीं ही स्थिति पूर्वी केव्हांहि पाहिली किंवा ऐकिली नव्हती. मी आपल्याशींच ह्मणालों "ईश्वराविषयी विचार मनांत येतांच मनुष्याला जगाची विस्मृति पडावी, हें शक्य आहे काय? ही स्थिति ज्याला प्राप्त होते त्याची श्रद्धा आणि भक्ति कितीतरी मोठी असली पाहिजे."

गाणें पुढें दिल्याप्रमाणें चाललें होतें.

**चिन्तय मम मानस हरि चिद्घन निरञ्जन।**
**अनुपम भाति, मोहन मूरति, भक्त–हृदय–रञ्जन।**
**नवरागे रञ्जित, कोटि–शशी–विनिन्दित, ( किंवा )**
**बिजली चमके, सेरूप आलोके, पुलके शिहरे जीवन।**

ही ओळ ह्मणतांच सद्गुरूंला भक्तीचें भरतें आलें. त्यांचे शरीरावर खरोखर रोमांच उभे राहिले. नेत्र प्रेमाश्रूंनीं भरून आले. ओठांवरील मंदहास्य, दिव्य

साक्षात्कारापासून किती अवर्णनीय आनंद होतो, हें दाखवीत आहे. खरोखर, असा सुंदर अप्रतिम देखावा त्यांनां दिसत असला पाहिजे. कोटिचंद्रांची प्रभा लोपून टाकणारा ईश्वरी साक्षात्कार तो हाच काय? जर असेल, तर मनुष्याला हा साध्य होण्यास भक्ति, श्रद्धा, तपश्चर्या आणि अभ्यास (साधन) यांचा केवढा जोर असला पाहिजे!

गाणें पुढें चालू झालें:—

हृदि कमलासने, भज ताँर चरण,
देख शांतमने, प्रेम नयने, अपरूप प्रियदर्शन।
चिदानन्द रसे भक्तियोगावेशे, हओरे चिरमगन।
चिदानन्दरसे, हायरे प्रेमानन्दरसे।

पुन्हां पहा तें मोहक हास्य. पहा त्यांचा देह स्तब्ध, निष्कंप आहे. दृष्टि अर्धोन्मीलित आणि जणू काय शून्याकडे पहात आहे. या इंद्रियांनीं पाहणें शक्य नाहीं असा कांहीं दिव्य प्रकार—साक्षात्कार ते पहात आहेत, आणि त्यामुळें ते आनंदभरित झाले आहेत असें दिसतें.

गाणें संपलें. नरेंद्रानें शेवटचा चरण ह्मटला.

चिदानन्द रसे भक्तियोगावेशे, हओरे चिरमगन।
चिदानन्दरसे, हायरे प्रेमानन्दरसे।

समाधीचें आणि दैवी प्रेमाच्या आनंदाचें हें अद्भुत चित्र मनासमोर ठेवून मी परत घरीं निघालों. वाटेंत माझ्या हृदयांत मुरलेलें संगीत उकळी फुटून वारंवार बाहेर येऊं लागलें:—

प्रेमानंदरसे हस्ते रे चिरमंजुल हरि प्रेमे मत्त हये।

## अध्याय चवथा.

## सद्गुरूंचा शिष्यांशीं विनोद.

दुसऱ्या दिवशीं सुटी असल्यामुळें मी पुन्हां दुपारीं तीन वाजतां आलों.

सद्गुरु या वेळीं खोलींत बसले होते. जमीनीवर एक चटई आंथरलेली होती. नरेंद्र आणि एकदोन शिष्य, १९।२०वर्षांचे सर्व तरुण गडी बसले होते. सद्गुरूंचा चेहरा नेहमीप्रमाणें हंसतमुख होता. ते ओटयावर बसून शिष्यांशीं बोलत होते.

मी खोलींत गेलों. मला पाहून सद्गुरु एकसारखे हंसूं लागले. ते ह्मणाले "पहा, पुन्हां आला !"

सर्व शिष्यहि हंसूं लागले. मी सद्गुरूंच्या पायां पडलों. इंग्रजी शिक्षण मिळालेल्या सुशिक्षित लोकांच्या रीतीभातींप्रमाणें मी मागच्या प्रसंगीं हात जोडून नमस्कार केले होते. पण आज मी सद्गुरूंच्या पायावर मस्तक ठेवण्यास शिकलों. मी खालीं बसल्यावर सद्गुरु नरेंद्राला आणि इतर शिष्यांनां आपण कां हंसलों, तें सांगूं लागले. ते ह्मणाले "एके दिवशीं सुमारें चार वाजतां एका मोराला थोडी अफू चारण्यांत आली. बस्स ! दुसऱ्या दिवशीं तोच मोर पुन्हां तसाच प्रसाद—अफूचा खुराक–मिळण्यासाठीं बरोबर चार वाजतां अगदीं ठेवलेला ! " हें ऐकून सर्व मंडळी सारखी हंसत राहिली.

मीं मनांत ह्मटलें " खरोखर, सद्गुरूंचें ह्मणणें अगदीं बरोबर आहे ! मी घरीं परत जातों, पण या अद्वितीय साधूपाशीं माझें मन ठेवून जातों; पुन्हां मी केव्हां यांनां भेटेन असा मला अहोरात्र ध्यास लागलेला असतो. मला येथें कोणी बलात्कारानें ओढून आणतें, असें वाटतें. येथें येण्याची कल्पना सोडून देणें आणि दुसरीकडे जाणें हें मात्र आतां शक्य नाहीं ! " असा विचार करीत असतांना सद्गुरु तरुण मुलांच्या संगतींत आनंदानें मजा मारीत आहेत, असें मला आढळून आलें.

भुशाचा अग्नि सद्गुरूंनीं पेटविला आहे व त्याच्या भोंवतीं जणूं काय आपल्याच वयाच्या मुलांबरोबर सद्गुरु खेळताहेत, असें दिसलें. हंसणें, खिदळणें, थट्टामस्करी आणि विनोद यांला ऊत आला आहे, आणि ईश्वराचें प्रेम, आनंद, मुबलक मिळतो अशी ही एक मोठी जत्राच आहे, असें दिसलें.

अशा या विलक्षण पुरुषाकडे पाहून मी आश्चर्यचकित झालों. मी आपल्याशीं विचार करूं लागलों, कीं " काल ज्यांनां समाधि लागलेली होती, आणि दैवी प्रेमाचें पूर्वी कधींहि न पाहिलेलें उत्कृष्ट उदाहरण ज्यांनीं आह्मांला दिलें, ते हेच काय ? मीं लग्न केलें ह्मणून पहिल्या दिवशीं मला बोलणारे हेच काय ? 'तुला ज्ञान प्राप्त झालें आहे असें वाटतें काय ?' असें ह्मणून माझी निर्भर्त्सना करणारे हेच काय ? देव साकार आहे आणि निराकारहि आहे ह्मणून सांगणारे ते हेच काय ? परमेश्वर काय तो सत्य आहे, बाकी सर्व क्षणभंगुर आहे–आतां आहे तर दुसऱ्या घटकेस नाहीं, असें आहे, असें निक्षून सांगणारे ते हेच काय ?

अनासक्त राहून आपलीं कामें करावीं, आपलें मन सदैव शाश्वताकडे–परंधामाकडे–जगन्मातेकडे लावावें, खेड्यांतील आपल्या घराकडे, आप्तेष्टांकडे मन ठेवून ज्याप्रमाणें शहरांतील मोलकरीण आपलीं कामें करते त्याप्रमाणें परमेश्वराकडे मन लावून आपण सर्व कामें करावीं, असा परवां ज्यांनीं उपदेश केला ते हेच काय ? ”

वर दिलेला मौजेचा प्रकार चालू असतां, सद्गुरु मजकडे वारंवार पाहत होते. मी निःशब्द आणि स्तब्ध असा बसलों होतों, आणि माझी दृष्टि सद्गुरूंच्या मोहक चेहऱ्याकडे एकसारखी लागलेली होती.

सद्गुरु रामलालला ह्मणतात “ हा तरुण मनुष्य इतर मुलांपेक्षां प्रौढ आहे, ह्मणून तो अधिक गंभीर दिसतो. मुलें हंसतखेळत मजा मारीत आहेत आणि हा आपला स्वस्थ आहे. ”

माझें वय या वेळी सुमारें २७ वर्षांचें होतें.

सद्गुरु नंतर भक्तश्रेष्ठ हनुमानाविषयीं बोलूं लागले. परमेश्वराकरितां, पैसा, मान, देहाचीं सुखें इत्यादि सर्व कांहीं टाकून देण्यास हनुमान कसा तयार झाला याविषयीं त्यांनीं सांगितलें.

त्याग.

सद्गुरु गाऊं लागले.

**आमार कि फलेर अभाव।**

**पेयेछि जे फल जनम सफल; मोक्ष फलेर वृक्ष राम हृदये ॥**

**श्रीराम कल्पतरु मूले बसे रइ, जखन जे फल वांच्छा से फल प्राप्त हइ,**

**फलेर कथा कइ ( धनि गो ) ओ फल ग्राहक नइ;**

**जाव तोदेर प्रतिफल जे दिये ।**

सद्गुरु हनुमानाच्या त्यागाविषयीं–संसार आणि संसारांतील सुखें यांच्या त्यागाविषयीं–गात होते, आणि गात असतांना त्यांची स्मृति नाहींशी होत चालली होती.

सद्गुरु आतां समाधि अवस्थेंत आहेत, शरीर निष्कंप झालें आहे, दृष्टि एकाग्र आहे. फोटोमध्यें आह्मी त्यांनां जसे पाहतो, तसे ते बसलेले दिसले.

एका क्षणापूर्वी मुलें नाचत, बागडत, हंसत, खेळत होतीं. आतां तीं सर्व गंभीर होऊन सद्गुरूंच्या मुखाकडे एकसारखीं पहात होतीं. अश्रुत आणि विलक्षण असें सद्गुरूंचें स्थित्यंतर पाहून ते आश्चर्यचकित झाले. सद्गुरूंची ही समाधि मीं दुसऱ्यांदां पाहिली.

सद्गुरु देहभानावर येण्यास बराच वेळ लागला. त्यांच्या अवयवांतील ताठरपणा आतां कमी होत चालला. चेहरा हास्ययुक्त झाला, इतर इंद्रियें आपआपलीं कामें करण्यास सुरुवात करूं लागलीं. नेत्रांतून आनंदाश्रु वाहूं लागले. सद्गुरु रामाचें नाम गाऊं लागले. मीं मनांत ह्मटलें " पांच वर्षांच्या मुलाप्रमाणें या सर्व मुलांशीं खेळत असलेला साधु तो हाच काय ?"

सद्गुरु पूर्वस्थितींत येऊन मला व नरेंद्राला ह्मणाले " तुम्हां दोघांनां इंग्रजींत बोलतांना आणि परस्परांमध्यें प्रश्नोत्तरें होऊन वादविवाद करतांना पहावें, अशी माझी इच्छा आहे."

हें ऐकून आम्हां दोघांनांहि हंसूं आलें. आह्मीं बोलूं लागलों; पण इंग्रजींत नाहीं. सद्गुरूंसमोर मीं वादविवादास प्रवृत्त व्हावें हें शक्यच नव्हतें ! कारण, अशा कामास लागणारी सामुग्री असलेली मनोमंदिरांतील खोली कायमची बंद होऊन गेली होती ! सद्गुरु पुन्हां आग्रह करूं लागले तरी पण इंग्रजींत बोलणें सुरू होईना.

संध्याकाळचे पांच वाजले. सर्व शिष्यमंडळी घरीं जाण्यास तयार झाली.

**आपल्या कांहीं अत्यंत प्रियकर शिष्यांसह.**

नरेंद्र व मी यांखेरीज सर्व जाऊं लागले. नरेंद्र आज रात्रौ सद्गुरूंपाशीं राहणार होता. त्याला हातपाय आणि तोंड धुवावयाचें होतें, ह्मणून देवालयाच्या आवारांत उत्तरेच्या बाजूस असलेल्या जाईच्या मंडपाकडे आणि हंसपुष्करिणीकडे तो हातांत गडवा घेऊन गेला. आज सुदैवानें ज्या महात्म्याची भेट झाली, त्याविषयीं विचार करीत मी बागेंतील लहान वाटांमधून इकडून तिकडे फिरूं लागलों. मी कुटीला वळसा घालून हंसपुष्करिणीकडे येतों, तोंच पुष्करिणीच्या कांठावर श्रीरामकृष्णांला एकट्याच नरेंद्राशीं बोलत असलेले पाहून मला फार आश्चर्य वाटलें. पुष्करिणीच्या पायऱ्यांवर ते उभे राहिलेले होते. नरेंद्र हात पाय धुवून हातांत गडवा घेऊन बोलत उभा होता.

सद्गुरु हंसत ह्मणाले "हें पहा, तूं वरचेवर येत जा. तूं येथें नवीन पाहुणा आहेस. ' प्रणयाच्या प्रथम दिवसांत ' प्रियकरांच्या भेटी इतर वेळांपेक्षां अधिक वारंवार होतात, नाहीं काय ? " हें ऐकून आह्मीं हंसूं लागलों.

सद्गुरु हंसून पुढें ह्मणाले " हें, तूं वारंवार येथें यावेंस, तुझें काय ह्मणणें ? "

नरेंद्रानें हंसून उत्तर दिलें " होय महाराज, मी वेळोवेळीं येत जाईन. "

# प्रथमपरिच्छेद–अध्याय चवथा.

सद्गुरु मागें वळून दक्षिणेकडे आपल्या खोलीच्या बाजूस जाऊं लागले. त्यांच्या एका बाजूस मी व दुसऱ्या बाजूस नरेंद्र असे चाललों. कुटीजवळ आल्यावर सद्गुरु मला ह्मणाले " शेतकरी आपल्या नांगराकरितां बैल कसे विकत घेतात, हें तुला माहीत आहे काय ? ते या बाबतींत फार हुशार असतात. चांगल्या किंवा वाईट बैलाची निवड त्यांनां लवकर करतां येते. बैलामध्यें पाणी आहे कीं नाहीं, हें त्यांनां समजतें. ते बैलाच्या शेंपटास हात लावतात. याचा परिणाम फार विलक्षण होतो. ज्या बैलांत पाणी नसतें ते कांहींच प्रतिकार न करितां स्वस्थ पडून राहतात. जणूं काय, कांहीं केलें तरी त्यांनां खपतें. उलट पक्षीं, पाणीदार बैल एकदम उड्या मारूं लागतील आणि आपल्या देहाशीं तुह्मीं वाटेल तसे वागलां ह्मणून नापसंती दर्शवतील. शेतकरी लोक या दुसऱ्या वर्गाचे बैल पसंत करतात. नरेंद्र हा दुसऱ्या प्रकारचा बैल आहे, आणि त्याच्यामध्यें खरें पाणी आहे !"

सद्गुरु हंसून पुढें ह्मणाले "पण पाणी नसलेले असे पुष्कळ असतात. ते शिजून मऊ झालेल्या तांदळांप्रमाणें होत ! मऊ आणि मिळमिळीत ! त्यांच्यामध्यें कांहींच शक्ति नसते. त्यांच्या हातून नेटाचा प्रयत्न होत नाहीं. त्यांनां इच्छाशक्ति—मनोबल नसतें."

संध्यासमय झाला आणि सद्गुरु आपल्या खोलींत परमेश्वराचे चिंतन करीत बसले. ते मला ह्मणाले " तूं जा, आणि बागेंत फिरत असलेल्या नरेंद्राला भेट, त्याच्याशीं भाषण कर, आणि तो मुलगा कशा तऱ्हेचा आहे हें मला नंतर येऊन सांग. "

संध्याकाळीं पुजारी देवाची पूजा आरती करून नैवेद्य दाखवूं लागले. चांदणीच्या पश्चिमेस नदीच्या घांटावर नरेंद्राला मी भेटलों. परस्परांनां भेटल्यामुळें आह्मांला आनंद झाला. आपण 'साधारण ब्रह्मसमाज' पंथाचे अनुयायी व कॉलेजांतील विद्यार्थी आहों, इत्यादि नरेंद्र सांगूं लागला.

आतां बराच उशीर झाला. मला सद्गुरूंचा निरोप लवकरच घ्यावयाचा होता, पण कांहींतरी मला तेथेंच दाबून धरीत होतें. नरेंद्राला सोडून मी श्रीरामकृष्णांस शोधीत गेलों. त्यांच्या गाण्यांतील जादूनें माझ्या अंतःकरणावर पूर्ण पगडा बसविला होता, आणि त्यांच्या मुखांतून आणखी कांहींतरी ऐकावें, असें मला झालें होतें.

**माझ्याविषयीं तुझें काय मत आहे ?**

खोलीमध्यें श्रीरामकृष्ण न मिळाल्यामुळें जगन्मातेच्या मंदिरासमोरील नट-मंदिराकडे मी वळलों.

नटमंदिरांत तेथील अस्पष्ट अशा पवित्र प्रकाशांत सद्गुरु इकडून तिकडे, तिकडून इकडे पाऊलें टाकीत होते. देवालयांत जगन्मातेची मूर्ति असून तिच्या दोन्ही बाजूंस दोन दिवे जळत होते. नटमंदिरांत दिवा अंधुक अंधुक जळत होता, आणि त्या योगें ध्यानास योग्य असें प्रकाश आणि अंधकार यांचें मिश्रण तयार होत आहे, असें वाटत होतें.

श्रीरामकृष्णांनीं जगन्मातेच्या पवित्र नामाचा गजर केलेला ऐकून मला आनंद झाला. एकाद्या पटाईत जादुगाराच्या मंत्रानें भारलेल्या मनुष्याप्रमाणें मीं अगदीं मोहित झालों !

मी सद्गुरूंजवळ येऊन मोठया अदबीनें, भीत भीत आणि नम्रतेनें विचारलें " महाराज, आज रात्रौ आणखी कांहीं पदें गायिली जाणार आहेत काय ? "

सद्गुरु कांहीं वेळ विचार करून ह्मणाले " नाही, आतां कांहीं पदें ह्मटलीं जाणार नाहींत; पण हें पहा, मीं कलकत्त्यांत बलरामाच्या घरीं एकादे दिवशीं येणार आहें, तेथें आलास तर माझीं पदें ऐकावयास मिळतील ! "

मी ह्मणालों " जशी आपली मर्जी ! "

सद्गुरु ह्मणाले " तुला तें घर माहित आहे काय ? बलराम बोसची ओळख आहे काय ? "

मीं ह्मटलें " नाहीं महाराज."

सद्गुरु ह्मणतात " तो बोसपुराचा बलराम बोस ! "

मीं ह्मटलें " बरें महाराज, मी चौकशी करीन. "

श्रीरामकृष्ण मंदिरांत मजबरोबर इकडून तिकडे, तिकडून इकडे फिरूं लागले. ते ह्मणाले " बरें, मी तुला एक प्रश्न विचारतों, कीं, माझ्याविषयीं तुझें काय मत आहे ? "

मी स्वस्थ राहिलों आणि विचारांत गढून गेलों.

सद्गुरु पुढें ह्मणतात " तुझें माझ्याविषयीं काय मत आहे ? माझें असें विचारणें आहे, कीं, माझेजवळ किती आणे सत्यज्ञान आहे ?"

मीं ह्मटलें " ज्ञानाचे आणे याचा अर्थ मला नीट कळत नाहीं. मी एवढें सांगूं शकतों, कीं, **परमेश्वराविषयीं असें विलक्षण ज्ञान व प्रेम, श्रद्धा, संन्यास आणि परमेश्वराचा साक्षात्कार, मनाचा उदारपणा—**

**विश्वात्मैक्य हीं सर्व एकाच पुरुषांत एकवटलेलीं पहाण्याचा सुयोग आतांपर्यंत मला केव्हांच प्राप्त झाला नव्हता–केव्हांच आणि कुठेंहि प्राप्त झाला नव्हता!"**

सद्गुरु हंसूं लागले. मी सद्गुरूंचा निरोप घेऊन आपलें डोकें त्यांच्या चरणांवर ठेवून नमस्कार केला. नंतर मी उत्तरेच्या दरवाजापर्यंत गेलों, आणि कांहीं आठवल्यासारखें होऊन परत आलों.

मंदिरांत सद्गुरु एकटेच होते, तेथें मी आलों. त्या मंदिरांतील अर्धा उजेड, अर्धा अंधकार अशा त्या प्रकाशांत सद्गुरु फिरत होते. एकटेच, दुसरें कोणी सोबत नाहीं. दाट अरण्यांत मृगराज सिंहहि असाच एकटा–आपला मित्र जो आत्मा, त्यासहित फिरत असतो. आणि या आत्मारामाच्या मैत्रींत त्याला आनंद होतो. खरोखर, या संसाराटवींत या नरसिंहाला एकटेंच, सोबत कुणीहि न घेतां फिरणें आवडतें.

प्रेमादरपूर्ण दृष्टीनें मीं सद्गुरूंकडे पाहिलें. मी आपल्याशींच ह्मणालों, कीं, "पहा, आज मनुष्याचें ध्येय येथें पूर्ण फळास आलें. पहा, संसार सोडून अनंताचा साक्षात्कार मानवानें घेतलेलें हें उदाहरण आहे."

मला पाहून सद्गुरूंनीं विचारिलें "तूं परत कां आलास?"

मी ह्मटलें "महाराज, कोणा एका श्रीमंताच्या घरीं आपण मला भेटावयास सांगतां असें दिसतें. तेथें दरवाजावर प्यादे आणि शिपाई असतील, ते मला मज्जाव करतील. तेथें न जाणें बरें. या ठिकाणींच मी आपली वारंवार भेट घेत जाईन."

यावर सद्गुरु ह्मणाले "अरे, असें कां? तूं माझें नांव सांग. मला भेटावयाचें आहे असें सांग, ह्मणजे कुणी तरी खात्रीनें तुला मजजवळ आणून सोडील."

मी ह्मणालों "जशी सद्गुरूंची मर्जी."

असें ह्मणून पुन्हां प्रणाम करून मी चालता झालों.

---

# द्वितीय परिच्छेद.

## १८८२.

## अध्याय पहिला.

## पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांची भेट.

आज विद्यासागर, भवनाथ, महेंद्र, हाझरा, आणि इतर बरीच मंडळी हजर होती. पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांनां भेटण्याची सद्गुरूंनां फार इच्छा होती. पंडित दक्षिणेश्वराहून सहा मैलांवर कलकत्त्याच्या बदुरबागन नांवाच्या भागांत राहत असत. तेथें त्यांनां भेटण्याकरितां सद्गुरूंची स्वारी शिष्यांसहित गाडींत बसून एके दिवशीं पांच वाजतां निघाली. तो दिवस श्रावण वद्य सप्तमी ( ५ आगष्ट १८८२ ) चा होता.

गाडी पंडितजींच्या दरवाजासमोर येऊन थांबली. माझ्या हाताला धरून सद्गुरु गाडींतून उतरले. पंडितजींच्या दिवाणखान्यांत (तेथें त्यांची लायब्ररीहि असे) जावयाच्या जिन्याकडे पोहोंचण्यापूर्वी सद्गुरु गोंधळल्यासारखे होऊन मला ह्मणाले " हें पहा, मी माझ्या कोटाचें बटन लावावें असें तुला वाटतें काय ?"

मीं उत्तर दिलें " महाराज, त्याविषयीं आपण कांहींच काळजी करूं नये. अशा तऱ्हेचे नियम आपणास लागूं नाहींत."

एकाद्या मुलाप्रमाणें सद्गुरूंस हें ह्मणणें पटलें, असें दिसलें; कारण, त्यांनीं पुन्हां याविषयीं कांहींच काळजी घेतली नाही. एकाद्या पांच वर्षांच्या मुलाप्रमाणें कोणतीहि गोष्ट शिकण्यास ते तयार आहेत, असें दिसलें.

नंतर सर्व मंडळीला वर दिवाणखान्यांत नेण्यांत आलें. दक्षिणेकडे तोंड करून पंडितजी एका खुर्चीवर बसले होते. पुस्तकें आणि वर्तमानपत्रें यांनीं भरलेलें असें एक मेज नेहमींच्या युरोपियन पद्धतीप्रमाणें त्यांच्यासमोर होतें.

चटकन् मीं सद्गुरु आल्याची वर्दी दिली आणि पंडितजींनां त्यांची ओळख करून दिली. पंडितजींनीं स्वागतार्थ त्यांनां उत्थापन दिलें. सद्गुरु पश्चिमेस तोंड करून व मेजावर एक हात टेंकून उभे राहिले होते, आणि शांतपणें पंडितांकडे पाहूं लागले; पण त्यांच्या प्रसन्न वदनावर हास्याची कोमल छटा झळकत होती.

# द्वितीय परिच्छेद–अध्याय पहिला.

तेथें दुसरे कांहीं लोक, पंडितांचे मित्र आणि शिष्य हजर होते. पंडितांनीं स्थापन केलेल्या त्यांच्या शाळेंत आपणास फीची माफी मिळावी अशी विनंति करण्याकरितां आलेला एक मुलगाहि त्या मंडळींत होता.

**समाधि.**

पंडितजींकडे पहात याप्रमाणें उभे राहिले असतां, नेहमींप्रमाणें सद्गुरूंचें देहभान गेलें. त्यांनां समाधि लागली. नंतर कांहीं वेळानें ते बसले आणि नेहमींच्या संवयीप्रमाणें थोडेंसें पाणी पिण्याकरितां मागूं लागले. तेव्हां " बरद्वानहून आतांच मिठाई आलेली आहे, महाराज तिचा स्वीकार करतील का ?" अशी पंडितजींनीं मजपाशीं चौकशी केली. कांहीं हरकत नाहीं, असें कळल्यावर पंडितजी आंत आपल्या खोलींत गेले आणि पाणी व मिठाई घेऊन परत आले व ती त्यांनीं सद्गुरूंसमोर ठेविली. शिष्यांनांहि थोडीशी मिठाई घेतली.

एका शिष्याला मिठाई देतांना विद्यासागर ह्मणाले "तो तर घरचा मुलगा आहे, त्याला देण्याची जरूरी नाहीं."

यावर सद्गुरु ह्मणाले " हा मुलगा चांगला आहे. फल्गु नदीचें पात्र बाहेरून सुकून गेलेलें दिसतें, परंतु तिच्या आंतून अदृश्य पण जोरदार असा प्रवाह आहे. त्याप्रमाणें हा मुलगा अन्तःसार ह्मणजे आंतून पूर्ण व भरलेला आहे."

**विद्या अथवा ईश्वराप्रत नेणारें ज्ञान.**

सद्गुरु विद्यासागरांनां ह्मणतात " एकदांचा आज मला सुदैवानें सागर प्राप्त झाला ! आतांपावेतों कालवे, डबकीं आणि फार झालें तर नद्या हींच काय तीं मला आढळलीं होती. " सद्गुरूचें भाषण ऐकून सर्वजण हंसूं लागले.

यावर विद्यासागर ह्मणाले " महाराज, असें असेल तर आपल्या सागरापासून खारें पाणी आपण घरीं न्यावें !" पुनः सर्वजण हंसूं लागले.

सद्गुरू ह्मणाले " नाहीं, आपण खारे सागर खचित नाहीं ! ईश्वरापासून दूर नेणाऱ्या अशा अविद्येचे सागर आपण नाहीं, तर आपण क्षीरसागर–विद्यासागर ( विद्या–ईश्वराप्रत नेणारें ज्ञान ) आहां ! "

विद्यासागर ह्मणाले " आपण, वाटल्यास, तसें ह्मणावें, महाराज. "

सद्गुरु ह्मणाले "ज्ञानाप्रत नेणाऱ्या सत्वाचाच तुझा स्वभाव बनलेला आहे. तुझें सत्व अशा तऱ्हेचें आहे, कीं, तें तुला तत्परतीत करतें आणि तुझ्या हातून

आसक्तिरहित कर्म.

चांगलें काम करवितें. दान, दया हीं आसक्तिराहित केलीं असतां फार चांगली आहेत. तीं आसक्तिरहित आणि भक्तीनें आचरिलीं असतां त्यानें देव मिळतो. तसंच तुला सिद्ध ह्मणावें इतकी तुझी योग्यता आहे. कारण, तुझें अंत:करण दुसऱ्याविषयीं दयेनें मृदु व सौम्य झालेलें नाहीं काय ? बटाटे आणि इतर भाज्या चांगल्या सिद्ध * झाल्याशिवाय ( शिजल्याशिवाय ) मऊ होत नाहींत ! "

सिद्ध.

विद्यासागर ह्मणाले " पण कलेची डाळ ( Kalai pulse ) बारीक करून शिजविली असतां घट्ट होते. मऊ कधींच होत नाहीं, नाहीं का ? " यावर पुन: हंशा पिकला.

सद्गुरु ह्मणाले " पण महाराज, आपण तसे कांहीं नाहीं ! माझ्या ह्मणण्याचा भावार्थ इतकाच आहे, कीं, आपण नुसते कोरडे आणि शुष्क पंडित नाहीं. पंचांगामध्यें जसें लिहिलेलें असतें, कीं, अमुक दिवशीं २० इंच पाऊस पडेल— पण पंचांग पिळूनहि त्यांतून एक थेंब बाहेर पडेल तर शपथ ! आमचे विद्वान् ह्मणविणारे लोक पुष्कळ मोठमोठ्या गोष्टी सांगतील. ते ब्रह्म, अव्यक्त परमात्मा, ज्ञानयोग, तत्वज्ञान, सांख्ययोग इत्यादि विषयांवर सुंदर प्रवचन करितील; पण त्यांमध्यें आपण उपदेश करितों त्याचा अनुभव घेतलेले असे फार विरळा ! जिच्या योगानें आह्मांला ईश्वराविषयीं ज्ञान होतें, ती परा विद्या; बाकी सर्व शास्त्र, ग्रंथ, तत्वज्ञान, तर्कशास्त्र, व्याकरण इत्यादि इत्यादि निवळ आमच्या मनावर ओझें लादतात आणि आह्मांला घोंटाळ्यांत पाडितात. जेव्हां हीं सर्व पराविद्येला मदत करितात, तेव्हांच तीं चांगलीं, एरव्हीं नाहींत. एका अर्थी पाहिलें तर, सबंध भगवद्गीता वाचण्यांत कांहीं अर्थ नाहीं. 'गीता गीता' असें दहादां ह्मणा ह्मणजे पुरे. कारण, दहादां ह्मटलें ह्मणजे 'त्यागी त्यागी' (तागी) असाहि उच्चार होतो. त्यागी याचा अर्थ 'परमेश्वराकरितां ज्यानें हें जग—पैसा, मान, आसक्तीनें केलेलें कर्म, वैषयिक सुखें इत्यादि टाकून दिलें आहे, ' असा होतो.

पुस्तकी ज्ञानाची किंमत.

भगवद्गीतेचा सारांश.

---

* ' सिद्ध ' याचा अर्थ (१) चांगलें शिजलेलें, अथवा (२) पूर्णतेप्रत पोहोंचलेला मनुष्य असा होतो; सद्गुरूंनीं ' सिद्ध ' या शब्दावर येथें श्लेष साधिला.

## द्वितीय परिच्छेद—अध्याय पहिला.

एका शब्दांत गीता उपदेश करिते कीं, ‘ त्यागी ’ ( टाकून द्या, त्यागी व्हा ). खरा संन्यासी बाहेरून आणि आंतूनहि ( मनापासून ) संसार सोडून देतो. तो ऐहिक कर्मे आणि कर्मफलें टाकून देतो. उत्तम गृहस्थाश्रमी मनांतून संसार टाकून देईल, ह्मणजे ईश्वराप्रीत्यर्थ सर्व कर्मांचीं फलें त्याला अर्पण करील. एवंच, गीतेचा सारांश हा आहे, कीं, हे मानवा ! तूं परमेश्वरावरच प्रीति कर. ईश्वराकरितां सर्व कांहीं टाकून दे. एका साधूपाशीं एक हस्तलिखित ग्रंथ होता. हा कोणता ग्रंथ आहे असें कोणी एकानें त्याला विचारिलें. त्यानें ग्रंथ उघडून पुढें ठेविला, तेव्हां प्रत्येक पानावर फक्त देवाचें नाम–ॐ राम—लिहिलें आहे, असें त्याला आढळून आलें. चैतन्यदेव यात्रेनिमित्त दक्षिणहिंदुस्थानांत फिरत असतां त्यांनां एक भक्त आढळला. एक पंडित गीतेवर निरूपण करीत असतां हा भक्त नेत्रांतून एकसारखे अश्रु ढाळीत असे. हा भक्त निरक्षर होता. तूं कां रडतोस असें विचारल्यावर त्यानें उत्तर दिलें, कीं, गीतेंतील एक शब्दहि मला समजत नाहीं, हें खरें आहे; पण ती गीता ऐकत असतां, माझा परमात्मा शामसुंदर श्रीकृष्ण कुरुक्षेत्रांत अर्जुनासमोर बसला आहे असें माझ्या अंतर्दृष्टीनें दिसल्यावांचून राहत नाहीं. यामुळें माझे नेत्र आनंदाच्या आणि प्रेमाच्या अश्रूंनीं भरून येतात. अशा या निरक्षर मनुष्याला उत्तम ज्ञान प्राप्त झालें होतें. कारण ईश्वरावर त्याची निष्काम भक्ति होती आणि त्याला ईश्वराचा साक्षात्कार घेतां येत असे.

### ज्ञानयोग, वेदान्त किंवा अद्वैत तत्वज्ञान.

**(अ) वेदान्तांतील निर्गुण शुद्ध ब्रह्म.**

सद्गुरु पुढें ह्मणाले “मी मघांशीं विद्येविषयीं बोलत होतों, पण ब्रह्म हें विद्येच्या आणि अविद्येच्या पलीकडे आहे. विद्या ही छपरावर जाणाऱ्या जिन्याची शेवटची पायरी होय. शुद्ध निर्गुण ब्रह्म हें छप्पर होय. माया ही विद्यारूप आणि अविद्यारूप अशी आहे. याकरितां ब्रह्म मायातीत, मायेच्या पलीकडे आहे.

**( आ ) ब्रह्म पूर्ण अनासक्त असतें.**

ब्रह्म हें सुखदुःखाशीं, बऱ्यावाइटाशीं अनासक्त असतें. दिव्याच्या प्रकाशाची उपमा त्याला देतां येईल. त्या प्रकाशाच्या साहाय्यानें तुह्मांला भागवत वाचतां येईल, अगर एकादा खोटा दस्तैवजहि त्याच प्रकाशांत करून घेतां घेईल. पुन्हां ब्रह्म हें

सर्पाप्रमाणें आहे. सर्पाच्या मुळयांत विष असतें; पण त्याला त्याचा कांहींच त्रास होत नाहीं. विषाचा परिणाम त्याच्यावर कांहीं होत नाहीं किंवा त्यामुळें त्याला मरण येत नाहीं. दुसऱ्या प्राण्यांनां सर्प चावावयास येतो तेव्हां त्यांनां मात्र तें विष असतें. या जगामध्यें जें कांहीं दुःख, पाप आणि अनिष्ट आढळतें तें आमच्या सापेक्ष दृष्टीनें आह्मांला दुःख, पाप, अनिष्ट आहे; ब्रह्मावर त्याचा कांहीं परिणाम होत नाहीं. ब्रह्म अशा सर्व वस्तूंपासून अलिप्त व दूर आहे. ज्याप्रमाणे सर्पाच्या सुळयांतील विष त्या सर्पाला विष (कारक) नसतें, त्याप्रमाणें या सृष्टींतील दुःख ब्रह्मास दुःख (कारक) नसतें. ब्रह्म सुखदुःखाच्या पलीकडे आहे. होय, ती वस्तु पूर्ण अनासक्त आहे. सुखदुःखाच्या कोणत्याहि मानवी मापानें तिचें परीक्षण करूं नये. तिचा प्रकाश इष्टानिष्टांवर सारखाच पडत असतो. शास्त्रें, वेद, पुराणें, तंत्रें आणि इतर धर्मग्रंथ इत्यादि सर्व कांहीं फक्त एक अपवाद खेरीज करून मनुष्यांनीं उच्चारिल्यामुळें जणूं काय उच्छिष्ट आहेत. अपवाद काय तें ब्रह्मच. कारण, वेद आणि इतर धर्मग्रंथ वाचतांना वाचेचा उपयोग करून तोंडानें ते वाचावे लागतात. याप्रमाणें मुखाचा स्पर्श झाल्यामुळें ते उच्छिष्ट झाले आहेत. पण अव्यक्त ब्रह्माविषयीं या जगांत कोणालाहि योग्य आणि चांगलें वर्णन करितां आलें नाहीं. ब्रह्म अचिंत्य, अनिर्वाच्य आणि अगम्य असें आहे."

**सुखदुःखाच्या प्रश्नाचा निवाडा.**

**(इ) ब्रह्म अव्यपदेश्य आहे.**

विद्यासागर ह्मणाले "मला हें कबूल केलें पाहिजे, कीं, मी आज थोडेंसें नवीन शिकलों. तोंडानें उच्छिष्ट झाली नाहीं अशी एकच वस्तु-ब्रह्म आहे."

सद्गुरु ह्मणाले "होय, तें तसें आहे. ब्रह्म हें देश, काल, निमित्त यांनीं मर्यादित नाहीं. त्याचें तोंडानें कसें वर्णन करितां येईल? ब्रह्म हें अगाध सागराप्रमाणें आहे. सापेक्षता, सत्ता इत्यादि मर्यादेच्या पलीकडे असलेल्या वस्तूविषयीं—ब्रह्माविषयीं कांहींच सांगतां येत नाहीं. येथें वेदसुद्धां थकले आणि ती वस्तु अखंड आनंद आहे, एवढेंच शेवटीं सांगून त्यांनीं मौन धरिलें. सागराचें वर्णन करण्यास सांगितलें तर तुह्मी तोंड उघडून अडखळत बोलतां कीं, काय हा विस्तार! किती उंच लाटा! काय ही अविरत आणि सदैव चाललेली गर्जना! इतकेंच काय तें तुह्मी सांगूं शकतां! शुकदेवांनीं आणि त्यांच्यासारख्या

# द्वितीय परिच्छेद--अध्याय पहिला.

दुसऱ्या महर्षींनीं ह्या अमृतोदधीचें दर्शन घेतलें आणि त्यांतील जीवनाला स्पर्श करून त्याचे एकदोन घोट घेतले! शुकदेवांनीं त्या सागरांत प्रवेश केला असता तर ते त्यांतच लय पावले असते आणि मग परत या जगीं आले नसते.

**( ई ) सापेक्षज्ञानाला हें परम गुह्य उकलत नाहीं. मुंग्या आणि साखरेचा पर्वत यांची गोष्ट.**

एकदां कांहीं मुंग्या एका साखरेच्या पर्वताकडे आल्या. पर्वत एवढा मोठा असेल ही कल्पना त्यांनां नव्हती. त्यांनीं साखरेचे कांहीं कण खाल्ले आणि त्यांचें पोट भरलें. परत जातांना एकेक कण घेऊन त्या निघून गेल्या. वाटेंत, दुसऱ्या खेपेस हा सर्व पर्वत आपल्या वारुळाकडे घेऊन जाऊं, असा त्यांनीं विचार केला. मनुष्याची स्थिति अशीच आहे! ब्रह्माचा साक्षात्कार घेण्याचें फारच थोड्यांनां साधतें पण आपणाला ब्रह्माचा साक्षात्कार झाला आहे, पूर्ण अनुभव आलेला आहे, अशी खोटी कल्पना कित्येकजण करून घेतात, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. मुंगीला वाटतें, कीं, साखरेचा सगळा पर्वत आपण वारुळांत नेला! कारण थोड्याशा कणांनीं पोट भरून तिची तृप्ति झालेली असते. आत्मवंचक युक्तिवाद्यांची स्थिति अशीच असते. आपल्या औंसभर तर्कानें--युक्तीनें त्यांचें समाधान होतें; तस्मात् त्याला ब्रह्म समजलें आहे! ब्रह्म ह्मणजे काय आहे आणि काय नाहीं हें सर्व तो जाणतो! अमर्याद, अव्यक्त अशा ब्रह्माविषयीं लोक मोठमोठ्या गप्पा मारितात. जणूं काय त्यांनां ब्रह्म पूर्ण अवगत आहे! शुकदेव आणि इतर महर्षि यांनां फार झालें तर मोठ्या मुंग्या ह्मणतां येईल. त्यांनां साखरेचे आठ किंवा दहा कण खातां आले, असें ह्मटलें तर बस्स होईल. कांहीं मुंग्यांनीं साखरेचा पर्वत वारुळात नेला हें विधान जितकें हास्यास्पद होईल, तितकेंच एकाद्याला ब्रह्म पूर्ण अवगत झालें हेंहि होईल. शिव ( परमात्मा ) आणि जीव ( जीवात्मा ) यांचें ऐक्य करणें हें वेदान्त्याचें ध्येय आहे.

**( उ ) वेदान्त्यांचे ध्येय. मिठाच्या बाहुलीची गोष्ट.**

समुद्राचा ठाव पाहण्याच्या हेतूनें एक मिठाची बाहुली समुद्राकडे गेली. तिच्या हातांत बुडीद ( तळ पाहण्याचा दोर व शिश्याचें वजन ) होता. किनाऱ्यावर येतांच तिनें आपल्यासमोरील पाण्याचा विस्तार पाहिला. एथपर्यंत तिचा बाहुलीपणा, तिचें व्यक्तित्व कायम होतें पण तिनें एक पाऊल उचलून पाण्यांत पाय घातला नाहीं, तोंच ती समुद्राशीं एकरूप

होऊन गेली—गेली—दिसेनाशी झाली ! समुद्राच्या पाण्यांत बाहुलीचा प्रत्येक परमाणु विरघळून गेला. ज्या मिठाची ती बाहुली केली होती तें समुद्राचेंच मीठ होतें आणि तें पुन्हां समुद्रांतच जाऊन मिळालें. ‘ व्यक्त ’ पुन्हां ‘ अव्यक्ताशीं ’ मिळून गेलें. जीवात्मा मिठाची बाहुली होय आणि परमात्मा ( ब्रह्म ) अनंत सागर होय. अगाध सागराची खोली सांगण्यास मिठाची बाहुली पुन्हां परत आली नाहीं ! व्यक्तित्वविनाशक निर्विकल्प समाधीमध्यें जो सुदैवानें ब्रह्माचा साक्षात्कार घेतो त्याची स्थिति अशीच होते. अव्यक्तांत लीन झाल्यामुळें तो पुन्हां त्या अगाध सागरांतून जगाला अव्यक्त, अनंत अशा परमात्म्याचें स्वरूप सांगण्यास यत नाहीं. माझ्या ‘ माते ’च्या कृपेनें त्या मिठाच्या बाहुलीला पुन्हां व्यक्त स्थितीत येतां आलें, तर व्यक्त मायिक भाषेंतच तिला बोललें पाहिजे. दृश्य जगाच्या रहिवाशाप्रमाणे तिला वागलें पाहिजे. या परम गुह्याची ( ब्रह्माची ) उपपत्ति लागत नाहीं, याचे कारण हेंच आहे. निरपेक्ष, अमर्याद अशी वस्तु सापेक्ष, व्यक्त आणि मर्यादित शब्दांनीं सांगतां येत नाहीं. अनंताचें वर्णन अंतवंत भाषेंत करितां येत नाहीं.”

**ब्रह्म अनिर्देश्य आहे; वेदांतील पिता आणि पुत्र-द्वय यांची गोष्ट.**

सद्गुरु पुढें ह्मणाले “एका बापाला दोन मुलें होती. तीं वयांत आल्यावर त्यांनां पहिल्या ह्मणजे ब्रह्मचर्य आश्रमांत घातलें आणि एका गुरूपाशीं ठेवून त्यांनां वेद आणि इतर धर्मग्रंथ यांचा अभ्यास करावयास लाविलें. याप्रमाणें कांहीं दिवस लोटल्यावर आपल्या पुत्रांचा अभ्यास कसा काय चालला आहे हें जाणण्याची बापास इच्छा झाली. त्यानें त्यांनां बोलावून आणून ‘ मुमुक्षूला उत्तम ज्ञान प्राप्त करून देणारा वेदान्त तुह्मीं वाचिला आहे किंवा नाहीं ? ’ ह्मणून विचारिलें. दोघांनीं ‘होय’ असें उत्तर दिलें. यावर बाप ह्मणाला ‘ एकूण तुह्मीं वेदान्त वाचला आहे. बरें तर, ब्रह्म ह्मणजे काय तें सांगा पाहूं ?’ थोरल्या मुलानें वेद आणि इतर ग्रंथ यांतील उतारे ह्मणून दाखवून सांगितलें ‘बाबा, तें अवाङ्मनोगोचर–वाणीला आणि मनाला न समजणारें–असें आहे. तें असें आहे, तसें आहे, मला सर्व माहीत आहे. ’ बाप ह्मणाला ‘ बरें, पुरे कर. एकूण ब्रह्म तुला समजलें. आतां लाग तूं आपल्या कामाला.’ नंतर दुसऱ्या मुलाला त्यानें विचारिलें ‘ बरें, तुझें काय ह्मणणें आहे ? ’ दुसऱ्या मुलानें आपली मान एकदम खालीं घातली आणि तो स्वस्थ बसला. त्याच्या मुखांतून एकहि

शब्द बाहेर येईना. त्यानें उत्तर देण्याचा प्रयत्न केला नाहीं. या स्थितींत तो बराच वेळ होता. यावर बाप ह्मणाला ‘ बाळ, तूंच बरोबर आहेस ! अमर्याद आणि अव्यक्त ब्रह्माविषयीं कांहींच सांगतां येणार नाहीं. ब्रह्माविषयीं आह्मी कांहींहि बोलूं लागलों ह्मणजे अमर्याद, अव्यक्त असें तत्व मर्यादित शब्दांत सांगावें लागतें. ह्मणून तुझें मौनच शंभर श्लोक किंवा शास्त्रवचनें यांपेक्षां अधिक वक्तृत्वपूर्ण आहे.’ खरेंच, ज्याला खरें ज्ञान प्राप्त झालें आहे, तो भाषण, वाद-विवाद सोडून देतो. ब्रह्माचा साक्षात्कार घेतला पाहिजे.

साक्षात्कार.

ब्रह्माचें वर्णन करितां येत नाहीं किंवा वर्णन करून तें समजत नाहीं. संशय किंवा वादविवाद बंद होणें हीच खऱ्या ज्ञानाची किंवा साक्षात्काराची खूण होय. चुलीवर ठेवलेल्या भांड्यांत लोणी कुठपर्यंत आवाज करितें ? अर्थात् आंतील सर्व पाणी नाहींसें होण्या-इतकी उष्णता मिळेपर्यंत. पूर्ण तापलेलें नसलें ह्मणजे लोण्याला उकळ्या फुटतात आणि त्यांतून ‘ कुळकुळ ’ असा ध्वनि येतो. ज्याला खरें ज्ञान प्राप्त झालेलें आहे, ज्याला ब्रह्माचा साक्षात्कार झालेला आहे, अशा मनुष्यास योग्य उष्णता मिळेपर्यंत कढविलेलें आणि त्यामुळें निःशब्द झालेलें लोणी याची उपमा देतां येईल. मुमुक्षु ह्मणजे न तापलेलें लोणी होय. त्यांत मिसळलेलें पाणी विस्त-वाच्या उष्णतेनें निघून गेलें पाहिजे. हें पाणी ह्मणजे अहंकार होय आणि तो निघून जात असतां बराच आकांत करितो. अहंकाररूपी पाणी निघून गेलें ह्मणजे लोणी पक्कें झालें. मग शब्द नाहीं, गडबड नाहीं, कांहीं नाहीं ! लोण्यांतील सर्व गाळ भांड्याच्या तळाशीं बसतो. कनक आणि कांता यांविषयीं आसक्ति आणि त्यापासून होणार दुष्परिणाम ( विषयाधीनता, आसक्तीनें केलेलीं कर्में इत्यादि ) हीं गाळ होत. अथवा पक्का किंवा पूर्ण मनुष्य पाण्यानें भरलेल्या घागरीप्रमाणें आहे. घागर भरत असतां ‘ भक्‌भक् ’ असा आवाज होत असतो. घागर भरली ह्मणजे तो आवाज बंद होतो. हा आवाज ह्मणजे माझ्या ‘माते’च्या कृपेनें खऱ्या ज्ञानाप्रत नेणारा तर्क किंवा बुद्धिवाद होय. तो आवाज, घट भरला नाहीं असें सांगतो. ध्येय प्राप्त झालें नाहीं असें तर्क ( विचार ) सिद्ध करितो. फुलावर येऊन बसला नाहीं, आणि मध प्राशन करण्यास सुरुवात केली नाहीं, तोंपर्यंत भ्रमर गुड्गुड् असा आवाज करीत असतो. मध चाखण्यास सुरुवात केली ह्मणजे त्याचें गुणगुणणें बंद होतें. येथें असा एक प्रश्न येतो, कीं, सद्गुरु आणि

त्याचे शिष्य यांमधील नात्याचें समर्थन आह्मीं कसें करितों? शिष्यांचें अज्ञान नाहींसें करण्याकरितां गुरूला बोललें पाहिजे. हा तर्काचा, विचाराचा प्रकार आहे. पण यापासून कांहीं तोटा नाहीं. विस्तवावर ठेविलेलें भांड्यांतील लोणी, पूर्ण तापलें ह्मणजे आवाज करीत नाहीं, हें खरें, पण त्यांत एक कच्ची पुरी टाका पाहूं. मग त्या पुरींतील पाण्याशीं संयोग पावल्यानें तापलेलें लोणी पुन्हां शब्द करितें. पुरी पक्की तळली जाऊन तयार होईपर्यंत आवाज होत असतो. पुरी ह्मणजे शिष्य होय. ( गुरूनें ) पुन्हां आवाज सुरू करणें ह्मणजे शिष्याला ज्ञान प्राप्त होण्यासाठीं गुरूला करावा लागणारा बुद्धिवादाचा प्रयत्न होय. आवाज बंद होणें ह्मणजे शिष्याला प्रकाश मिळाल्यामुळें गुरूचें बोलणें खुंटणें हें होय. ह्या सर्व सिद्धांतांचा मथितार्थ हाच आहे, कीं, आत्म्याला आत्माच जाणतो.

**खऱ्या ज्ञानानंतर तर्क किंवा विचार शक्य आहे काय ?**

परमात्म्यालाच परमात्मवस्तूचा साक्षात्कार होतो. जीवात्मा व्यक्त आणि मर्यादित स्थितींत, खालच्या पायरींत असेतोंपर्यंत त्याला परमात्म्याचा साक्षात्कार होत नाहीं. अव्यक्तालाच अव्यक्ताचा अनुभव येतो. ' परमेश्वर अज्ञात आणि अज्ञेय आहे ' याचा खरा अर्थ हाच आहे. हा सर्व भेद मायेमध्येंच होतो. किंवा दुसऱ्या शब्दांनीं सांगावयाचें ह्मणजे मायाच हा भेद ( वर्गीकरण ) उत्पन्न करिते, मायेबरोबरच भेद नाहींसा होतो.

**आत्माच काय तो आत्म्यास जाणतो.**

या विश्वांतील सर्व गोष्टी, प्रत्येक वस्तु, सृष्टि, स्थिति, लय, शरीर, मन, बुद्धि यांनां प्रतीत होणारे विषय, जागृति, स्वप्न, सुषुप्ति, आणि तुर्या (ध्यान) या अवस्थेंतील गोष्टी इत्यादि सर्व गोष्टी मायेंत मोडतात. शंकराचार्यादिकांच्या मताप्रमाणें वेदान्ताचा अर्थ लावणारे ज्ञानी ह्या सर्व गोष्टी मिथ्या आहेत असें समजतात. त्यांच्या मतें ब्रह्मच काय तें एक सत्य आहे, जगत् मिथ्या (ब्रह्माच्या दृष्टीनें) आहे. ब्रह्माला— अव्यक्ताला हें विश्व, मनुष्य किंवा इतर प्राणी ( जीव ) मिथ्या आहेत; कारण सत्य काय तें एक ब्रह्म आहे. आह्मी सत्य आहों अशी जोंपर्यंत आमची खात्री आहे, तोंपर्यंत ' जगत् मिथ्या ' आहे असें ह्मणणें ह्मणजे वेडगळपणा आहे. ज्याला ब्रह्माचा साक्षात्कार झाला नाहीं त्याला जगत् मिथ्या आहे हा अनुभव येत नाहीं. उलटपक्षीं, एकादा साधु समाधींतून खालच्या पायरीवर माझ्या ' माते'च्या कृपेनें

**माया मिथ्या आहे. शंकराचार्यांचा वेदान्त.**

आला, ह्मणजे त्याला त्याचा व्यक्त, विरळ पण शुद्ध असा अहंकार परत मिळतो. अहंकार परत मिळाल्यावर साधु पुन्हां या सापेक्ष दृश्य जगांत येतो. अहंकार जोंपर्यंत सत्य आहे, तोंपर्यंत जगत्‌हि त्याला सत्य आहे; आणि ब्रह्म (सापेक्षतेनें) असत्य आहे. व्यक्त अहंकारयुक्त अशा त्या साधूला मग ही माया सत्य दिसूं लागते. ईश्वरी साक्षात्कारामुळें त्याचा अहंकार शुद्ध झालेला असल्यामुळें जगत् त्याच्या इंद्रियांला परमात्म्याचें व्यक्तस्वरूप दिसतें. माया (१) विद्या किंवा (२) अविद्या अशी त्याला द्विधा भासते. विद्या ईश्वराप्रत नेते. विवेक, वैराग्य भक्ति इत्यादिकांचा विद्येंत समावेश होतो. अविद्या ईश्वरापासून दूर नेते. कामिनी, कांचन, मान, आसक्तीनें केलेलें कर्म, हीं अविद्येंत येतात. ज्यांनीं समाधींत निर्गुण आणि सगुण अशा परमात्म्याचा साक्षात्कार घेतलेला आहे अशा लोकांनां विज्ञानी असें ह्मणतात. विज्ञानी याचा शब्दशः अर्थ 'ईश्वराचें विशेष ज्ञान प्राप्त झालेला' असा आहे. विज्ञान्यांनां अनुभवानें असें कळलें आहे, कीं, ज्यानें आदिशक्ति या नात्यानें हा भेद—ह्मणजे ईश्वर, माया, आत्मा आणि विश्व,—उत्पन्न केला आहे, तो परमात्माच (ब्रह्म) आहे. त्यांनीं (आपल्या) आंत व बाहेर परमेश्वराला पाहिलेलें आहे. आणि प्रत्यक्ष परमेश्वरापासून हें सत्य त्यांनां कळलेलें आहे. सगुण परमात्म्यानें त्यांनां असें सांगितलें आहे, कीं, समाधीमध्यें प्रत्ययास येणारें उपनिषदांत सांगितलेलें ब्रह्म मीच आहें. मीं हा भेद निर्माण केला आहे. मीं चोवीस पदार्थांचा,—जीवात्म्याचा आणि जगताचा—उत्पादक (मूळ) आहें. सृष्टि, स्थिति आणि संसार इत्यादि वैचित्र्य उत्पन्न करणारा हा सगुण परमात्मा आपल्या भक्तांनां आणि विज्ञान्यांनां निरनिराळ्या स्वरूपांत गुणविशिष्ट असा व्यक्त होतो. सगुण परमात्म्याचा सत्वगुण संरक्षण करितो, रजोगुण निर्माण करितो आणि तमोगुण संहार करितो. हे तिन्ही गुण परमात्म्यांत वास करितात. पण तो त्या गुणांमध्यें नाहीं. तो पूर्ण अनासक्त आहे. शुद्ध अहंकारयुक्त होऊन विज्ञान्यांनीं सगुण आणि निर्गुण परमात्म्याचें दर्शन घेतलें आहे. आपल्या अंतर्यामीं आणि बाहेर त्यांनीं परमेश्वराचे शब्द ऐकिले आहेत. इतकेंच नव्हे, तर त्यांचें त्याच्याशीं भाषणहि झालेलें आहे. त्यांनीं त्याची, पिता, माता, पुत्र-कलत्र, सखा, सोयरा, बंधु इत्यादि नात्यानें सेवा केली

साक्षात्कार, अद्वैती आणि द्वैती यांची एकवाक्यता.

निर्गुण आणि सगुण परमात्म्याविषयीं एकच प्रमाण. साक्षात्कार.

आहे. विज्ञानी लोकांच्या अनुभवावरून पाहतां माया किंवा शक्ति ही मिथ्या नसून ती पवित्र अशा जीवात्म्याच्या दृष्टीला, मानवी व इतर प्राण्यांचें किंबहुना सर्व विश्वाचें उगमस्थान असें सगुणरूप आहे. हें विधान अनुभवाचें असल्यामुळें यांत चूक होणें शक्य नाहीं. ऋषींनांहि परमात्म्यानें आपलें सगुण आणि निर्गुण स्वरूप दाखविलें आहे. मानव जातीच्या उद्धारार्थ आणि भक्तांच्या प्रेमासाठीं अशीं दर्शनें वेळोवेळां घडतात.

**निर्गुण आणि सगुण परमात्मा.**

परमात्मा निष्क्रिय आहे, सृष्टि, स्थिति आणि संहार तो करीत नाहीं असा जेव्हां मी त्याविषयीं विचार करितों, तेव्हां त्याला निर्गुण ब्रह्म किंवा पुरुष असें मी ह्मणतों; पण तो कर्ता असून सृष्टि, स्थिति, लय करितो असा जेव्हां मी विचार करितों, तेव्हां त्याला शक्ति, माया, प्रकृति, सगुणब्रह्म असें मी ह्मणतों.

**दृष्टांताचा उपयोग.**

उपमा उपमेयाशीं तंतोतंत जुळतात असें नाहीं. उपमा एकदेशीय असतात आणि उपमेय पदार्थांचा कांहीं विशिष्ट व अज्ञात भाग तेवढाच प्रकाशित करितात. उदाहरणार्थ 'तो वाघ आहे' याचा अर्थ त्याला वाघाचें डोकें, दांत, नखें, शेंपूट सर्व कांहीं आहे असा घ्यावयाचा नाहीं; तर 'तो वाघासारखा भयंकर दिसतो' एवढाच त्याचा अर्थ आहे. सगुण आणि निर्गुण परमात्म्याचा संबंध कोणत्याहि उपमेनें स्पष्ट करितां यावयाचा नाहीं. त्याचा अनुभव घेऊन पाहिला पाहिजे. परंतु इंद्रियातीत अशा पुष्कळ आध्यात्मिक बाबींचा खुलासा उपमांच्या योगानें होतो आणि बऱ्याच गोष्टींचें यथार्थ ज्ञान आह्मांला प्राप्त होतें. खरोखर पहातां

**एकच वस्तु.**

निर्गुण आणि सगुण परमात्म्यांत भेद दिसतो, पण वास्तविक भेद मुळींच नाहीं. निर्गुण व सगुण हीं एकच आहेत. अग्नि आणि त्याची दाहकशक्ति ही जशी एकच आहेत, त्याप्रमाणें निर्गुण आणि सगुण परमात्मा एकच आहे. दाहकशक्तीहून अग्नि भिन्न आहे, अशी कल्पनाच करितां येत नाहीं. दूध आणि दुधाची शुभ्रता याप्रमाणेंच निर्गुण आणि सगुण परमात्मा एकच आहे. शुभ्रतेची कल्पना आल्याशिवाय दुधाची कल्पना कोणासहि करितां यावयाची नाहीं. रत्न आणि त्याचें तेज हीं जशीं एकच, तसें तींहि एकच. तेजावांचून रत्नाची कल्पनाच करितां येत नाहीं. सर्प

(नागमोडीसारखें चालणें) आणि त्याची वक्रगति हीं जशीं एकच, तसें तेंहि एकच. वक्रगतीवांचून सर्पाची कल्पनाच नीट करितां येत नाहीं."

## अध्याय दुसरा.

## सर्वशक्तिमती अंबा.

देव पक्षपाती आहे काय? सर्व मनुष्यें सारखीं आहेत काय?

सद्गुरु ह्मणाले "मीं सांगितलेंच आहे, कीं, सगुण परमात्मा सृष्टि, स्थिति आणि संहार करितो. तो विद्याशक्ति आणि अविद्याशक्ति या रूपांनीं व्यक्त झालेला आहे. भिन्नभिन्न केंद्रांमध्यें–मनुष्यांमध्यें आणि इतर प्राण्यांमध्येंहि सर्वशक्तिमती शक्ति कमीजास्त प्रमाणांत असते. कारण वैचित्र्य हाच नियम आहे, समता नव्हे."

यावर पंडित विद्यासागरांनीं विचारलें "तर मग आह्मी जगामध्यें विषम गुण पदरीं बांधून येतों काय? आणि कांहीं शेलक्या मंडळीवर ईश्वराची विशेष मेहरनजर आहे काय?"

सद्गुरु ह्मणतात "त्याला काय करणार? या जगांतील गोष्टी आहेत तशा घेऊन चाललें पाहिजे. ईश्वराची लीला मनुष्याला नीट समजणें शक्य नाहीं. परमेश्वर 'विभु' असल्यामुळें तो सर्व प्राण्यांमध्यें–सर्व वस्तूंमध्यें, मुंगीसारख्या अतिशय सूक्ष्म प्राण्यांमध्येंहि आहे. ईश्वर सर्वांमध्यें आहे हें खरें, पण प्राण्यांचे गुण व शक्ति भिन्नभिन्न असतात ही गोष्ट निर्विवाद आहे. अशी जर स्थिति नसती, तर एकादा मनुष्य दहाजणांस भारी होतो व त्यांनां चीत करितो, हें कसें? आपल्यापेक्षां भारी असलेल्या गड्याला पाठ दाखवून एकादा गडी पसार होतो, हें सर्वांनां ठाऊक आहेच. ही शारीरिक बलाची गोष्ट झाली. नैतिक आणि आध्यात्मिक बलाची स्थिति पण अशीच आहे. आध्यात्मिक बलांमध्यें भिन्न भिन्न पायऱ्या आहेत. मी आपणास असें विचारतों कीं, बाकी इतर लोकांपेक्षां सर्व लोक आपणास अधिक मान कां देतात? तुम्हीं एक चित्रविचित्र प्राणी आहां, तुमच्या कपाळावर दोन शिंगें आहेत ह्मणून सर्व लोक तुम्हाला पाहण्यास येतात असें तर नाहींना?" सर्व मंडळी हंसते.

सद्गुरु पुढें ह्मणतात "तसें नव्हे. वैचित्र्य हाच नियम आहे आणि माझी जगन्माता या अनेक रूपांनीं व्यक्त झाली आहे. तिची शक्ति अमर्याद

असल्यामुळें शारीरिक, नैतिक आणि आध्यात्मिक बलांत व गुणांत अगदीं भिन्नभिन्न असलेले सर्व निरनिराळे जीव आणि जगतांतील सर्व वस्तु यांच्या रूपानें तीच अनेकत्वानें नटली आहे. आणि माझी 'जगन्माता' वेदान्तांत सांगितलेल्या ब्रह्माहून निराळी नाहीं."

नंतर सद्गुरु गाऊं लागले.

के जाने काली केमन ?
षडदर्शने ना पाय दरशन ।
मूलधारे सहस्त्रारे सदा योगी करे मनन ।
काली पद्मबने हंससने हंसीरूपे करे रमण ॥
आत्मारामेर आत्मा काली प्रमाण प्रणवेर मतन ।
तिनि घटे घटे बिराज करेन इच्छामयीर इच्छा जेमन ॥
मायेर उदरे ब्रह्माण्ड भाण्ड प्रकाण्डता जान केमन ।
महाकाल जेनेछेन कालीर मर्म अन्य केरा जाने तेमन ॥
प्रसाद भाषे लोके हासे सन्तरणे सिन्धु तरण ।
आमार मन बुझेछे प्राण बुझे ना धर्बे शशी हये वामन ॥

गाणें संपल्यावर सद्गुरु समाधिअवस्थेंत गेले आहेत असें दिसून आलें.

**समाधि. समाधींतील साक्षात्कार.**

त्यांची दिव्य वाणी स्तब्ध झाली. बाह्य दृष्टि स्थिर आणि एकाग्र झालेली आहे, अंतर्दृष्टि आंतील दिव्य साक्षात्कार पहात आहे. सद्गुरु कांहीं वेळ या दिव्य स्थितीचा अनुभव घेत होते. त्यांच्या चेहऱ्यावर स्वर्गीय तेज आणि हास्य विलसत होतें.

अर्धेमुर्धे देहभानावर येऊन सद्गुरु पुढें ह्मणतात "होय, माझी 'माता' ब्रह्माहून कांहीं निराळी नाहीं. षड्दर्शनाला व त्यांतील वादविवादाला तिचा थांग लागत नाहीं. मातेनें अहंकार नष्ट केल्यावर समाधीमध्यें निर्गुणाचा साक्षात्कार येतो.

**सर्वशक्तिमती माता.**

हा जीवात्म्याला येत नाहीं, तर निर्गुणाचा साक्षात्कार निर्गुणालाच होतो. शुद्ध सात्विक अहंकार आपण ठेविला तर, तिच्या ( अंबेच्या ) कृपेनें, श्रीकृष्ण, चैतन्यदेव यांचा किंवा दुसऱ्या दैवी अवतारांचा, स्त्री, पुरुष, मुलें किंवा चोवीस पदार्थ इत्यादि अवतारांचा सगुण साक्षात्कार होतो. निर्विकल्प समाधीमध्यें अहंकार

नाहींसा करून टाकणें हें माझ्या 'माते'च्या—सगुण परमात्म्याच्या मर्जीवर आहे. अहंकार नाहींसा करून टाकिला ह्मणजे समाधीमध्यें निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार होतो. केव्हां केव्हां आपल्या भक्तांचा अहंकार माझी 'माता' ठेविते आणि सगुण-रूप धारण करून आपण त्यांच्याशीं भाषण करिते. निर्गुणाचा साक्षात्कार मिळणें हें सगुण परमात्म्याच्या, भक्तांच्या सगुण देवतांच्या मर्जीवर आहे. ज्ञान्याची सर्व मदार ज्या विचार (तर्क) शक्तीवर आहे ती माझ्या मातेपासून प्राप्त होते. तसेंच प्रार्थना, ध्यान, आत्मसमर्पण इत्यादि सर्व कांहीं माझ्या सर्वशक्तिमती मातेपासूनच मिळते."

**साक्षात्कार विरुद्ध बुद्धि (तर्कशक्ति). सगुण ब्रह्म कसें सिद्ध होतें? निर्गुण ब्रह्म कसें सिद्ध होतें?**

सद्गुरु पुढें ह्मणतात "ज्ञानी केव्हां केव्हां समाधिस्थितींत ठेविला जातो, आणि केव्हां केव्हां ठेविला जात नाहीं. ह्या दिव्य स्थितींत—समाधींत त्याला कोण ठेवितो, समाधींतून त्याला देहभानावर कोण आणितो? सगुण परमात्मा, माझी 'माता'च हें सर्व कांहीं करिते. असा हा परमात्मा मिथ्या असूं शकणार नाहीं. जें कांहीं एक सत्य (वेदान्तांत सांगितलेलें)—ब्रह्म आहे, त्याचें एक अंग तो आहे. माझ्या मातेनें आपल्या मुलांनां—भक्तांनां असें सांगितलें आहे, कीं,—'मी आहें, मी विश्वमाता आहें, वेदान्तांत सांगितलेलें ब्रह्म मी आहें, उपनिषदांतील आत्मा मीच आहें.' याप्रमाणें सगुण परमात्मा स्वतः प्रगट होतो; हाच त्याच्या अस्तित्वाचा पुरावा. निर्गुणाचा साक्षात्कार सगुण परमात्माच करून देतो. समाधीमध्यें साधूला निर्गुणाविषयीं कांहींच सांगतां येत नाहीं. अगाध सागरामध्यें विरघळून जाणाऱ्या मिठाच्या बाहुलीप्रमाणें तो लीन होऊन जातो! समाधींतून उतरल्यावरहि निर्गुणाविषयीं त्याला कांहीं सांगतां येत नाहीं. एकदां अहंभावावर तो आला म्हणजे तो निर्गुणाविषयीं मुका असतो. सापेक्ष जगामध्यें अव्यक्त, निर्गुण ब्रह्माविषयीं त्याच्या तोंडांतून एक अक्षरहि निघत नाहीं."

सद्गुरु पुढें ह्मणाले "माझी 'माता' (सगुण परमात्मा) ह्मणते, कीं, उपनिषदांत सांगितलेलें निर्गुण ब्रह्म मीच आहें. एवंच साक्षात्कार हाच निर्गुण ब्रह्माचा पुरावा आहे. निर्गुण ब्रह्माचें वर्णन कोणी कसें जरी करूं लागला तरी त्या वर्णनामध्यें त्याचा अहंभाव येणारच. त्याचे निर्गुणब्रह्म त्याच्या अहंकारानें आच्छादित असणार. खरोखर, आमच्या दुर्बळ विचारशक्तीनें आणि तर्कानें

आह्मी ब्रह्माचें आकलन करूं शकणार नाहीं. ह्मणून साक्षात्कार किंवा प्रत्यय हाच तरणोपाय आहे, तर्क किंवा बुद्धिवाद नव्हे. सगुणपरमात्म्याच्या दैवी रूपाचें दर्शन शुद्ध पवित्र जीवालाच होतें. दुसऱ्या शब्दांनीं सांगावयाचें ह्मटल्यास ईश्वरापासून प्राप्त झालेल्या भगवतीतनूच्या आध्यात्मिक दृष्टीलाच हीं दैवी रूपें गोचर होतात. प्रत्येकाला हीं दैवी रूपें दृष्टीस पडत नाहींत. फक्त माझ्या 'माते'च्या कृपेनें हीं सिद्धालाच दृष्टीस पडतात."

**ईश्वराचीं आध्यात्मिक रूपें.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "एकदां श्रीरामचंद्र आपल्या भक्ताला ( हनुमानाला ) ह्मणाले 'माझ्या मारुतिराया ! तूं मला कोणत्या नात्यानें पहातोस व माझें ध्यान कसें करतोस हें सांग पाहूं ?' मारुतिरायानें उत्तर दिलें 'हे रामा, जेव्हां 'मी देह आहें' ही भावना मला चिकटते तेव्हां आपण पूर्ण परमेश्वर आहां असें मानून मी आपली पूजा करितों व मी परमात्म्याचा अंश आहें असें मला स्वतःला मानतों. केव्हां केव्हां आपण माझे स्वामी आहां असें मी ध्यान करितों आणि मी आपला नोकर आहें असें स्वतःला समजतों; पण जेव्हां जेव्हां मला निर्गुणाचें ज्ञान—तत्वज्ञान होतें, तेव्हां 'मी तूं आहें' आणि 'तूं मी आहेस' असें मी पाहतों, असा मला साक्षात्कार येतो.* मारुतिरायाचा भावार्थ हा आहे, कीं, समाधीनंतर त्याचा अहंकार रामामध्यें लीन होत असे. राम ह्मणजे निर्गुण परमात्मा असें तो मानीत असे. ब्रह्मज्ञान तें हेंच."

**ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग हे दोन्हीहि सारखेच साक्षात्कार करून देतात.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "अशी कल्पना करा कीं, जिकडे तिकडे, वर खालीं सर्व बाजूंस पाणी पसरलें आहे. थंडीच्या संसर्गानें यांतील कांहीं पाणी गोठून घट्ट झालें आहे, असें समजा; पण त्याच बर्फाला जर ऊन लागलें, तर तें वितळून पुन्हां पाणी होईल. निर्गुण परमात्मा हा पाण्याचा अनंत विस्तार होय. पाण्याचे बर्फ झालेले भाग ह्मणजे भक्तांनां दिसणारीं परमात्म्याचीं साकार रूपें होत. थंडी ह्मणजे भक्तांचें प्रेम, भक्ति आणि शरणागतता होय.

**पाण्याचा बर्फाशीं, बर्फाचा पाण्याशीं संबंध.**

---

* "देहबुद्धया तु दासोऽहं, जीवबुद्धया त्वदंशकः आत्मबुद्धया त्वमेवाहम्."

ऊन ह्मणजे आत्मानात्मविवेक होय. यानें निर्विकल्प समाधि लागून अहंकाराचा समूळ नाश होतो. भक्ताला ईश्वर अनेक रूपांनीं दिसूं शकेल, पण माझ्या ‘ माते’च्या कृपेनें समाधींत जर त्याला ब्रह्मज्ञान होईल तर परमात्मा पुन्हां त्याला निर्गुण अव्यक्त असा होईल ( दिसेल ). आणि यांत ज्ञानमार्गाचा आणि भक्तिमार्गाचा मेळ आहे. ज्याला सगुण निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार झाला आहे, त्याला चोवीस पदार्थ * ( बाह्य जगाचा यांत अंतर्भाव होतो) माझ्या ‘ माते’पासून उत्पन्न झाले आहेत असें समजतें. माझी माता एक आणि अनेक आहे. तसेंच निर्गुण परमात्मा एक आणि अनेक आहे हें पक्कें समजा. ती ( माता ) मनुष्यांतील अहंकार (जीवात्मा) झालेली आहे असें नाहीं, तर चोवीस पदार्थहि झालेली आहे. ”

**बाह्य जग काय आहे ? ईश्वर, आत्मा, निसर्ग हीं एकच आहेत.**

सद्गुरु पुढें ह्मणतात “ अद्वैतवाद्याचा सिद्धान्त, ‘ ब्रह्म हें निर्गुण–अव्यक्त आहे’ हा पूर्णपणें सत्य मानला पाहिजे. कारण, प्रथम, ब्रह्माचा समाधीमध्यें साक्षात्कार होतो, व दुसरें, ब्रह्म निर्गुण असून समाधीमध्येंच त्याचा साक्षात्कार घेतां येतो, आणि ब्रह्म हें माझें निर्गुण अंग आहे असें माझ्या मातेनें दाखविलेलें आहे. याकरितां कोणींहि माझाच सिद्धांत बरोबर तर्काला अनुसरून आणि खरा आहे, सगुण परमात्म्यावार विश्वास ठेवणारे लोक चुकतात, सगुण परमात्मा ह्मणजे एक पोकळ कल्पना आहे, त्याला मोक्ष देण्याचें सामर्थ्य नाहीं, इत्यादि ह्मणूं नये. आपल्या तर्कशक्तीवरच सर्व भार ठेवणारा अद्वैती या प्रश्नाविषयीं असें सांगतो, कीं, निर्विकार आत्मा जीवात्मा झाला हा भ्रम कसा उत्पन्न झाला आहे, हें मला समजत नाहीं. साक्षात्काराचें उत्तर मात्र निश्चयात्मक असतें. माझी ‘ माता ’ ( सगुणपरमात्मा ) सांगते कीं, वेदान्तांतील ब्रह्म मी आहें, आणि मीच हा भेदभाव उपस्थित केला आहे. जोंपर्यंत मला माहीत आहे, किंवा मला ठाऊक नाहीं असें तुह्मी ह्मणतां, तोंपर्यंत आपण व्यक्ति आहों असें तुह्मी

**नवें तत्वज्ञान.**

**अद्वैती ज्ञान्याचें कोडें. पूर्ण असा आत्मा आपण अपूर्ण आहों असें कां मानतों ?**

---

* ५ स्थूल भूतें, ५ सूक्ष्म भूतें, ५ कर्मेंद्रियें, ५ ज्ञानेंद्रियें, चित्त, मन, बुद्धि, अहंकार. एकूण चोवीस.

मानता. तुह्मी जर व्यक्ति आहा, तर हा सर्व भेदभाव खरा आहे, भ्रम नाहीं असेंच तुह्मीं मानलें पाहिजे. माझी 'जगन्माता' आणखी सांगते, कीं, मी जेव्हां अहंकार समूळ नाहींसा करून टाकितें तेव्हांच समाधीमध्यें निर्गुणाचा साक्षात्कार येतो. मग तेथें भ्रम अगर खरेपणा, वस्तु अवस्तु, ज्ञान अज्ञान इत्यादिकांविषयीं पूर्ण मौन असतें. हेंच तें ब्रह्मज्ञान."

## अध्याय तिसरा.

### महत् साक्षात्कार आणि नवें तत्वज्ञान.

**पहिली जोड. सगुण परमात्म्याची आवश्यकता.**

सद्गुरु ह्मणाले "असें होईपर्यंत, माझ्यामध्यें अहंभाव असतो आणि माझ्यासमोर माझी माता ( सगुण परमात्मा ) असते. ती आपल्या मुलांनां—भक्तांनां अनेक दैवी रूपांत, श्रीकृष्ण, चैतन्यदेव यांच्यासारख्या दैवी अवतारांत, चोवीस पदार्थांत, जीवांत, जगतांत व्यक्त होते. 'मी मी' ह्मणून सर्व प्राण्यांत बोकाळणारा आणि त्यांनां विषयपंकांत रुतविणारा अहंकार तिच्या सत्तेमुळेंच कोणालाहि दूर टाकितां येत नाहीं. आणखी माझी 'जगन्माता'च भक्ताला भक्ति (प्रेम, उपासना, आत्मसमर्पण) शिकविते, आणि त्याचा वैषयिक अहंकार बदलून त्याला विद्यायुक्त व सूक्ष्म रेषेप्रमाणें बनविते. शेवटीं तिची सर्वशक्तिमत्ता कशी असते पहा! तिच्या मर्जीस आलें, तर ती कोणत्याहि प्राण्याला ह्या अहंकाराच्या सूक्ष्म वृत्तीपासून मुक्त करून त्याला ब्रह्मज्ञान देऊन कृतार्थ करूं शकते. तिच्या कृपेमुळें त्याचा अहंकार निर्गुण परमात्म्यामध्यें—ब्रह्मामध्यें—आत्म्यामध्यें लीन होऊन जातो आणि याच उपायानें त्याला ब्रह्मज्ञान प्राप्त होतें."

सद्गुरु पुढें म्हणतात "अहंकार टाकून देतां येत नाहीं. समाधीमध्यें ब्रम्ह-सुखाचा साक्षात्कार घेतलेले मनुष्यसुद्धां, माझ्या 'माते'च्या मर्जीनुरूप खालच्या स्थितींत येतात आणि सगुण परमात्म्याशीं बोलण्यासवरण्यापुरता अहंभाव ठेवि-तात. सर्वकाळ निषादांतच आवाजी ठेवणें कठीण नाहीं काय? जोंपर्यंत तुमचें स्वतःचें निराळें व्यक्तित्व कायम आहे, तोंपर्यंत ईश्वर तुह्मांला, त्याच्या मर्जीस आलें तर, सगुणरूपानें व्यक्त होईल. जोंपर्यंत तुह्मी व्यक्ति ( मनुष्य ) आहां तोंपर्यंत

# द्वितीय परिच्छेद—अध्याय तिसरा.

ईश्वर तुम्हांला व्यक्तीशिवाय ( सगुणाशिवाय ) दुसरा असा दिसणार नाहीं. तुमची घटनाच अशी आहे. आपल्या अहंकाराचा निर्गुण ब्रह्मामध्यें लय करणें हें अद्वैत्याचें ध्येय आहे. सर्वांचेंच हें ध्येय असावें, अशी माझ्या 'माते'ची योजना नाहीं. कारण, मानवजातीपैकीं बहुतेकांनां या जन्मीं किंवा पुढील जन्मीं आपला अहंकार टाकून देतां येत नाहीं. ह्मणून साधारण लोकांनीं त्यांनां समाधि साध्य होईतोंपर्यंत सगुण परमात्म्याचेंच ध्यान करावें. कारण, साधुसंत, शास्त्रें आणि साक्षात्कार हे एकमतानें आह्मांला अशी हमी देतात, कीं, निर्गुण परमात्मा मनुष्याच्या अंतर्यामीं व बाहेर सगुण रूपांनीं व्यक्त होतो. हीं सगुणरूपें मिथ्या नाहींत, तर देह, मन आणि जगत् यांचेपेक्षां किती तरी पटीनें सत्य आहेत. ह्मणून सगुण परमात्म्याची आवश्यकता आहे असें तज्ज्ञ ( जाणणार ) ह्मणतो.

**अद्वैती आणि साधारण लोक.**

जगन्माता ही सृष्टि निर्माण करीत असतांना माझा जीवात्मा झालेली आहे. एवढेंच नव्हे, तर ती बाह्य जगतहि झालेली आहे. समाधींतून देहभानावर येणाऱ्या मनुष्याचा रेषेसारखा सूक्ष्म अहंकार—दिव्यचक्षु राखण्यापुरतें व्यक्तित्व—उरतो. ह्या दिव्यचक्षूनें त्याला असें दिसतें, कीं, माझी माताच (सगुणपरमात्मा) माझा आत्मा व जगत् या रूपानें व्यक्त झालेलीआहे."

**दुसरी जोड. माता (सगुण परमात्मा), जीवात्मा आणि जगत् यांचें ऐक्य.**

सद्गुरु पुढे ह्मणतात "चोवीस तत्वें आणि बाह्य व अंतर्जगत् हीं सर्व माझ्या मातेचीं रूपें आहेत. हा साक्षात्कार प्रत्येकास पाहण्यास आणि अनुभविण्यास मिळत नाहीं. ज्याला निर्विकल्प समाधीमध्यें निर्गुण परमात्म्याचा, आणि सविकल्प समाधीमध्यें सगुण परमात्म्याचा साक्षात्कार झालेला आहे, त्यालाच वरील साक्षात्कार होतो. जो ज्ञानी समाधीमध्यें आपला अहंकार नाहींसा करून ब्रह्माशीं ऐक्य पावतो, आणि ब्रह्मसाक्षात्कार मिळवितो, त्यालासुद्धां एका अज्ञात शक्तीच्या प्रभावामुळें देहभानावर यावें लागतें. ही अज्ञातशक्ति कोण? या प्रश्नावरून दिसतें कीं ती 'अंबा' च होय. समाधींत अहंकार ठेवणें किंवा तो पूर्ण नाहींसा करणें हें सर्व तिच्याच हातीं आहे. समाधींतून खालच्या पायरीवर यावें लागतें याचें कारण आपलें पूर्वजन्मींचें कर्म होय, असें ज्ञानी ह्मणतो. हें खरें आहे कीं, जोंपर्यंत कर्ता आणि कर्म

**तिसरी जोड. सर्वशक्तिमती माता आणि कर्म. सगुण परमात्मा ब्रह्मज्ञान देईल काय?**

हीं आहेत, तसेंच कार्य आणि कारण हीं आहेत; अहंकार आणि जीव आहे तोंपर्यंत इतकेंच नव्हे तर, लाखों प्राणी, चोवीस पदार्थांचें जगत्, भूत वर्तमान आणि भविष्यकाल, पूर्व आणि पुढील जन्म आणि इतर सर्व गोष्टी सत्य आहेत. पण हे सर्व भेद सत्य मानले तर हे भेद निर्माण करणारा सगुण परमात्मा माझी माता सत्य आहेच. ह्या सिद्धान्ताला साक्षात्कारानें पुष्टि येते. कारण, माझी माता सांगते कीं, मींच हे सर्व भेद उत्पन्न केले आहेत. चांगलीं आणि वाईट सर्व कर्में माझा हुकूम पाळतात. कर्मांचा नियम ह्या जगीं आहे हें खरें; पण 'नियम करणारी मीच आहें.' कायदा करणें न करणें माझ्या हातीं आहे. चांगलें वाईट सर्व कर्म मीच करवितें. याकरितां भक्ति, उपासना, प्रार्थना, ज्ञान, सत्कर्म यांनीं मला शरण या, ह्मणजे मी तुह्मांला या संसारांतून पार नेईन, पाहिजे असेल तर मी तुह्मांला ब्रह्मज्ञान देईन. समाधीनंतर जर कांहीं कार्य उरलें असेल आणि जर अहंकार आणि देहभाव हे नंतर असले तर हें पक्कें समजा, कीं, हें कर्म, अहंकार, देहभाव इत्यादि माझ्याच कार्याकरितां ठेवण्याचा हुकूम केला आहे. तिनें आपल्या मुलांनां, भक्तांनां हें सर्व स्पष्ट केलें आहे."

**भक्ताला निर्गुणाचें ज्ञान मिळेल काय?**

सद्गुरु पुढें ह्मणतात "ब्रह्मज्ञान प्राप्त व्हावें असें कोणाचें ध्येय असेल तर त्याला तेंहि त्यानें जगन्मातेची कळकळीनें प्रार्थना केली असतां आणि तिला सर्वभावानें शरण गेलें असतां मिळेल. ब्रह्मज्ञान मिळावें अशा उत्सुकतेनें भक्त माझ्या 'माते'जवळ (तिच्या कोणत्याहि अवतारापाशीं) भक्तियुक्त अहंकारानें आला तर समाधीमध्यें माझ्या 'माते'च्या कृपेनें त्याचा अहंकार समूळ नाहींसा होईल. द्रष्टा आणि दृश्य हा भेद सगुण परमात्म्यानें —माझ्या 'माते'नें—केलेला आहे. समाधीमध्यें अहंकार समूळ नाहींसा करून ब्रह्मज्ञान देण्यास तीच समर्थ आहे. तीच हें करिते, हें आह्मांला साक्षात्कारानें समजतें. साक्षात्कारावर किंवा तर्कशक्तीवर विश्वास न ठेविणारा ज्ञानी असें ह्मणतो, कीं, सगुण परमात्मा जीवाला मुक्ति ह्मणजे ब्रह्मज्ञान देत नाहीं. खालच्या ह्मणजे, सापेक्षतेच्या किंवा दृश्य जगताच्या 'मीं तूं' या पायरीवरून ज्ञानी ह्मणतो, कीं, 'मीच मला स्वःतला ब्रह्मज्ञान देईन.' पण ह्या पायरीवर असतांना तुमच्या स्वभावाच्या घटनेप्रमाणें पहातां तुह्मांला सगुण परमात्मा—माझी सर्वशक्तिमती 'माता' कबूल केलीच पाहिजे."

# द्वितीयपरिच्छेद—अध्याय तिसरा.

सद्गुरु पुढें ह्मणतात "एकाद्या दुर्बळ मर्यादित व्यक्तीला स्वतःला ब्रह्मज्ञान देण्याची शक्ति आहे, पण माझ्या सर्वशक्तिमती 'माते'ला मात्र ती शक्ति नाहीं असें मानण्यांत येतें, हें आश्चर्य आहे! तुह्मांला स्वतः मोक्ष प्राप्त करून घेतां येतो, आणि माझ्या सर्वशक्तिमान् 'माते'ला तो देतां येत नाहीं! परमात्मा सगुण आणि निर्गुण आहे ही गोष्ट हे ज्ञानी विसरतात. आम्हां मानवांला, व्यक्तींनां, परमात्मा अनंत, अमर्याद शक्तीनें—ब्रम्हज्ञान देण्याच्या शक्तीनेंहि युक्त अशा सगुण रूपानें व्यक्त होतो, हें त्यांनां समजत नाहीं. पण एकटा तर्क (बुद्धि) हा बेभरंवशाचा वाटाड्या आहे. शिवाय, ज्ञान्याचा ज्यावर सर्व भार आहे असा तर्क किंवा विचार हा सगुण परमात्म्यापासूनच मिळतो."

**चवथी जोड. मनुष्याचे निर्गुणांत सगुणाचा अंतर्भाव होतो.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "'सगुण परमात्मा ब्रह्मज्ञान—निर्गुणाचें ज्ञान देऊं शकतो आणि देतो,' ही गोष्ट शुद्ध अद्वैत सिद्धान्तांत मिळविली पाहिजे. समाधीमध्यें जोंपर्यंत अहंकार समूळ नाहींसा होऊन ब्रह्माचा साक्षात्कार होतो तोंपर्यंत आह्मांला ब्रह्मज्ञान असतें; आणि ब्रह्माचें अस्तित्व अथवा नास्तित्व याविषयीं कांहीं न सांगतां आह्मी मौन असतों. तुह्मी अद्वैत बोलूं लागलां, कीं, लागलेंच द्वैत गृहीत धरावें लागतें. एक जर आहे, तर दोनहि आहेत. अद्वैत बोलतांना तुह्मी द्वैत गृहीत धरितां. तुह्मी निर्गुणाविषयीं बोलूं लागलां, की, सगुण गृहीत घेतां, समाधीमध्यें निर्गुणाचा साक्षात्कार येईंपर्यंत तुमचें 'निर्गुण' हा शब्द लिपींतील नुसतीं अक्षरें नसून त्याला कांहीं अर्थ असेल, तर तो सगुणाचा सूचक आहे. नित्याविषयीं बोलत असतांना तुम्ही अनित्य गृहीत धरितां. अव्यक्ताविषयीं बोलतांना, तुह्मी व्यक्त गृहीत धरितां. प्रकाशाविषयीं बोलतांना, तुम्ही त्याचा जोडीदार अंधार सुचवितां. सुख ह्मटलें ह्मणजे तेथें दुःख आहे. जग ज्याची अनित्य लीला आहे, त्याचेंच तें नित्यहि आहे. ज्याचें हें नित्य आहे, त्याचें हें अनित्य आहे. या दृश्य अनित्य जगांतून आह्मीं नित्य शाश्वताकडे गेलें पाहिजे. तसेंच नित्याकडून अनित्याकडे—आतां अनित्य हें मिथ्या नसून नित्याचें इंद्रियगोचर व्यक्त स्वरूप आहे—गेलें पाहिजे. ब्रह्माविषयीं तुम्ही बोलूं लागलां ह्मणजे तें आहे तसें तुह्मांला सांगतां येत नाहीं. तुम्हांला त्यावर दुसरी एक विजातीय वस्तु—तुमचा स्वतःचा अध्यास घालावा लागतो. कांहीं झालें तरी आह्मांला साक्षात्काराचीच कास धरिली पाहिजे. सगुण परमात्मा—

माझी 'माता' ह्मणते 'मी सगुण आणि निर्गुण (समाधींत अनुभवानें प्राप्य) आहे.' तसेंच दुधाचें अस्तित्व गृहीत धरल्यावांचून लोण्याविषयीं विचार करितां किंवा बोलतां येत नाहीं. ताकाचें लोणी आणि लोण्याचें ताक. ताकाचा लोण्याशीं संबंध समजला, कीं, लोण्याचा ताकाशीं संबंध समजतो. व्यक्तित्वाच्या—इंद्रियांच्या, किंवा उच्च जाणीवेच्या दृष्टीनें पाहूं लागलां तर 'लोणी आणि ताक' हीं दोन्हीं तुह्मांला कबूल केलीं पाहिजेत. जोंपर्यंत तुमचें व्यक्तित्व कायम आहे, तुमचा अहंकार जगन्मातेनें ठेविलेला आहे, तोंपर्यंत तुमच्या निर्गुणांत सगुण असलेंच पाहिजे. तुमचें नित्य अनित्य, तुमची वस्तु गुणधर्म, तुमचें एक अनेक सुचवितें. जेव्हां जगन्माता समाधीमध्यें तुमचें व्यक्तित्व (अहंकार) समूळ नाहींसें करिते, तेव्हां ब्रह्माचा साक्षात्कार येतो; आणि मग स्वस्थता, पूर्णशांति असते. 'जें कांहीं आहे तें असतें.' कारण, समुद्राची खोली मापण्याकरितां पाण्यांत गेलेली मिठाची बाहुली, अगाध अनंत सागराशीं एकरूप होऊन गेल्यामुळें, कांहींच गोष्ट करीत नाही."

अद्वैती शंकराचार्यांचा मायावाद आणि सांख्यकपिलांचा परिणामवाद यांचा, अद्वैत आणि विशिष्टाद्वैत यांचा मेळ.

सद्गुरु पुढें ह्मणतात "उपमेनें किंवा दृष्टांतानें हें सांगणें शक्य असल्यास तुह्मांला असें ह्मणतां येईल, कीं, पूर्वीचें दूध ह्मणजे समाधींत प्रत्ययास येणारें ब्रह्म होय; लोणी ह्मणजे निर्गुण—सगुण परमात्म्याचें व्यक्त स्वरूप होय; आणि ताक ह्मणजे चोवीस तत्वांचें बनलेलें जगत् होय. सगुण परमात्म्यानें—माझ्या 'जगन्माते'नें असें जाहीर केलें आहे, कीं, वेदान्तांत सांगितलेलें ब्रह्म—सगुण निर्गुण परमात्मा मीं आहें. ब्रह्मज्ञान देणें माझ्या हातीं आहे. मीं क्षुद्र अहंकार नाहींसा करून समाधींत आत्मसाक्षात्कार करवून देतें; ह्मणून ज्ञानयोगानें माझ्या 'माते'च्या कृपेनें तुह्मीं ब्रह्मज्ञान प्राप्त करून घ्यावें. कलियुगामध्यें हा मार्ग फार थोड्यांनां साधतो. कारण आह्मांला चिकटून राहणारी 'मी देह आहें' ही भावना नाहींशी करणें फार कठीण आहे.*

पांचवी जोड. भक्तिमार्ग व ज्ञानमार्ग ब्रह्मज्ञानाप्रत नेतात. प्रार्थना आणि श्रद्धा यांचें सामर्थ्य.

---

* क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् । अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ गीता.

# द्वितीय परिच्छेद-अध्याय तिसरा.

तसेंच ज्ञान आणि भक्ति मिळावी ह्मणून प्रार्थना करणें हा एक मार्ग आहे. परमेश्वरास शरण येणें, त्याच्यावर प्रेम करणें, हीं भक्तीचीं अंगें आहेत. या अंगांनीं प्रथम तुम्ही माझ्या जगन्मातेकडे या. आणि मी तुह्मांला प्रतिज्ञेनें सांगतों कीं, जर तुमची प्रार्थना तुमच्या अंतःकरणापासून, बेंबीच्या देंठापासून येईल, तर माझी माता तुम्हांला उत्तर खचित देईल. फक्त तुम्हीं घाई न करितां वाट पहा. कारण, तिनें आपल्या मुलांनां असाच साक्षात्कार दिलेला आहे. तिच्या निर्गुण स्वरूपाचा साक्षात्कार हवा असेल तर पुन्हां तिची प्रार्थना करा. सर्वशक्तिमती मातेच्या मनांत तुमची प्रार्थना ऐकण्याचें आलें तर तिच्या निर्गुण स्वरूपाचा साक्षात्कार ती तुम्हांला समाधींत करून देईल. खरें ब्रह्मज्ञान तें हेंच.

भक्ताची इच्छा.

येथें मला इतकें सांगितलें पाहिजे, कीं, साधारणपणें भक्ताला सगुण परमात्म्याचा,—माझ्या 'माते'चा किंवा श्रीकृष्ण, चैतन्यदेव इत्यादि अनेक अवतारांपैकीं कोणत्याहि दिव्य स्वरूपाचा—साक्षात्कार झाला, कीं, त्याला समाधान होतें. भक्त बहुतेक निर्गुणाच्या साक्षात्काराची इच्छा करीत नाहीं. समाधीमध्यें आपला अहंकार समूळ नाहींसा होऊं नये असें त्याला वाटतें. त्या दिव्य साक्षात्काराचा—सगुण परमात्म्याचा आनंद भोगण्यापुरतें आपलें व्यक्तित्व असावें, अशी त्याची इच्छा असते. साखर होऊन जाण्यापेक्षां साखरेची गोडी अनुभविणें त्याला बरें वाटतें. अशा भक्ताला माझी 'माता' सगुणरूपानें व्यक्त होते. कारण, आपल्या मुलांवर—भक्तांवर तिचें प्रेम असतें."

सद्गुरु पुढें ह्मणतात "ज्यानें परमात्म्याचा पूर्ण साक्षात्कार घेतलेला आहे

सहावी जोड.
साक्षात्कार.साक्षात्काराचीं चिन्हें.

त्यानें आध्यात्मिक बाबतींत याच गोष्टीला—साक्षात्काराला फार महत्व दिलें पाहिजे. प्रथमारंभीं जर कोणी 'मी परमेश्वरास पाहतों; सगुण निर्गुण परमात्मा सर्व वस्तूंत भरलेला आहे; मी जें जें कांहीं पहातों—नरनारी, पशुपक्षी, वृक्ष फुलें, इत्यादि सर्व कांहीं ईश्वर आहे. अहाहा! मी पूर्ण आनंदी आणि सुखी आहें; मी सुखदुःखाच्या पलीकडे आहें; सोऽहं (मी तोच आहें)' असें ह्मणूं लागला, तर त्यानें कांहीं कार्यसिद्धि होणार नाहीं. अत्यंत आवश्यक गोष्ट ह्मटली ह्मणजे साधन होय. त्यावांचून भक्ति मिळणें नाहीं. असा अभ्यास नसेल तर ब्रह्मज्ञान फार लांबची गोष्ट आहे, असें समजावें. कारण, अमूल्य रत्नें खोलींत, किल्लीकुलुपांत, सुरक्षित ठेविलेलीं असतात. तुह्मी किल्लीकुलुप न उघडतां जर

ह्मणूं लागलां, कीं, 'आह्मी किल्ली उघडून खोलीत आलों. तीं चकाकणारीं रत्नें, अमूल्य हिरे, जवाहीर इत्यादि आमच्या मनांत असलेला सर्व ठेवा आमच्या हातीं आला, हें पहा तें सर्व आमचें झालें, इ.' तर तुमचें ह्मणणें शोभत नाहीं."

सद्गुरु पुढें ह्मणतात " परमात्म्याचा साक्षात्कार घेतलेला भाग्यवान् मनुष्य मुलाप्रमाणें साधा, सरळ होतो. त्याला जग नूतन, कृत्रिम नामरूपांनीं विरहित, असें नवीन दिसूं लागतें. आपल्याला होणारा साक्षात्कार पाहून तो भक्तिरूपी वारुणीनें धुंद होऊन जातो. तो पावित्र्याच्या जिवंत झऱ्याशीं एकरूप होतो. ह्मणून त्याला शुचि ( पवित्र ), आणि अशुचि ( अपवित्र ), यांमधील भेद नाहींसा होतो. शेवटीं, त्याचें देहभान वरचेवर जात असतें, आणि समाधींत तो जडवत् ( निर्जीव व जड वस्तूप्रमाणें ) दिसतो. साक्षात्कार मिळेपर्यंत प्रत्येकानें कामिनी आणि कांचन—विषयोपभोग आणि पैसा—यांचा त्याग केला पाहिजे, आणि निर्मळ, पवित्र राहिलें पाहिजे."

---

## अध्याय चवथा.

## श्रीरामकृष्ण आणि भक्तियोग.

**सगुण देवाची आवश्यकता; जीविताचें कोडें उलगडण्याचा मार्ग.**

सद्गुरु म्हणाले " ब्रह्मज्ञानाच्या आड येणाऱ्या अहंकाराला नाहींसा करणें कितीतरी कठीण आहे! ब्रह्मज्ञान प्राप्त झाल्यावरहि, मुक्त जीवाला कांहीं अज्ञात शक्तीच्या—माझ्या 'जगन्माते'च्या सामर्थ्यामुळें देहभानावर यावें लागतें—आणि विरल कां असेना, अहंकार त्यांनां चिकटतो."

**पक्का मी—अर्थात् आदर्शरूप अहंकार.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "समजा, तुह्मांला वाघाचें स्वप्न पडलें. या वेळीं शरीराचा प्रत्येक अवयव थरथर कांपूं लागतो आणि हृदय मोठमोठ्यानें धडधडूं लागतें. तुह्मी जागे होऊन पहातां, तों हें सर्व स्वप्न! तरीपण जागृति झाल्यावरहि हृदयाचें धडधडणें चालू राहतें. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें, ह्मणजे अहंभावना सोडून जाण्यास नाकबूल असल्यामुळें, आतां काय करावें, हा प्रश्न येतो. हं, त्यांत काय, त्याला एकच उपाधि लावून द्या, ह्मणजे झालें. ' ईश्वराचा दास ' या नात्यानें त्याला ( अहंकाराला ) राहूं द्या. पण संसारिकांचें ' मी माझें ' ह्मणजे ईश्वरापासून दूर नेणारें अज्ञान होय. प्रत्येक गो

ईश्वराच्या हुकुमानें होते. ‘मी जगताचा धनी आहें, मी स्वामी आहें, या सर्व वस्तु माझ्या आहेत,’ असें एकाद्या मनुष्यानें ह्मणणें हें वेडेपण होय.”

सद्गुरु पुढें ह्मणतात “दोन प्रसंगीं देवाला हंसूं आल्याशिवाय राहवत नाहीं. जेव्हां एक मनुष्य आजारी असतो, अत्यवस्थ–अगदीं मरणोन्मुख झालेला असतो, तेव्हां डाक्टर येऊन त्याच्या आईला सांगतो—‘माई, चिंता करण्याचें कांहीं कारण नाहीं. तुमच्या मुलाचे प्राण मी वांचवितों!’ ईश्वरच तिच्या मुलाला नेत आहे, हें त्या डॉक्टराला समजत नाहीं. ईश्वर हंसून ह्मणतो ‘मी या मनुष्याला मारीत आहें, आणि हा बेटा मूर्ख डॉक्टर आपण त्याचे प्राण वांचवीन असें ह्मणतो.’ तसेंच दोन बंधु आपल्या स्थावर मिळकतीची वांटणी करण्यांत गुंग झाले आहेत. ते मोजण्याची सांखळी जमिनीवर आडवी ठेवून ह्मणतात, कीं ‘ही बाजू माझी आणि ती तुझी.’ देव हंसून ह्मणतो ‘काय बेटे हे मूर्ख आहेत! जमीन आपलीच ह्मणतात! जमिनीचा प्रत्येक तुकडा, प्रत्येक भाग माझा आहे, हें यांनां कळत नाहीं!”

**श्रीमंताची आणि त्याच्या कारभाऱ्याची गोष्ट.**

सद्गुरु पुढें ह्मणतात “एका श्रीमान् गृहस्थाची एक बाग आहे. ती त्याच्या कारभाऱ्याच्या देखरेखीखालीं आहे. बाग पहाण्यास प्रेक्षक आले असतां तो त्यांनां ती मोठ्या काळजीनें दाखवितो. तो त्यांनां बागेच्या सर्व भागांत आणि घरांत नेऊन सांगतो कीं ‘हीं पहा महाराज, आमचीं आंब्यांचीं झाडें, तीं आमचीं पेरूंचीं, जांबांचीं इत्यादि फळांचीं दुसरीं आमचीं झाडें. हा पहा आमचा दिवाणखाना. तेथें आमचीं सुंदर चित्रें आणि तसबिरी लाविल्या आहेत.’ आतां, कांहीं कारणांमुळें यजमानाची त्या कारभाऱ्यावर गैरमर्जी झाली आहे, असें समजा. मग त्याची व्यवस्था कशी होईल असें तुह्मांला वाटतें? त्याला बाग एकदम सोडून जाण्याचा हुकूम सुटतो. त्याला आपली लांकडी पेटी आणण्याचीसुद्धां फुरसत दिली जात नाहीं. आणि हाच मनुष्य मोठ्या दिमाखानें ‘आमचें हें आणि आमचें तें’ असें ह्मणत होता! या कारभाऱ्याचें ‘माझें किंवा आमचें’ (ईश्वरापासून दूर नेणाऱ्या) अज्ञानामुळें येतें.”

सद्गुरु पुढें ह्मणतात “बुद्धि पंगु आहे. श्रद्धा बलवती आहे. बुद्धीचें तट्टू फार लांब जात नाहीं, त्याला वाटेंत कोठंतरी मुक्काम करावा लागतो. श्रद्धा वाटेल तें करूं शकेल. श्रद्धेनें मनुष्याला अगाध सागर अनायासें

तरून जातां येईल. प्रत्यक्ष ईश्वराचा अवतार अशा रामचंद्राला हिंदुस्थान आणि लंका ( सिलोन ) यांमधील समुद्रावर सेतु बांधावा लागला. पण श्रद्धेचें अमर्याद बल जगाला दाखविण्या-करितांच कीं काय, त्यानें आपल्या भक्ताकडून—मारुति-रायाकडून तो समुद्र एका श्रद्धेच्या योगानें सहज ओलांडविला. खरेंच, श्रद्धा बलवती आहे. तिच्यापुढें निसर्गातील सर्व शक्ति फिक्या पडून हतबल होतात. तिच्यामुळें पर्वत आणि समुद्र यांवरून सहज आणि निष्काळजीनें जातां येतें; एवढेंच नव्हे, तर पाप आणि दोष, आसक्ति आणि अज्ञान, हीं सारीं तिच्यापुढें पळून जातात."

श्रद्धेचें अतुल बळ.

नंतर सद्गुरु गाऊं लागले:—

"आमि दुर्गा दुर्गा बले मा जदि मरि ।
आखेरे ए दीने, ना तार केमने, जाना जाबे गो शंकरी ॥
नाशि गो ब्राह्मण, हत्या कारि भ्रूण, सुरापान आदि विनाशि नारी ।
ए सब पातक, ना भावि तिलेक, ब्रह्मपद निते पारि ॥"

सद्गुरु नंतर ह्मणाले " खरोखर श्रद्धा आध्यात्मिक उन्नतीचा पाया आहे. दुसरें कांहीं नसलें तरी चालेल, पण श्रद्धा ही असलीच पाहिजे. ईश्वरावर श्रद्धा ठेवा, ह्मणजे तुह्मी अत्यंत नीच व घोर अशा पापापासून मुक्त व्हाल.

भाविले भावेर उदय हय ।
(ओ से ) जेमन भाव, तेमनि लाभ मूळ से प्रत्यय ॥
कालीपद सुधाऱ्हदे चित्त जदि रय ( जदि चित्त डुबे रय )
तबे पूजा होम याग यज्ञ किछुइ किछु नय ।"

सद्गुरु पुढें ह्मणतात " विचारानें, आत्मानात्मविवेकानें, परमात्म्याचें साहाय्य न मागतां आपल्याच शक्तीनें माझ्या ' माते 'प्रत येणें हें फार कठीण–विशेषतः या कलियुगांत फारच कठीण आहे! बंगालच्या रामप्रसादानें हें काठिन्य आपल्या पुढील पदांत फार चांगलें दाखविलें आहे:—

मन कि तत्व कर ताँरे जेन उन्मत्त आँधार घरे ।
से जे भावेर विषय भावव्यतीत अभावे कि धरते पारे ॥
अग्रे शशी वशीभूत कर तव शक्तिसारे ।
ओगे कोटार भितर चोर कुटारि भोर हले से लुकाबे रे ॥

# द्वितीयपरिच्छेद–अध्याय पांचवा.

षडदर्शने ना पाय दरशन आगम निगम तंत्रसारे ।
से जे भक्तिरसेर रसिक सदानन्दे बिराज करे पुरे ॥
से भाव लोभे परम योगी योग करे युगयुगान्तरे,
हले भावेर उदय लय से जेमन लोहाके चुम्बके धरे ॥
प्रसाद बले मातृभावे आमि तत्व करि जाँरे
सेटा चातरे कि भांगवो हाँडि बोझ ना रे मन ठारे ठोरे ॥

हें गाणें सर्वांनीं लक्ष्यपूर्वक ऐकिलें. गाणें संपतांच खोलींत पूर्ण शांतता दिसून आली. प्रत्येकाचें हृदय उचंबळून गेलें. अंतःकरणाला तल्लीन करून सोडणाऱ्या ह्या गाण्यांत वर्णिलेल्या जगन्मातेच्या पवित्र चरणांवर आपलें मन पूर्णपणें लावून सद्गुरु त्या स्थितींत बराच वेळ राहिले.

---

## अध्याय पांचवा.

एका मित्रानें विद्यासागरांनां ‘ चौथर ’ चा अर्थ विचारला.

विद्यासागर हंसत ह्मणतात “ चौथर किंवा उठन ह्मणजे घराचा चौक किंवा बाजार !”

सद्गुरु विद्यासागरांस ह्मणाले “ बरोबर आहे. आपण पंडित आहां, तेव्हां आपणास सर्व माहीत आहे. ” सर्वजण हंसतात.

सद्गुरु विद्यासागरांस विचारतात “ बरें, परमेश्वराविषयीं तुमची कल्पना काय आहे ?”

विद्यासागर हजर असलेल्या मंडळीकडे पाहून ह्मणाले “ महाराज, माफ करा, मी एकटाच असतांना आपल्याशीं दुसऱ्या कोणत्यातरी प्रसंगीं याविषयीं बोलेन.” सर्व हंसतात.

सद्गुरु ह्मणतात “आपणास सर्व कांहीं ठाऊक आहे. मला वाटतें, आपण सांगूं इच्छीत नाहीं. सागराचा स्वामी ( वरुण ) ह्या असंख्य सोनें, मोतीं, रत्नें इत्यादिकांचा यजमान आहे; पण आपल्या प्रांतांत–सागरांत आढळणाऱ्या प्रत्येक मौल्यवान वस्तूची याद राखणें हें वरुणास शक्य आहे असें दिसत नाहीं.” मोठाच हंशा पिकतो.

सद्गुरु पुढें म्हणतात “ आणखी, एकाद्या बड्या श्रीमान् बाबूला आपल्या नोकरांचीं नांवें माहीत नसतात, असें आपण पाहत नाहीं काय ?” पुनः हंशा पिकतो.

सद्गुरु पुढें म्हणतात " तो बाबू एवढा मोठा असतो, कीं, अशा क्षुद्र लोकांशीं त्याला परिचयानें वागतां येत नाहीं. " सर्व हंसतात.

सद्गुरु विद्यासागरांला म्हणतात " आपण एकदां बागेंत येणार नाहीं काय ? ती जागा फार रम्य, भव्य आणि सुंदर आहे. "

यावर विद्यासागर म्हणाले "खचित येईन ! आपण येथें येऊन अनुग्रह केलात, आतां परत आपणास भेटण्यास येणें हें माझें कर्तव्य नाहीं काय ? "

सद्गुरु हांसत म्हणतात " माझी भेट, छीः, छीः—"

विद्यासागर म्हणाले "महाराज, आपण हे शब्द उच्चारावे ? मला याचा खुलासा पाहिजे !"

यावर सद्गुरु म्हणाले "बरें मी सांगतों. आम्ही मासे धरण्याच्या लहान होड्या आहोंत. लहान आणि हलक्या असल्यामुळें या होड्यांनां पाहिजे तेथें जातां येतें. ( हंशा. ) आपण मोठें जहाज आहां. आपण प्रवाहाच्या फार वर गेलांत तर भाटांत अडकून बसाल ! ( हंशा. ) पण सध्यांची वेळ मात्र अनुकूल आहे, नव्हे काय ?"

विद्यासागर हंसत ह्मणाले " हां, समजलों. पावसाळा नुकताच सुरू झाला आहे. " सर्व हंसतात.

**निरोप.**

संध्याकाळचे आठ वाजले. दक्षिणेश्वरांत ठाकुरवाडीस घरीं सद्गुरूंस पोहोंचविण्याकरितां गाडी तयार झाली. सद्गुरु थोडेसे विमनस्क झाले होते. त्यांनीं आपलें मन जगन्मातेकडे लाविलें होतें. पंडितजींला तिचा आशीर्वाद ते मागत होते काय ?

हा दिवस श्रावणांतील वद्य पक्षाचा होता. सद्गुरु उठल्यावर विद्यासागरांनीं मेणबत्ती पेटवून जिन्याची वाट दाखविली, आणि कंपाउंडांतून दरवाज्यापर्यंत त्यांनां पोहोंचविलें. तेथें सद्गुरूंकरितां आणि त्यांच्या मंडळीकरितां गाडी तयार होती.

दरवाजापाशीं येतांच, एक चमत्कारिक देखावा मंडळीच्या दृष्टीस पडला. चाळिसीच्या आंत असलेला एक इसम हात जोडून दरवाज्याजवळ उभा होता. त्याच्या अंगावर पांढरा पोषाख असून, डोक्यावर शीख लोकांचा फेटा होता. चेहरा हंसतमुख होता. वर्णानें तो गोरा होता आणि त्याचे डोळे पाणीदार होते. सद्गुरूंला पाहतांच त्यानें त्या मोठ्या फेट्यासहित आपलें डोकें भूमीवर ठेवून त्यांनां प्रणाम केला.

# द्वितीय परिच्छेद–अध्याय पांचवा.

सद्गुरु ह्मणाले " कोण–बलराम ? तूं येथें कसा ?"

बलराम हंसत ह्मणतो "आपल्या दर्शनाची वाट पहात मी बराच वेळ येथें उभा आहें. "

सद्गुरु ह्मणतात " मग तूं आंत कां आला नाहींस ? "

बलराम हंसत ह्मणतो " मी उशीरां आलों, ह्मणून मध्येंच आपणास तसदी दिली नाहीं. येथेंच वाट पहात रहाणें मला बरें वाटलें. "

नंतर आपल्या मित्रमंडळीसह सद्गुरु गाडींत बसले.

विद्यासागर मला ह्मणाले " मी गाडीभाडें देऊं का ? "

मी ह्मटलें "नको, आपण तसदी घेऊं नका. एका मित्रानें तें पूर्वींच देऊन टाकिलें आहे."

नंतर पंडितांनी हात जोडून, डोकें व शरीर वांकवून, सद्गुरूंस प्रणाम केला. गाडीभोंवतीं जमलेल्या सर्व मंडळीनें वंदन केलें. गाडीवानानें गाडी चालविली. गाडी उत्तरेच्या दिशेस निघून गेली.

दरवाज्यापाशीं कांहीं मंडळी उभी होती. त्यांत प्रमुख ह्मणजे पूज्य विद्यासागर हातांत मेणबत्ती धरून तसेच उभे होते. ही सर्व मंडळी थोडा वेळ उत्तरेकडे पहात उभी होती; आणि ईश्वरी भक्तीनें धुंद झालेला हा इसम कोण असावा, किती विद्वान्, पण मुलासारखा किती सरळ, किती मधुर व गोड, कसा दैवी आनंदानें पूर्ण भरलेला आहे, अशा आश्चर्यांत मग्न झाली.

या कष्टमय संसाराच्या कुडींत चैतन्य उत्पन्न करण्याकरितां खरोखर ही विद्युत्च परमेश्वरानें पाठविलेली आहे ! जणूंकाय मनुष्याच्या शुष्क आणि तृषित अंतःकरणावर प्रेमरूपी हिमबिंदूचे थेंब परमेश्वर सोडीत आहे ! पापी, त्रस्त जीवांला धीर देऊन ही अद्भुत वाणी असें जाहीर करते, कीं, तुह्मी पुन्हां जन्म घ्या, आणि प्रेम, भक्ति संपादा. हल्लींच्या सुधारणेच्या काळीं झालेला विलक्षण रोग बरा करण्याकरितां अन्य लोकाहून हा धन्वंतरी आला आहे ! विश्वाचें कोडें उलगडण्याकरितां, मनुष्यांला मदत करण्यास उत्सुक असलेला हा त्यांच्यापैकींच नरपुंगव आहे !

---

# तृतीय परिच्छेद.

## दक्षिणेश्वराच्या देवालयांत.

अक्टोबर १८८२.

## अध्याय पहिला.

### सद्गुरूंनीं सांगितलेली स्वतःची गोष्ट.

नरेंद्र देवालयांत आपणास भेटण्यास आला ह्मणून श्रीरामकृष्णांस अत्यानंद झाला. नरेंद्रानें आज येथेंच स्नान करून देवाचा प्रसाद ग्रहण केला. हा दिवस सोमवार, १६ अक्टोबर १८८२, हा होता. तिथी आश्विन शुद्ध चतुर्थी असून पुढील गुरुवारीं दुर्गापूजेचा उत्सव होता. राखल कांहीं वेळ सद्गुरूंपाशीं होता. रामलाल आणि हजरा येथें होते. दोन ब्राह्मो मुलें नरेंद्राबरोबर आलीं होतीं. मीहि आलों.

मध्यान्हीं ११ वाजतां भोजन उरकल्यावर शिष्यांनां, विशेषतः नरेंद्राला कांहीं वेळ विश्रांति घेण्यास श्रीरामकृष्णांनीं सांगितलें. खोलींत बिछाना तयार करण्यांत आला. चटईवर रजई घालून वर पांढरी चादर आंथरली, आणि वर कांहीं उशा आणि तक्के ठेवण्यांत आले. सद्गुरु जमिनीवर नरेंद्रापाशीं बसले आणि त्याच्याशीं व इतर शिष्यांशीं लहान मुलाप्रमाणें बोलूं लागले. त्यांची दृष्टि नरेंद्राकडे होती, आणि त्यांचें मुख हास्यानें चकाकत होतें. आज सद्गुरु शिष्यांसमोर–विशेषतः नरेंद्रासमोर उत्तम शीलाचे—स्वभावाचे, उदार चरिताचे नमुने (उदाहरणें) ठेवणार होते, आणि जगांत कसें रहावें हें शिकविणार होते.

सद्गुरु नरेंद्रास व इतर शिष्यांस ह्मणाले " जेव्हां ईश्वरी साक्षात्कारानें माझ्या स्थितींत असा पालट झाला, तेव्हां ईश्वराचे गुणानुवाद ऐकावे अशी मला फार इच्छा झाली. श्रीकृष्ण, राम इत्यादि अवतारांच्या लीला ज्यांत वर्णिल्या आहेत असे भागवत, महाभारत, अध्यात्मरामायण वगैरे धर्मग्रंथ जेथें सांगत असत त्या स्थळीं जाण्याचा मी प्रयत्न करीं. कृष्णकिशोराच्या घरीं मी अध्यात्मरामायण ऐकण्यास जात असें. कृष्णकिशोराची श्रद्धा किती जबर आहे! एकदां

तो वृंदावनाच्या यात्रेस गेला होता. वाटेंत चालत असतां त्याला फार तहान लागली. विहिरीजवळ उभा असलेल्या एका मनुष्याला त्यानें 'आपल्याकरितां थोडें पाणी काढून दे!' असें सांगितलें. 'मी अंत्यज आहें–ब्राह्मणाकरितां पाणी कसें काढूं?' असें त्या मनुष्यानें उत्तर दिलें. त्यावर कृष्णकिशोर त्याला ह्मणाले 'तूं ईश्वराचें नांव घेऊन पवित्र हो!' त्या मनुष्यानें त्याप्रमाणें करून कृष्णकिशोराकरितां पाणी काढून दिलें, आणि तो ब्राह्मण तें पाणी प्याला! त्याच्या श्रद्धेचा जोर किती विलक्षण होता! एकदां एक साधु नदीकिनारीं येऊन कांहीं दिवस अरीआदा घाटावर राहिला. त्याला भेटावें अशी आह्मांला इच्छा झाली. मी देवळांतील हलधरीला एके दिवशीं ह्मटलें, 'मी आणि कृष्णकिशोर त्या साधूस भेटण्यास जाणार आहों, तूंहि येशील काय?' हलधरीनें उत्तर दिलें 'मातीच्या पिंजऱ्याहून ज्याची किंमत अधिक नाहीं, असा जड देह धारण करणाऱ्या प्राण्यास भेटून उपयोग काय?'"

**कृष्णकिशोर आणि त्याची श्रद्धा.**

सद्गुरु पुढें म्हणाले "हलधरी हा, 'ब्रह्म सत्य आहे आणि बाकी इतर सर्व कांहीं मिथ्या आहे,' असें प्रतिपादन करणारा, वेदान्त आणि भगवद्गीता नेहमीं वाचणारा, पंडित होता. मीं वरील मजकूर कृष्णकिशोरास कळविला. त्याला अत्यंत राग आला, आणि तो म्हणाला 'काय, हें सर्व हलधरीनें म्हटलें! जो साधु नेहमीं देवाविषयींच विचार करतो, आणि ज्यानें देवासाठीं संसार व संसारसुखें यांचा त्याग केला आहे, अशा साधूचा देह मातीचा गोळाच आहे असें त्याला वाटतें काय? ईश्वराच्या भक्ताचा देह साधारण मानवांच्या देहाप्रमाणें जड मातीचा नसून तेजाचा, आत्म्याचा—चैतन्यमय असतो हें त्याला माहीत नाहीं काय?' पुन्हां दुसऱ्या खेपेला पूजेकरितां फुलें नेण्यास जेव्हां कृष्णकिशोर देवालयांत आला तेव्हां त्यानें हलधरीच्या तोंडाकडे पाहण्याचें टाळलें, इतका त्याला त्याचा राग आला."

सद्गुरु पुढें ह्मणतात "एकदां त्यानें मला विचारलें कीं 'आपण यज्ञोपवीत कां टाकून दिलें आहे?' साक्षात्कारामुळें जेव्हां माझ्या स्थितींत प्रथम बदल झाला, तेव्हां आश्विनमधील (१८६४ सालांतील) मोठ्या वादळानें जणूं काय माझें सर्व कांहीं उडून गेलें. जुन्या खाणाखुणा वाहून गेल्या, बाह्य देहाची स्मृति मला नव्हती. तेव्हां माझ्या जानव्याची किंवा कौपीनची काळजी कोण

**ईश्वरी साक्षात्कारानंतर श्रीरामकृष्णांची स्थिति.**

घेणार ? उत्कट समाधींत लीन झाल्यामुळें मी दिवसभर नग्न असें. याकरितां जानवें टाकून दिल्याबद्दल कृष्णकिशोर जेव्हां मला बोलला, तेव्हां त्याला मीं एवढेंच उत्तर दिलें, कीं 'तुला एकदां ईश्वराचें वेड लागलें, कीं, हें सर्व तुला स्पष्ट कळेल!' आणि मीं भाकित केल्याप्रमाणें लवकरच घडून आलें. त्यालाहि ईश्वराचें पिसें लागलें. तो एका खोलींत आपणास कोंडून घेत असे, आणि तेथें स्वस्थ बसून एकसारखा प्रणवाचा (ॐकाराचा) जप करीत बसे. ह्याला खरोखर वेड लागलें, असें त्याच्या घरच्या मंडळीस वाटून त्यांनीं एका कविराजास (वैद्यास) बोलावून आणलें. नाटागोरचे डाक्टर राम हे त्याला पाहण्यास आले."

**खरा आत्मा.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "कृष्णकिशोर वैद्यास ह्मणाला ' महाराज, माझा रोग नाहींसा करा, पण ईश्वरी कृपेनें ज्या प्रणव मंत्राची महती मला कळून आलेली आहे तो माझा मंत्र मात्र नाहींसा करूं नका.' " सर्व मंडळी हंसते.

सद्गुरु पुढें ह्मणतात "दुसऱ्या एका प्रसंगीं तो कसलासा विचार करीत आहे असें मीं पाहिलें, आणि काय झालें आहे असें विचारलें. त्यानें उत्तर दिलें कीं, 'सरकारी कर वसूल करणारा येथें आला होता; मीं कर दिला नाहीं तर माझीं भांडींकुंडीं बाहेर काढतों, अशी त्यानें मला धमकी दिली. मला याची दहशत बसली आहे.' मीं हंसून ह्मटलें ' कांहीं चिंता नाहीं ! त्याला वाटेल तें करूं दे, आणि तुझीं भांडींकुंडीं तो विकूं दे. तुला कैद करून तो न्यायाधिशाकडे नेवो. पण या सर्वानें तुझें काय होणार? कारण, खरोखर तूं कांहीं देह नाहींस, आणि तुला तुझ्या खऱ्या आत्म्यास तो केव्हांहि बांधूं शकणार नाहीं. तुझ्या नेहमींच्या ह्मणण्याप्रमाणें तूं 'ख' ह्मणजे आकाश नाहींस काय ? "

नरेंद्र आणि इतर हांसतात.

**निराकार गगनवत्.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "होय, तो नेहमीं ह्मणत असे, कीं, आपला आत्मा आपल्या सभोंवार असलेल्या निराकार आकाशाप्रमाणें आहे. परमात्म्याचा अवतार श्रीराम याविषयीं ज्यांत वर्णन आलें आहे, असा अध्यात्मरामायण ग्रंथ तो नेहमीं आस्थेनें वाचीत असे. 'तूं ख-आकाश आहेस. तुझा आत्मा देह नाहीं तर तो विश्वात्माच आहे,' असें ह्मणून मी स्वतःची पुष्कळदां करमणूक करून घेत असें. त्या दिवशीं मीं त्याची खात्री करून दिली, कीं, कोणताहि कर वसूल करणारा

अधिकारी तुला खेंचून दूर ओढणार नाहीं; तो फार झालें तर तुझा जड देह धरून नेईल, पण तुझ्या ह्मणण्याप्रमाणें तूं कांहीं जड देह नाहींस !" सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणतात " मला जेव्हां ईश्वराचें वेड लागलें होतें, तेव्हां मनुष्या-

**कोणाचा मान राखीत नसत.**

विषयीं आणि वस्तुविषयीं मला जें कांहीं वाटत होतें तें मी नेहमीं बोलून दाखवीत असें. मी मनुष्यांच्या दर्ज्यांचा विचार करीत नसें. श्रीमंतांचा किंवा अधिकाऱ्यांचा धाक मी बिलकुल बाळगीत नसें. एके दिवशीं आमच्याजवळच्या जदुमलिकच्या बागेंत जतींद्र टागोर आला होता. मीं जतींद्रास विचारलें ' मनुष्याचें कर्तव्य काय आहे ? ईश्वरावर मन लावणें हें आमचें पहिलें कर्तव्य नाहीं काय ?' जतींद्र ह्मणाला ' आह्मीं संसारी आहों. संसारी लोकांनां कधींतरी मोक्ष मिळण्याची आशा आहे काय ? राजा युधिष्ठिराची गोष्ट ध्याना ! तो किती पवित्र आणि सदाचरणी होता; पण एकदां तो खोटें बोलला होता त्यामुळें त्याला नरकाचें दर्शन ध्यावें लागलें. ' यानें मला फार राग आला आणि मीं त्याला हटकून ह्मटलें ' तूं किती विलक्षण मनुष्य आहेस ! युधिष्ठिराला नरक पहावा लागला हें तूं लक्ष्यांत ठेविलें आहेस; पण त्याची सत्यनिष्ठा, त्याची भक्ति, त्याची क्षमाशीलता, त्याचें आत्मज्ञान आणि वैराग्य यांची काय वाट ?' आणखी असेंच मी त्याला टाकून बोलणार होतों, इतक्यांत हृदयानें माझें तोंड बंद केलें. आपणाला जरूरीचें काम आहे असें सांगून जतींद्र निघून गेला. "

सद्गुरु पुढें म्हणतात " दुसऱ्या एका प्रसंगीं मी विश्वनाथ क्यापटन बरोबर सुरेंद्र टागोरच्या घरीं गेलों होतों. भेट झाल्यावर प्रथमच मीं त्याला म्हटलें ' हें पहा, मी तुला राजा वगैरे कांहींच म्हणणार नाहीं. कारण, तसें बोलणें म्हणजे खोटें बोलण्यासारखें होईल.' त्याचें माझ्याशीं कांहीं वेळ संभाषण झालें. पण मध्येंच बरेच पाहुणे–त्यांत कांहीं युरोपियनहि होते–त्याला भेटावयास येत आणि आमच्या संभाषणांत व्यत्यय आणीत. संसारी लोकांप्रमाणें त्याला पुष्कळ आधिव्याधि होत्या, असें माझ्या नजरेस आलें. आह्मी भेटावयास आलों आहों असें त्यांनीं आपल्या वडील बंधूस–जतींद्रास—सांगून पाठविलें. आपल्या घशांत दुखत आहे, सबब येतां येत नाहीं, असा जतींद्राकडून निरोप आला. एकदां गंगेच्या किनाऱ्यावर बाऱ्हानगर घाटापाशीं एक वयोवृद्ध ब्राह्मण ईश्वराचें नाम घेत असतां माझ्या दृष्टीस पडला. त्याच्या मनांत दुसराच विचार

चालला आहे असें मला दिसून आलें. लागलेंच ईश्वराकडे पुन्हां त्याचें मन वळविण्यासाठीं मीं त्याच्या पाठीवर दोन तडाके दिले!" सर्व मंडळी हंसते.

सद्गुरु पुढें ह्मणतात "एकदां राणी राशमणी देवालय पहावयास आली होती. मी देवाचा पुजारी या नात्यानें पूजा करीत असतांना ती आंत आली. ईश्वराचें नाम गाण्यास तिनें मला सांगितलें. मी गाऊं लागलों, पण तिचें लक्ष दुसरीकडे आहे आणि पूजेनिमित्त ती फुलें निवडीत आहे, असें मला दिसलें. मीं तिला दोन चपराकी दिल्याबरोबर ती हात जोडून ध्यान करूं लागली." पुनः हंशा पिकतो.

सद्गुरु पुढें ह्मणतात "माझी ही स्थिति माझ्या चुलतभावाला—हलधरीला मीं सांगितली आणि ह्मटलें कीं, माझी वागणूक किती चमत्कारिक आणि त्रासदायक होत चालली आहे! याला कांहीं उपाय नाहीं काय? मीं मनापासून कळकळीनें माझ्या जगन्मातेची प्रार्थना केली आणि तिच्या कृपेमुळें ही माझी खोड लवकरच गेली. माझ्या त्या स्थितीमध्यें ईश्वराव्यतिरिक्त दुसरा विषय माझ्या कानावर आल्यास मला त्रास होत असे. लोकांनां संसारांतील गोष्टींविषयीं बोलतांना ऐकिलें ह्मणजे मी एकांतीं रडत असें. एकदां मथुरबाबू मला उत्तर हिंदुस्थानांत आपल्याबरोबर पुष्कळ तीर्थांनां घेऊन गेला. काशीक्षेत्रांत राजबाबूच्या घरीं आह्मी कांहीं दिवस राहिलों होतों. एके दिवशीं दिवाणखान्यांत मथुरबाबू, राजबाबू आणि त्याचे लोक कांहीं ऐहिक गोष्टींविषयीं बोलत होते. 'या कामांत इतक्या रुपयांचा फायदा झाला, या कामांत इतका तोटा झाला,' असें त्यांचें भाषण चाललें होतें. मी एकांतीं गेलों आणि रडून आकांत केला, व जगन्मातेस ह्मटलें 'हे माते! तूं मला कुठें आणलेंस? या क्षेत्रापेक्षां दक्षिणेश्वराच्या देवालयांतच मला फार बरें वाटतें. तीर्थें पाहण्याकरितां हे लोक आले आहेत; पण माते, ते कनक आणि कांता यांविषयींच बोलत आहेत. देवालयांत असें भाषण मला ऐकावें लागत नसे, ह्मणून तेंच मला अधिक चांगलें वाटतें."

**श्रीरामकृष्ण काशीस जातात. यात्रेची महती.**

नंतर थोडीशी विश्रांति घे असा नरेंद्रास आग्रह करून सद्गुरु स्वतः विश्रांति घेण्यासाठीं लहान माच्याकडे गेले.

---

## अध्याय दुसरा.

### नरेंद्र आणि इतर शिष्य यांसहित सद्गुरु ईश्वराचें नाम गातात.

दुपारीं नरेंद्र कांहीं पवित्र स्तोत्रें ह्मणूं लागला. या वेळीं राखल, लाटू, प्रियनाथ, नरेंद्राचा एक ब्राह्मो मित्र, हजरा व मी इत्यादि मंडळी हजर होतों. मृदंगावर तंबुऱ्यावर नरेंद्र खालील पदें ह्मणूं लागला. नरेंद्र व इतर शिष्य मृदंगाच्या तालावर सद्गुरुसभोंवतीं नाचूं लागले. सर्व मिळून पद ह्मणूं लागले:–

सत्यं शिव सुन्दररूप भाति हृदिमन्दिरे ।
निरखि निरखि अनुदिन मोरा डुबिब रूपसागरे ॥
से दिन कबे हबे दीनजनेर भाग्ये नाथ ।
ज्ञान अनन्तरूपे पशिबे नाथ मम हृदे ।
अबाक् हइये अधीर मन शरण लइबे श्रीपदे ॥
आनन्द अमृतरूपे उदिबे हृदयआकाशे ।
चन्द्र उदिले चकोर जेमन क्रीडये मन हरषे ।
आमराओ नाथ तेमनि करे, मातिब तव प्रकाशे ॥
शान्तं शिव अद्वितीय राजराजचरणे ।
विकाइब ओहे प्राणसखा सफल करिब जीवने ।
एमन अधिकार कोथा पाव आर स्वर्गभोग जीवने । (सशरीरे)॥
शुद्धमपापविद्धं रूप हेरिये नाथ तोमार ।
आलोक देखिले आंधार जेमन जाय पलाइये सत्वर ।
तेमनि नाथ तोमार प्रकाशे पलाइबे पापआंधार ॥
ओहे ध्रुवतारा, मम हृदे, ज्वलन्त विश्वास हे ।
ज्वालि दिये दीनबंधु पूराओ मनेर आश ।
आमि निशिदिन प्रेमानंदे मगन हइये हे ॥
आपनारे भूले जाब तोमारे पाइये हे ।
से दिन कबे हबे हे दीन जनेर भाग्ये नाथ ॥

शेवटीं नरेंद्र म्हणालाः—

आनन्दवदने बल मधुर ब्रह्मनाम ।
नामे उथलिबे सुधासिन्धु पिय अविराम ।
पान कर आर दान कर हे ॥
जदि हय कखन शुष्क हृदय, करो नाम गान ।
विषय—मरीचिकाय पडे हे प्रेमे हृदय सरस हबे हे ॥
देख जेन भुलनारे सेइ महामन्त्र ।
विपदकाले, डेक ताँरे दयाल पिता बले ।
सबे हुंकारिये छिन्न कर पापेर बन्धन ।
जय ब्रह्म जय बले हे ॥
एस ब्रह्मानन्दे माति सबे हइ पूर्णकाम ।
प्रेमयोगे योगी हये हे ॥

गाणें संपल्यावर सद्गुरू नरेंद्रास आलिंगून ह्मणाले " तुला शांति आणि दिव्यानंद प्राप्त होवो ! तूं मला आज अवर्णनीय आनंद दिलास त्याचें मी कसें वर्णन करूं ?" सद्गुरूंच्या अंतःकरणांतील दैवी प्रेमाला उकळी फुटून तें बाहेर वाहत चाललें !

सुमारें आठ वाजले. उत्तरेच्या ओटयावर सद्गुरु दैवी प्रेमानें धुंद होऊन एकटेच फिरूं लागले. ओटयाच्या एका टोंकाहून दुसऱ्या टोंकाकडे सद्गुरु झपाझप पावलें उचलीत जोरानें फिरत होते. ते जगन्मातेशीं बोलत आहेत, असें दिसलें. वेडयाप्रमाणें ते मोठयानें बोलूं लागले "तूं आतां माझें न्याय ( वाईट ) करणार?"

आपलें संरक्षण जगन्माता करीत असल्यामुळें मायेला आपलें कांहीं वाईट करतां येत नाहीं, असा सद्गुरूंच्या ह्मणण्याचा भावार्थ आहे काय ? मंडळी आजरात्रीं येथेंच राहणार व नरेंद्र येथेंच राहणार ह्मणून सद्गुरूंच्या आनंदाला आज पारावार नव्हता !

जेवण तयार होतें. चपात्या, डाळ वगैरे पदार्थ नौबतखान्यांतील माईनें तयार केले होते. सुरेंद्रानें खर्चाचा मोठा भाग दिला होता. शिष्यमंडळी केव्हां केव्हां येथें राहत असे. सद्गुरूंच्या खोलीच्या आग्नेय दिशेकडील ओटयावर पानें मांडिलीं. नरेंद्र आणि कांहीं शिष्य खोलीच्या द्वारापाशीं उभे राहून बोलत होते.

## तृतीय परिच्छेद–अध्याय दुसरा.

नरेंद्र मला ह्मणाला "कां हो, हल्लींची तरुण मंडळी आपणाला कशी काय आवडते ?"

मी ह्मणालों, "ती कांहीं वाईट नाहीं; पण त्यांनां धार्मिक शिक्षणाची जरूरी आहे."

शाळा व कॉलेजें येथील शिस्तीवर नरेंद्राचें मत.

नरेंद्र ह्मणाला "माझें तर मत असें आहे, कीं, ती अलीकडे विशेष बिघडत चालली आहे. वर्ड्‌सआय (सिगारेट), तरुण ऐष-आरामी लोकांची संगत, भपका, डामडौल, टाळाटाळी, उडाणटप्पूपणा, हेच प्रकार नेहमीं नजरेस पडतात."

मीं ह्मटलें "आह्मी विद्यार्थी असतांना असे प्रकार पाहिले नाहींत !"

नरेंद्र ह्मणाला "मला वाटतें, आपण अशा मंडळींत मिसळलांच नाहीं. वाईट लोक तरुण मुलांशीं परिचयानें वागत असतांना मीं पाहिलें आहे. यांची ओळख कुठून व कशी होते याचेंच मला आश्चर्य वाटतें."

मीं विचारिलें "असें आहे काय ?"

नरेंद्र ह्मणाला "माझ्या कांहीं मित्रांनीं आपलें शील या रीतीनें कसें बिघडवून घेतलें आहे हें मला स्वतः माहीत आहे. शाळेंतील आणि कॉलेजांतील अधिकाऱ्यांनीं आणि मुलांच्या पालकांनीं या गोष्टीकडे लक्ष दिलें पाहिजे."

या रीतीनें आमचें भाषण चाललें आहे, इतक्यांत सद्गुरु खोलींतून बाहेर आले, आणि हंसत विचारूं लागले "तुह्मी काय बोलत होतां ?"

अत्यावश्यक अशी एक गोष्ट.

नरेंद्र हंसत म्हणाला "शाळा आणि कॉलेजें यांविषयीं आह्मी बोलत होतों. येथील विद्यार्थ्यांचें शील असावें तितकें चांगलें नाहीं."

यानंतर माझ्याकडे वळून गंभीरतेनें व खिन्नतेनें सद्गुरु म्हणाले "या विषयावर बोलणें चांगलें नव्हे ! ईश्वराविषयींच बोला, दुसरी गोष्ट सोडून द्या. या मुलांपेक्षां वयानें तूं वडील आहेस. तुला हें सर्व चांगलें समजलें पाहिजे. ईश्वराशिवाय दुसऱ्या कोणत्याहि विषयांवर बोलूं नये, अशी सूचना तूं त्यांनां देऊन सावध राहण्यास बजाविलें पाहिजे होतेंस."

मला लाज वाटली. नरेंद्र आणि इतर शिष्य कांहीं वेळ स्तब्ध बसले. नरेंद्राचें वय एकोणीसवीस आणि माझें सत्तावीसअठ्ठावीस वर्षांचें होतें.

मंडळी नंतर जेवावयास बसली. नरेंद्र आणि इतर मंडळी यांचें भोजन चाललें होतें हें पाहून सद्गुरूला आनंद झाला आणि ते हंसूं लागले.

ईश्वराचें नाम गातात.

आज सद्गुरु फार आनंदांत होते. भोजनोत्तर शिष्यमंडळी खोलींत आली, आणि चटईवर विश्रांति घेत बसली. सद्गुरूंबरोबर बोलून ते आनंद करूं लागले. एक मोठी जत्रा भरलेली आहे, आणि तेथें दैवी आनंद वांटला जात आहे, असें दिसलें. सद्गुरूंनीं खालील गाणें म्हणण्यास नरेंद्रास सांगितलें, आणि नरेंद्र मृदंगाच्या तालावर तें म्हणूं लागला.

चिदाकाशे हलो पूर्ण प्रेमचन्द्रोदय हे।
उथलिल मेमसिन्धु कि आनन्दमय हे।
जय दयामय, जय दयामय, जय दयामय ! ॥

चारिदिके झलमल, करे भक्त ग्रहदल।
भक्तसंगे भक्तसखा लीलारसमय हे।
जय दयामय, जय दयामय, जय दयामय ! ॥

स्वर्गेर दुयार खुलि, आनन्द लहरी तुलि, ।
नवविधान वसन्तसमीरण रय।
फुटे ताहे मन्द मन्द, लीलारसप्रेमगन्ध।
घ्राणे योगिवृन्द योगानन्दे मत्त हय हे।
जय दयामय, जय दयामय, जय दयामय ! ॥

भवसिन्धुजले विधान–कमले, आनन्दमयी विराजे, ।
आवेशे आकुल भक्त अलिकुल पिये सुधा तार माझे ॥
देख देख मायेर प्रसन्न वदन, चित्तविनोदन भुवनमोहन, ।
पदतले दले दले साधुगण, नाचे गाय तारा हृद्ये मगन; ॥
किवा अपरूप आहा मरि मरि, जुडाइल प्राण दरशन करि।
प्रेमदासे बले सबे पाय धरि, गाओ भाई मायेर जय ! ॥

सद्गुरुहि गाऊं नाचूं लागले. त्यांनां मध्यें घालून शिष्य गाऊं व नाचूं लागले. गाणें संपल्यावर वायव्येकडील ओटयावर सद्गुरु फिरूं लागले.

येथें हझरा बसला होता. हातानें माळेचे मणी ओढीत तो परमेश्वराचें नाम घेत होता. सद्गुरु त्याच्याजवळ जाऊन बसले आणि त्याच्याशीं आणि मजबरोबर बोलूं लागले.

## तृतीय परिच्छेद—अध्याय तिसरा.

**सद्गुरु एका शिष्यास विचारूं लागले " निद्रेंत तुला देवाविषयीं कांहीं स्वप्नें**
**साक्षात्कार.** पडतात काय ?"

शिष्य ह्मणाला "होय महाराज, मला परवां एक मजेदार स्वप्न पडलें होतें. सर्व विश्व अगदीं जलमय—पाण्याचा एकच विस्तार होऊन गेलें आहें. जिकडे तिकडे पाणीच पाणी ! खाली, वर आणि सर्व बाजूंस पाण्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं ! इतक्यांत मला मोठा पूर आला. दूर दिसणाऱ्या होड्या पाण्याखालीं बुडून गेल्या, कांहीं बचावल्या. त्यांत माझ्या आईची एक होडी होती. मी एका जहाजावर होतों; त्यावर शेलकी मंडळी होती. इतक्यांत असा चमत्कार झाला, कीं, एक ब्राह्मण निर्धास्तपणें—जणूकाय तो जमिनीवरच पावलें टाकीत आहे, अशा रीतीनें पाण्यावर चालूं लागला. मीं त्याला ओरडून विचारिलें ' तूं समुद्रावर कसा चालतोस ?' हंसत हंसत तो ह्मणाला ' येथें भिण्याचें कांहीं कारण नाहीं ! पाण्याखालीं असलेल्या पुलावर माझे पाय टेंकत आहेत.' मीं विचारिलें ' महाराज ! आपण कुठें चाललां ?' त्यानें उत्तर दिलें 'मातेच्या नगरास—भवानी-पुरास.' त्या साधूबरोबर जाण्याची मला इच्छा होऊन मीं त्याला ह्मटलें 'जरा थांबा, मी आपल्याबरोबर येतों. मलाहि तेथेंच जावयाचें आहे.' त्यावर तो हंसून ह्मणाला 'अरे, मला तेथें जाण्याची फार घाई आहे; त्या नगरास जाणारा रस्ता निरखून ठेव आणि मग माझ्या मागून ये."

सद्गुरु ह्मणाले " तुझें स्वप्न ऐकतांना माझ्या शरीरांत आनंदाचा उकळ्या फुटल्या, आणि अंगावर रोमांच उभे राहिले. तुला दीक्षा देण्याची वेळ आतां अगदीं समीप आली आहे."

## अध्याय तिसरा.

### प्रथम कोणतें साधावें ? आध्यात्मिक उन्नति, कीं सामाजिक सुधारणा ?

रात्रीचे अकरा वाजले. नरेंद्र आणि इतर शिष्य निजले. सद्गुरूंच्या खोलींत एका बिछान्यावर ते निजले. दुसऱ्या दिवशीं पहांटे कांहीं शिष्य उठून ईश्वराचें

**श्रीरामकृष्ण प्रातः-कालचीं स्तोत्रें ह्मणूं लागले.**

ध्यान करूं लागले. या वेळीं सद्गुरु अमृतासारख्या मधुर स्वरानें ईश्वराचें नाम गात होते. पांच वर्षांच्या बालका प्रमाणें खोलींत ते नग्न फिरत होते. खोलींत लाविलेल्य चित्रांपाशीं जाऊन भिंतीला मस्तक टेंकून ते नमस्कार कर लागले. दरवाजा उघडून पूज्य बुद्धीनें गंगेच्या प्रवाहाकडे ते पाहूं लागले.

ईश्वराचें नाम गाऊन सद्गुरु ह्मणाले "हे जगन्माते, तूं प्रत्येक वस्तूमध्यें व्यक्त झाली आहेस. भागवत, वेद, पुराणें, तंत्रें, गीता, गायत्री, इत्यादि तूंच आहेस. माते, तुझे भक्त तुझींच रूपें आहेत. तूं देशकालातीत ब्रह्म आहेस. तूं पुरुष आहेस; प्रकृतिहि तूंच आहेस. तूं साकार आणि निराकार आहेस. तूंच हें आमच्यासमोरील विराट स्वरूप आहेस. सांख्यांची चोवीस तत्त्वेंहि तूंच !"

सकाळीं देवालयांतील मूर्तीपुढें आरत्या सुरू झाल्या. शंख, घंटा, झांज इत्यादिकांचे पवित्र ध्वनि देवालयांतून बाहेर येऊं लागले. पूजेकरितां पुजारी आणि नोकर फुलें जमा करूं लागले. सर्व शिष्यमंडळी उठली आणि प्रातः-

**नरेंद्र आणि एक अत्यावश्यक गोष्ट.**

कालची नौबत वाजूं लागली. नरेंद्र आणि इतर शिष्य प्रातर्विधि आटोपून हंसत हंसत सद्गुरूंसमोर आले. सद्गुरु आपल्या खोलीजवळ ओट्यावर हंसत उभे होते.

नरेंद्र ह्मणाला "पंचवटीपाशीं आह्मीं कांहीं संन्यासी, नानकाचे अनुयायी पाहिले."

सद्गुरु ह्मणाले "मला माहीत आहे. ते कालच येथें आले आहेत. तुह्मीं सर्वांनी एके ठिकाणीं बसावें, हें बरें."

त्याप्रमाणें शिष्य चटईवर बसले. सद्गुरु त्यांचेकडे आनंदानें पाहून बोलूं लागले नरेंद्रानें विचारिलें "देव प्राप्त करून घेण्याचे उपाय कोणते ?"

सद्गुरु ह्मणाले "मुख्य अत्यावश्यक गोष्ट ह्मणजे भक्ति होय. ईश्वरावर प्रेम करूं लागलें ह्मणजे वैराग्य आणि विवेक (आत्मानात्मविवेक) हे आपोआप येतात."

नरेंद्रानें विचारिलें "महाराज, तंत्रांत असें सांगितलें आहे, कीं, आह्मीं स्त्रियांसह ईश्वराची भक्ति करावी, असें नाहीं काय ?"

सद्गुरु ह्मणाले "स्त्रियांच्या संगतींत अभ्यास करावा ? हें कांहीं चांगलें नाहीं !

**स्त्री माता.**

तंत्रामध्यें असा एक मार्ग सांगितला आहे खरा; पण या मार्गानें देवाप्रत पोहोंचणें फार कठीण आहे. उलट, अवनति मात्र खात्रीनें ठेवलेलीच. अभ्यासाचा क्रम असा आहे. प्रथम स्त्रियेला प्रिया (आणि आपण प्रियकर) असें मानावें. दुसरें स्त्रियेला सखी (आणि आपण तिच्या हाताखालील परिचारिका ) मानावें. तिसरें तिला माता मानावें. मी स्त्रियेला माता असें मानतों. आपणास दासी किंवा परिचारिका मानणें यांत कांहीं वावगें नाहीं; पण आपणास तिचा प्रियकर मानणें ह्यानें मात्र खास अवनति होते. तिचे आपण मूल आहों ही भावना सर्वांत उत्तम व पवित्र होय ! "

राहत असे. त्या खेड्यांत जुनें, पडून गेलेलें असें एक देवालय होतें. तेथील

**हृदयमंदिरांतील परमेश्वर.**

देवाची मूर्तिसुद्धां कोणीं नेली आणि तें देवालय वड-
वाघुळांचें स्थान झालें होतें. एके दिवशीं रात्रीं घंटा, झांज
आणि शंख इत्यादिकांचा ध्वनि त्या देवालयांतून
ऐकून खेड्यांतील सर्व लोकांनां मोठें नवल वाटलें. पुरुष.
तेथें धांवून आलीं. आंत नवीन मूर्तीची स्थ
तिची पूजाअर्चा, आरती वगैरे करीत
पवित्र ध्वनि ऐकत ते हात जोडून
एका विशेष जिज्ञासूनें धैर्य करून
आहे आणि शंख वाजवीत
मगळीकडे घाण पडली
ह्मणाला ' हे पोडो,
आहेस ? तूं देवाल
आणि गंगाजळ
पांच कर्मेंद्रि
टाकीत
हें हो
टाकू
दि
स
त
ए
ि
सं
नं

## तृतीय परिच्छेद–अध्याय चवथा.

नंतर सद्गुरु मणीशीं एकान्तं म्हणाले "जो संसारी मनुष्य देवाला विसरला आहे, त्याला मोक्षाची आशा क्वचित्च आहे; पण हें विधान ईश्वरावर खरें प्रेम करणाराला लागू नाहीं ! कारण, ईश्वराचा साक्षात्कार झालेल्या मनुष्यानें खुशाल निर्भयपणें संसारांत रहावें. अशा मनुष्यानें वारंवार एकांतवासांत जाऊन ईश्वराची खरीखुरी भक्ति संपादन करावी. होय, अशा मनुष्याला संसारांत निर्भयपणें राहतां येतें. बरेच गृहस्थाश्रमी चैतन्यदेवाचे शिष्य होते. ते संसारांत–जगांत–रहात होते खरे, पण ते संसारी नसत. ते संसाराविषयीं अनासक्त असत."

मध्यान्ह झाला. पूजा, आरती, नैवेद्य इत्यादि आन्हिक आटोपलें. आतां देवालयांतील देव थोडीशी विश्रांति घेतील. मध्यान्हाची नौबतहि झडूं लागली. सद्गुरु जेवावयास बसले. नरेंद्र आणि इतर शिष्य देवाचा नैवेद्य ग्रहण करणार.

# चतुर्थ परिच्छेद.

अक्टोबर १८८२.

## अध्याय पहिला.

## ब्रह्मसमाजाचे पुढारी केशवचंद्र सेन यांचेबरोबर सद्गुरूंचा वाफरांतून प्रवास.

आज लक्ष्मीपूजनाचा दिवस. दुर्गापूजेनंतरची ( कार्तिकी ) पौर्णिमा. शुक्रवार २७ अक्टोबर, १८८२. सद्गुरु, विजय, गोस्वामी आणि हरलाल यांच्याशीं बोलत देवालयाच्या उद्यानांतील आपल्या खोलींत बसले होते. एका गृहस्थानें येऊन सांगितलें कीं

**समाधि.**

" केशवचंद्र सेन आले आहेत. घाटासमोर असलेल्या आगबोटीवर ते आहेत.

थोड्या वेळानें केशवाचे शिष्य आले आणि श्रीरामकृष्णांनां प्रणाम करून ह्मणाले " आपल्याकरितां वाफर तयार आहे. केशवबाबू वाफरावर आहेत. तेथें येऊन आपण त्यांनां भेटावें, अशी त्यांची विनंति आहे. प्रवास आपल्यास सुखकर होईल यांत शंका नाहीं. "

नुकते चार वाजले होते. एका होडींत बसून सद्गुरु वाफराकडे जाण्यास निघाले. होडींत बसतांच देहभान जाऊन सद्गुरूंस समाधि लागली. विजय त्यांचेबरोबर होता.

मी वाफरावर होतों. सद्गुरूंची होडी दिसली, तेव्हां सद्गुरूंचीं सर्व इंद्रियें शांत व स्वस्थ झालीं असून ते समाधिसुख अनुभवीत आहेत, असा रम्य देखावा माझ्या दृष्टीस पडला. दुपारीं तीन वाजतां मी बोटीवर बसलों. सद्गुरु व केशव यांची भेट झालेली पहावी, आणि त्या भेटीपासून निःसंशय होणारा आनंदहि अनुभवावा व त्यांचें भाषण ऐकावें, अशी मला फार इच्छा झाली. मजसारख्या पुष्कळ तरुणांचीं मनें आपल्या उत्तम स्वभावानें आणि अप्रतिम वक्तृत्वानें केशवानें आपल्याकडे ओढून घेतलीं होतीं.

# चतुर्थ परिच्छेद—अध्याय पहिला.

पुष्कळ लोक केशवाला आपला आप्त समजून त्याच्यावर पूर्ण प्रेम करीत. केशवाला इंग्रजी शिक्षण मिळालेलें होतें. इंग्लिश तत्वज्ञान आणि वाङ्मय यांत केशवानें बरेंच प्रावीण्य संपादिलें होतें. पुष्कळ वेळां त्यानें मूर्तिपूजेचा निषेध केला होता. असा हा मनुष्य श्रीरामकृष्णांनां मान देतो व चाहतो, आणि देवालयांत त्यांनां भेटावयास वारंवार जातो, हें फार आश्चर्यकारक खरें. या दोघांचें कोठें जुळतें हें पाहणें फार मौजेचें असलें पाहिजे.

देव निराकार आहे असें सद्गुरूंचें मत. या मुद्याविषयीं केशवाचें व त्यांचें एकमत असे. पण देव साकारहि आहे, असें सद्गुरु ह्मणत. सद्गुरु ब्रह्माचें ध्यान करीत खरें, पण देवदेवतांची—मूर्तींची—गंध, पुष्प, नैवेद्य यांनीं पूजा करण्यास ते चुकत नसत. इतकेंच नव्हे, तर मूर्तीसमोर भक्तीनें वेडावून ते गातात आणि नाचतात, खाटेवर निजतात, तांबड्या किनारीचीं धोतरें वापरतात, कोट, स्टॉकिंग्ज, स्लीपर इत्यादिकांचा उपयोग करितात. इतकें सर्व (संन्यासधर्माच्या विरुद्ध) करून ते संसारी नाहींत! गृहस्थाहून भिन्न अशीं त्यागी किंवा संन्यासी यांचीं लक्षणें त्यांच्यांत बाणलेलीं दिसतात. ह्मणून लोक त्यांनां परमहंस ह्मणत. देव निराकार आहे असें केशवाचें मत. पण तो आपल्या बायकामुलांसहित राहतो, इंग्रजींत व्याख्यानें देतो, धार्मिक विषयांचें वर्तमानपत्र काढतो, व आपल्या मतांप्रमाणें ऐहिक गोष्टींचें आचरणहि करतो.

होडी जवळ आली. प्रत्येकजण सद्गुरूंनां पहाण्याकरितां दरवाजाकडे आला. सद्गुरूंनीं वाफरावर सुरक्षित चढावें अशी केशवाची फार उत्सुकता दिसून आली.

वाफरावरील वरच्या खोलींत न्यावें ह्मणून सद्गुरूंस देहभानावर आणण्यास पुष्कळ प्रयत्न करावे लागले. अजूनहि त्यांची समाधि पूर्ण उतरली नव्हती. खोलींत जातांना त्यांनां एका शिष्यानें धरिलें होतें. त्यांचीं पावलें चालत होतीं खरीं, पण त्यांचें मन ईश्वराकडेच होतें.

वरच्या मजल्यावरील एका खोलींत त्यांनां नेलें. केशव व इतर लोक यांनीं त्यांनां प्रणाम केला. थोडेंसें देहभान आलें होतें, तेंसुद्धां आतां जाऊं लागलें. खोलींत एक बांक, टेबल आणि कांहीं खुर्च्या होत्या.

सद्गुरु एका खुर्चीवर व केशव दुसऱ्या खुर्चीवर बसले. विजयहि आपल्या जागेवर बसला. बहुतेक ब्राह्मो शिष्य तक्तपोशीवर बसले. खोली लहान असल्या-

मुळें बरीच मंडळी उभी राहून उत्सुकतेनें आंत डोकावून पहात दरवाज्यांत आणि खिडकीपाशीं राहिली.

सद्गुरूंची पुन्हां समाधि लागली. देहभान मुळींच नव्हतें. प्रत्येकजण त्यांचा चेहरा पाहत राहिला. खोलींत बरेच लोक जमले होते व सद्गुरूंस तर स्वच्छ हवेची आवश्यकता होती, हें केशवाच्या लक्षांत आलें. विजय केशवाचा अनुयायी होता; पण अलीकडे ब्रह्मसमाजांत फूट झाल्यानंतर तो साधारणब्रह्मसमाजाचा सभासद झाला होता. आपल्या समाजाच्या तत्वाविरुद्ध केशवानें आपल्या लहान मुलींचें लग्न केल्याबद्दल त्यानें केशवाविरुद्ध पुष्कळदां कित्येक भाषणें केलीं होतीं. विजय येथें येईल ही कल्पना केशवाला नव्हती. तो अकस्मात् आल्यामुळें त्याला जरा कसेंसेंच वाटलें. केशवानें आपल्या जाग्यावरून उठून खिडक्या उघडल्या.

सर्वजण सद्गुरूंकडे स्थिर दृष्टीनें पाहूं लागले. सुद्गुरूंची समाधि उतरली. पण ईश्वराच्या सान्निध्याची जाणीव पूर्वीप्रमाणेंच होती. हलक्या स्वरानें ते जगन्मातेशीं बोलूं लागले. ते ह्मणाले "माते, तूं मला येथें कां टाकिलें आहेस ? ते सर्व बद्ध आहेत; मुक्त नाहींत. त्यांनां या तुरुंगांतून सोडविणें मला शक्य आहे काय ?"

**संसारतुरुंग.**

जगांतील लोक संसाररूपी तुरुगांत कोंडलेले आहेत. समाधीच्या स्वच्छ हवेंत त्यांनां जातां येत नाहीं. त्यांनां दिव्य प्रकाश पाहतां येत नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे, ते ऐहिक गोष्टींनीं पूर्ण बद्ध झालेले आहेत, असें सद्गुरूंस वाटत होतें काय ? संसारी लोकांनां आपल्या तुरुंगांतील तेवढ्या गोष्टी—विषयोपभोग आणि ऐहिक वस्तू—दिसणार. ह्मणून तूं येथें मला कां आणलेंस ? असें सद्गुरु मातेस विचारीत होते काय ?

या प्रसंगीं गाझीपुरचा नीलमाधव हजर होता. सद्गुरु देहभानावर आलेले पाहून तो आणि एक ब्राह्मो शिष्य गाझीपुरच्या पावरीबाबा नांवाच्या साधूविषयीं बोलूं लागले. एक ब्राह्मो सद्गुरूंस ह्मणाला "महाराज, या मंडळीनें गाझीपूरच्या वापरीबाबांनां पाहिलें आहे. तोहि आपल्यासारखा उत्तम साधु आहे."

**आत्मा व देह.**

सद्गुरूंची वाचाशक्ति अद्याप परत आलेली नव्हती. त्यांचें अंतःकरण भरून आलें होतें, पण त्यांनां बोलतां येईना. पावरीबाबाविषयीं बोलणाऱ्या गृहस्थाकडे पाहून ते हंसले.

# चतुर्थ परिच्छेद—अध्याय पाहिला.

ब्राह्मो शिष्य सद्गुरूंस पुढें ह्मणाला " महाराज! पावरीबाबाजवळ आपली तसबीर आहे, आणि ती त्यांनीं आपल्या खोलींत ठेविली आहे."

सद्गुरु पुन्हां हंसले व बोटानें आपला देह दाखवून अगदी हलक्या स्वरांत ह्मणाले " उशीचा अभ्रा—उशीच्या अभ्र्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं!"

उशी आणि उशीचा अभ्रा! आत्मा आणि देह! देहाला मरण आहे, आत्मा मरत नाहीं, तसबीर क्षणभंगुर देहाची आहे, असा सद्गुरूंच्या ह्मणण्याचा रोंख आहे काय? याच कारणाकरितां ते ह्मणतात काय, कीं, आह्मी क्षणभंगुर अशा देहाच्या तसबिरीस फारसें महत्त्व न देतां देहाच्या आंत वास करणाऱ्या—अंतर्यामीं वास करणाऱ्या—आत्म्याचीच पूजा केली पाहिजे!

**परमात्म्याचें मंदिर.**

सद्गुरु पुढें बोलूं लागले "एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. भक्ताचें हृदय हें ईश्वराचें मंदिर होय. सर्व वस्तूंमध्यें कमी अधिक प्रमाणांत ईश्वर व्यक्त झाला आहे हें खरें; पण भक्ताच्या हृदयांत तो विशेष—विशिष्ट रीतीनें व्यक्त आहे. जमीनदार आपल्या मालकीच्या कोणत्याहि घरांत भेटतो; तरी पण लोक ह्मणतात, कीं, जमीनदार नेहमीं आपल्या दिवाणखान्यांत असतात, व तेथें भेटतात. भक्ताचें हृदय हा परमेश्वराचा दिवाणखाना. ईश्वराची भेट घेणें असेल तर त्यानें ती या दिवाणखान्यांतच घेतलेली बरी." सर्व हंसतात.

**देव एकच, पण त्याचीं नावें भिन्न.**

सद्गुरु पुढें ह्मणतात " वेदान्ती ज्याला ब्रह्म ह्मणतात, त्याला योगी आत्मा व भक्त भगवान ह्मणतात. ब्राह्मण एकच असतो, पण देवाची पूजा करण्याचें त्याचें जेव्हां काम असतें तेव्हां त्याला पुजारी ह्मणतात; पण त्याचीच स्वयंपाकघरांत नेमणूक झाली ह्मणजे त्याला आचारी ह्मणतात. निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार मिळवूं पहाणारा वेदान्ती असा विचार करितो, कीं, ब्रह्म

**अद्वैती.**

हें नव्हे, तें नव्हे, ब्रह्म कोणताहि मर्यादित पदार्थ नव्हे, जीव किंवा जगत् नव्हे ( नेति नेति ). अशा तऱ्हेच्या विवेकानें मनांतील वासना नाहींशा होतात. वासना समूळ गेल्या ह्मणजे मर्यादित असें जें मन तेंहि नाहींसें होतें, आणि मग ब्रह्मज्ञान प्राप्त होतें व समाधि लागते. अशा मनुष्याला निर्गुण परमात्म्याचा साक्षात्कार होतो आणि त्यामुळें जग मिथ्या आहे असें त्याला वाटतें. मर्यादित वस्तूंचीं नामरूपें स्वप्नवत्

मिथ्या आहेत. ब्रह्माचें शब्दांनीं वर्णन करितां येत नाहीं. इतकेंच नव्हे, तर देव सगुण पुरुष आहे एवढेंसुद्धां ह्मणतां येत नाहीं. अद्वैत्यांची स्थिति अशी असते.

**द्वैती किंवा भक्त.** द्वैती किंवा भक्त हे निराळ्या दृष्टीनें विचार करितात. अद्वैतमताविरुद्ध जे जागृदवस्था आणि बाह्य जग यांनां खरें –स्वप्नवत् नाहीं–असें मानितात, नामरूपांवर ज्यांची श्रद्धा असते, ते ह्मणतात, कीं, विश्वांतील आमच्यासमोरील सर्व पदार्थ ईश्वरानें केलेले आहेत. नक्षत्रांनीं कोंदून भरलेलें आकाश, सूर्य, चंद्र, पर्वत, समुद्र, मनुष्य, पशु, पक्षी इत्यादि सर्व त्याचीं होत. तो ऐश्वर्यसंपन्न आहे, आणि हें सर्व त्याचें ऐश्वर्य होय. तो आंतबाहेर सारखा भरलेला आहे. भक्तांपैकीं श्रेष्ठ आणखी असें ह्मणतो, कीं, जीवात्मा, बाह्यजगत्, सांख्याचे चोवीस पदार्थ, या रूपानें तोच व्यक्त झाला आहे. भक्त साखर होऊन जाणार नाहीं तर साखरेची गोडी चाखत राहील." सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणतात "भक्ताच्या मनांत खरोखर काय असतें आणि त्याला काय वाटतें, हें तुह्मांला माहीत आहे काय ? तो म्हणतो 'ईश्वरा, तूं माझा यजमान, मी तुझा सेवक; किंवा तूं माझी माता, मी तुझें लेंकरूं; अगर तूं माझें मूल आणि मी तुझी आई, किंवा बाप; किंवा तूं पूर्ण आणि मी तुझा अंश इत्यादि. 'अहं ब्रह्मास्मि' असें भक्त ह्मणणार नाहीं! आत्म्याचा साक्षात्कार घ्यावा असें योग्यालाहि वाटत असतें. आत्मसंयमनाच्या योगें जीवात्म्याचें परमात्म्याशीं ऐक्य (योग) करावें, हा त्याचा उद्देश असतो. विषयांच्या मागें सैरावैरा धांवत असलेलें मन तेथून काढून तो तें प्रथम संकलित करतो, आणि मग त्याला तो परमात्म्याकडे लावितो; ह्मणून सुखकर आणि स्थिर असें आसन घालून एकांतवासांत ईश्वराचें ध्यान करण्याची जरूरी आहे. पण वस्तु एकच, नामें मात्र भिन्न भिन्न. ब्रह्म, आत्मा, भगवान् अशीं नांवें ज्याला लोक देतात तो एकच आहे. पहिलें नांव वेदान्त्यांनीं (अद्वैत्यांनीं), दुसरें योग्यांनीं आणि तिसरें भक्तांनीं दिलें आहे."

---

## अध्याय दुसरा.

### सगुणपरमात्मा, सर्वशक्तिमती काली आणि तिची सत्ता.

वाफर चालूं लागलें व कलकत्याच्या बाजूस परत जाऊं लागलें. स्थिरदृष्टीनें डोळ्याचें पातें न हालतां श्रीरामकृष्णांकडे पाहणारे, आणि त्यांचें उपदेशामृत ऐकणारे असे पुष्कळ लोक जहाजावर होते. वाफर चालूं लागलें हें देखील त्यांनां

समजलें नाहीं. देवालयांतील उद्यान आतां बरेंच दूर राहिलें, आणि तेथील रम्य देखावा दिसेनासा झाला. वरील निळ्या आकाशाला प्रतिबिंबित करणारें असें पवित्र जल खालीं वाहत होतें. वाफर जातांना पाण्याच्या लाटा फुटून त्यांनां फेंस येतो व त्यांचा जो आवाज होतो तो भक्तांच्या कानांला ऐकूं येत नव्हता. सद्गुरूंच्या जादूनें ते सर्व भारलेले दिसले. त्यांच्यासमोर एक विलक्षण विभूति–मनुष्यरूपी ईश्वर ह्मणा, किंवा ईश्वररूपी मनुष्य ह्मणा–उभा होता. त्याचा चेहरा प्रसन्न व हंसतमुख होता. भक्तिरूपी अंजनानें त्याचे डोळे अधिक पाणीदार दिसत. संसार आणि संसारांतील सुखें ज्यांनीं परमेश्वराकरितां टाकून दिलीं आहेत, जे ईश्वर-भक्तीनें धुंद होऊन गेले आहेत, जे ईश्वराशिवाय दुसरें कांहींच पाहत नाहींत, अशा त्या सद्गुरूंकडे ते सर्व मोहित होऊन पाहूं लागले. संभाषण चालू झालें.

**निर्गुण परमात्मा व सृष्टिकर्ता परमात्मा.**

श्रीरामकृष्ण ह्मणतात " शंकराचार्यांच्या अद्वैत वेदान्ताप्रमाणें ब्रह्म काय तें सत्य आहे, आणि हें दृश्य जगत् मिथ्या आहे. ज्या अर्थीनें ब्रह्म सत्य आहे असें आह्मी समजतों, त्या अर्थी सृष्टि, स्थिति, संहार करणारा सगुण परमात्मा–काली माता–सत्य नाहीं. आपली वैषयिक अहंभावना गेल्याशिवाय कोणालाहि –मग तो ' नेति नेति ' ह्मणून कितीहि विचार करो–सगुण परमात्म्याच्या अधिकारा–प्रांता–पलीकडे जातां येणार नाहीं. तुर्यावस्थेमध्यें–समाधीमध्यें मात्र जीवात्मा परमात्म्याशीं एकरूप होतो. ' मी ईश्वराचें ध्यान करीत आहें ' असें जेव्हां कोणी ह्मणतो, तेव्हांसुद्धां तो या प्रांताच्या आंत आहे, गुणधर्म असलेल्या सगुण परमात्म्याची कल्पना त्याला सोडवत नाहीं."

**एकच परमात्मा.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "निर्गुण आणि सगुण परमात्मा एकच आहे. एकावर विश्वास ठेविला ह्मणजे दुसऱ्यावर ठेवल्याप्रमाणेंच होतें. दाहकशक्तीहून अग्नि भिन्न, किंवा दाहकशक्ति अग्नीहून भिन्न आहे, अशी कल्पना करतां येत नाहीं. तसेंच, सूर्यांचे किरण सूर्याहून भिन्न, अगर सूर्य त्याच्या किरणांहून भिन्न आहे, अशी कल्पनाहि करवत नाहीं."

सद्गुरु पुढें ह्मणतात "दूध कसें असतें? लोक ह्मणतात पांढरें असतें. दुधाहून दुधाची शुभ्रता निराळी, किंवा शुभ्रतेहून दूध निराळें, अशी कल्पना करितां येत नाहीं. तसेंच, निर्गुण परमात्मा सगुण परमात्म्याहून निराळा आहे, आणि सगुण परमात्मा निर्गुण परमात्म्याहून भिन्न आहे, अशी कल्पना करतां येत नाहीं.

निर्गुण, अव्यक्त, निराकार परमात्मा, आणि सगुण, व्यक्त, साकार परमात्मा, हे एकमेकांचे सूचक आहेत. एक दुसऱ्याहून भिन्न आहे अशी कल्पनाच करतां येत नाहीं. गुणधर्मयुक्त सगुण परमात्मा—आदिशक्ति हा सृष्टि, स्थिति आणि संहार करितो. याला धर्मग्रंथामध्यें, तंत्रामध्यें विश्वमाता, काली किंवा शक्ति असें ह्मणतात. एवंच, सगुण आणि निर्गुण परमात्मा एकच आहेत. सृष्टि, स्थिति आणि संहार तो करीत नाहीं, तो निष्क्रिय आहे असा जेव्हां मी विचार करतों, तेव्हां मी त्याला निर्गुण ह्मणतों. जेव्हां तो सृष्टि, स्थिति, संहार करतो असें मी समजतों, तेव्हां त्याला मी सगुण ह्मणतों. परमात्मा एकच, भिन्न भिन्न दृष्टीनें पाहिलें असतां नामें निरनिराळीं दिलीं जातात. एकच पाणी पण

**सर्व धर्मांची एकवाक्यता.**

त्याला जल, वॉटर, पाणी, वारी अशीं निरनिराळीं नांवें आहेत. एकाद्या नदीला चार घाट आहेत. एका घाटानें पाणी पिणारे हिंदु 'जल' ह्मणतात; दुसऱ्या घाटानें पिणारे मुसलमान 'पाणी' ह्मणतात; तिसऱ्या घाटानें पिणारे इंग्रज 'वॉटर' ह्मणतात; इत्यादि. तसें, देव एकच आहे, नांवें मात्र भिन्न आहेत. कोणी त्याला अल्ला, कोणी देव, कोणी ब्रह्म व कोणी काली, राम, हरि, येशू, बुद्ध असें ह्मणतात."

केशव हंसत विचारतो "महाराज, विश्वमाता काली या तिच्या लीलात्मक जगतामध्यें कसकशी व्यक्त होते, तें सांगा पाहूं."

यावर श्रीरामकृष्ण हंसत हंसत ह्मणतात "भिन्न भिन्न नांवानें आणि भिन्न दृष्टीनें माता आपल्या खेळण्याशीं—जगताशीं—खेळते. एकदां

**दैवीमाता.**

ती निर्गुण, अव्यक्त अशी महाकाली असते; पुन्हां आपल्या कृत्याहून भिन्न अशी नित्यकाली असते; पुन्हां मृत्यूची अधिष्ठात्री अशी स्मशानकाली असते. केव्हां केव्हां ती आमचें रक्षण करणारी व आम्हांला वरदान देणारी अशी रक्ष्यकाली असते. केव्हां केव्हां ती अनंत आणि सनातन पुरुषाची पत्नी श्यामा अशी भक्तांनां मनोहर दिसते. धर्मग्रंथामध्यें—तंत्रामध्यें या श्यामेचें वर्णन आहे. जेव्हां कांहीं नव्हतें, जिकडे तिकडे दाट अंधकार होता, तेव्हां फक्त माझी निराकार माता—हीच कायती एकटी होती. हिंदु श्यामवर्ण मातेची घरांत पूजा करितात, आणि याच रूपानें ती मानवाला गोचर होते. ती आह्मांला पुष्कळ चांगले वर देते, आणि आमची निष्ठा वाढविते. आपल्या मुलांनां—भक्तांनां भिऊं नका असें ती सांगते. बहुतेक हिंदुलोक

आपल्या गृहीं तिची पूजा करितात. प्लेग, दुष्काळ, भूकंप, अवर्षण किंवा पूर अशा संकटांच्या प्रसंगीं ती आमचें रक्षण करिते, व रक्षकस्वरूपानें दृष्टीस पडते. स्मशानें, रांट इत्यादि ठिकाणीं ती मृत्युरूपानें दिसते. प्रेतें, कोल्हीं, डाकिणी-जोगिणी हीं तिचे भयासुर मित्र होत. अशा भयंकर परिस्थितीमध्यें–देखाव्या-मध्यें–ती राहते. रक्ताच्या धारा, मुंडक्यांची माळ, मृतांच्या हाताचा पट्टा, इत्यादि त्या संहारक भयंकर मातेचीं भूषणें अथवा चिन्हें होत."

सद्गुरु पुढें ह्मणतात " आतां तिच्या सृष्टीकडे पहा. कल्पाच्या–जगत्प्रलयाच्या शेवटीं माझी माता गृहिणीप्रमाणें सृष्टिबीजें एकत्र करिते.

**सृष्टि ह्मणजे काय?**

घरधनिणीचेंसुद्धां आपल्या घरच्या कामाच्या वस्तु ठेवण्याचें एकादें गंगा–जमनी भांडें असतेंच." केशव व इतर मंडळी हंसतात.

श्रीरामकृष्ण हंसत हंसत ह्मणतात "बाबा, होय, खरोखर घरधनिणीचें एक भांडें असतें! त्यांत समुद्रफेण, कांकडी, भोंपळा इत्यादिकांचें बीं वगैरे पदार्थ ठेविलेले असतात. जरूर पडेल तेव्हां ते जिन्नस ती बाहेर काढते. तसेंच, माझी माता जगत्प्रलयानंतर सृष्टीचीं बीजें राखून ठेविते." सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणतात "माझी माता–आदिशक्ति या दृश्य जगताच्या आंत आणि बाहेर आहे. जग उत्पन्न करून ती त्यांत राहते!

**कोळी आणि त्याचें जाळें.**

ती कोळी, आणि जग हें तिनें विणलेलें कोळयाचें जाळें आहे! कोळी आपल्यांतून जाळें बाहेर काढतो, आणि त्यांतच–त्यावर रहातो. माझी माता व्यापक आणि व्याप्य आहे. ती जगाचें कर्तृत्व आणि उपादानकारण आहे. कालीमाता निळ्या, श्याम वर्णाची आहे काय? छे, नाहीं! ती मानवी दृष्टीस फार दूर असल्यामुळें तशी दिसते. आकाश दुरून निळें दिसत नाहीं काय? अगदीं जवळून पाहिलें असतां तें वर्णरहित आहे. तसेंच समुद्राच्या पाण्याचेंहि आहे. दुरून पाहिलें असतां तें निळसर दिसतें; परंतु जवळ येऊन हातांत तें पाणी थोडेंसें घेऊन पहा, ह्मणजे तें वर्णरहित आहे असें तुह्मांला आढळून येईल. तसेंच तुह्मी कालीमातेच्या अगदीं समीप जाऊन पहाल तर ती निर्गुण परमात्म्याप्रमाणें गुणधर्मविरहित दिसेल."

सद्गुरु भक्तीनें धुंद होऊन गाऊं लागले:—

**मा कि आमार कालो रे।**
**कालरूप दिगम्बरी हृत्पद्म करे आलो रे॥**

श्रीरामकृष्ण, केशव व इतरांनां उद्देशून पुढें म्हणतात "मोक्ष व बंध दोन्ही तिनें केलेले आहेत. कनक आणि कांता यांच्या शृंखलांनीं मनुष्य बद्ध झाला आहे, हें मायाशक्तीमुळें होय. विश्वाच्या रचनेबरोबरच तिनें मायाहि उत्पन्न केली आहे. माझ्या मातेच्या कृपेनेंच मनुष्य या शृंखलांपासून मुक्त होतो. ती आपल्या मुलांनां, भक्तांनां त्यांच्या हातापायांतील शृंखला नाहींशा करून संसारसागराच्या पार नेते."

**जीविताचें कोडें.**

नंतर पुन्हां सद्गुरु गंधर्वापेक्षां फार मधुर अशा स्वरांत प्रेमानें आणि आनंदानें गाऊं लागले.

श्यामा मा उडाच्छो घुडि। (भवसंसार बाजार माझे)
(ऐ ये) आशा वायु भरे उडे, बाँधा ताहे माया दडी ॥
काक गन्डी मन्डी गाँथा (ताते) पंजरादि नाना नाडी।
घुडि स्वगुणे निर्माण करा, कारिगिरि वाडवाडि ॥
विषये मेजछ माञ्जा, कर्कशा हयेछे दडी।
घुडि लक्षेर दुटा एकटा काटे, हेसे देओ मा हात चापडि ॥
प्रसाद बले दक्षिणा बातासे घुडि जाबे उडि।
भवसंसार समुद्र पारे पडूबे गिये ताडाताडि ॥

सद्गुरु पुढें म्हणाले "माझी जगन्माता लीलाप्रिय आहे. जग हें तिचें खेळणें आहे. ती आपल्या इच्छेप्रमाणें वागणार. आपल्या मर्जीप्रमाणें ती लाखों मनुष्यांतून एकाद्यादुसऱ्या जीवास या संसारसागरांतून मुक्त करिते."

यावर एका ब्राह्मो शिष्यानें विचारिलें "महाराज, तिच्या मर्जीस आलें तर ती प्रत्येकास मुक्त करील. असें असतां तिनें आम्हांला संसार-शृंखलांनीं बद्ध करून कां टाकलें आहे?"

**जीवात्मा अपूर्ण कां?**

श्रीरामकृष्ण म्हणाले " माझ्या मतें तिची मर्जी! आपण उत्पन्न केलेल्या प्राण्यां-बरोबर खेळ चालू ठेवणें हें तिच्या खुषीचें काम आहे. खेळामध्यें म्हातारी-आजीबाईला जो एकदां शिवला त्याला पुन्हां धांवपळ करण्याची जरूरी नाहीं. नंतर लपंडावाच्या मजेशीर खेळांत त्याला आणखी पुढें सामील होतां येत नाहीं. ज्यांनीं म्हातारीला स्पर्श केला नाहीं, अशा दुसऱ्या लोकांनीं इकडून तिकडे तिकडून इकडे धांवपळ केली पाहिजे. एकदम सर्वांनीं तिला स्पर्श करून डाव बंद करावा, हें तिला कधींहि आवडणार नाहीं. म्हणून लाखों मनुष्यांतून एकादा जीव

आपल्याला जखडून टाकणारीं बंधनें तोडून तिला स्पर्श करून मुक्त होतो, तेव्हां तिला मोठा आनंद होतो, आणि ती त्या आनंदानें टाळ्या पिटूं लागते." भक्तांनां आनंद होतो.

सद्गुरु पुढें ह्मणाले " माझ्या मातेनें जीवाला गुप्तपणें हळूच डोळे मिचकावून असें सांगितलें आहेसें दिसतें, कीं, ' जा आणि पुढील हुकूम होईपर्यंत जगांत संसारांत रहा.' खरोखर, जीवाचा त्यांत कांहीं दोष नाहीं. संसारांतील गोष्टींतून त्याचें मन काढून तें आपल्या चरणकमलावर लावणें आणि पुन्हां त्याला मुक्ति देऊन त्याच्यावर कृपा करणें, हें तिला अगदीं शक्य आहे."

आपण एक संसारजीव आहों आणि आपल्या हृदयांतील सर्व दुःखें आपण जगन्मातेपुढें ठेवीत आहों, अशी भावना धरून सद्गुरूंनीं पुढील पद ह्मटलें—

आमि ऐ खेदे खेद करि ।
तुमि माता थाकृते आमार जागाघरे चुरि ॥
मने करि तोमार नाम करि, किंतु समये पाशरि ।
आमि बुझेछि जेनेछि आशय पेयेछि, ए सब तोमारि चातुरी ॥
किछु दिलेना पेलेना निलेना खेलेना, से दोष कि आमारि ॥
जदि दिते पेते निते खेते दिताम, खाओयाताम तोमारि ॥
यश अपयश, सुरस कुरस, सकल रस तोमारि ॥
( ओ गो ) रसे थेके रसभंग केन रसेश्वरि ॥
प्रसाद बले मन दियेछ मनेरे आँखठारि ॥
( ओ मा ) तोमार सृष्टि दृष्टि पोडा मिष्टि बले घुरि ॥

सद्गुरु पुढें ह्मणाले " मनुष्याला संसारसागरांत बुडवून टाकणारा मोह माझ्या मातेनेंच उत्पन्न केला आहे. रामप्रसाद ह्मणतो, कीं ' हे माते, तूं मला उत्पन्न करतेवेळीं संसाराशीं आसक्त होऊन रहा असें गुप्तपणें (कानांत) सांगितलें आहेस.' "

## अध्याय तिसरा.

### आसक्तिरहित कर्मे ( कर्मयोग ) किंवा गृहस्थाच्या प्रश्नाचा उलगडा.

एक ब्राह्मो शिष्य ह्मणाला "महाराज, या संसाराचा त्याग केल्याशिवाय ईश्वराचा साक्षात्कार होत नाहीं, हें खरें काय ?"

सद्गुरु हंसत ह्मणतात " खचित नाहीं ! तुम्हीं सर्व सोडून द्यावें, असें नाहीं. तुम्ही जसे आहां ती स्थिति उत्तम आहे. सोनें शंभर नंबरी ( शुद्ध ) आणि हीणकस ( किडाळ ) असतें. शुद्ध खडीसाखर आणि अशुद्ध काकवी हे दोन्ही पदार्थ गोड नसतात काय ? " सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणतात " मला असें वाटतें, कीं, तुमची स्थिति उत्तम आहे. नॉक्स ह्मणून एक पत्त्याचा डाव आहे, (यांत डाव जिंकण्यास १७ मार्क पाहिजेत,) तो तुम्हांला माहीत आहे काय ? डाव जिंकण्यास जितके मार्क पाहिजेत त्यापेक्षां अधिक मिळविल्यानें, आणि खेळगड्याकडून वाजवीपेक्षां अधिक पानें घेतल्यानें मी डाव हरलों ! पण तुम्ही फार हुशार आहांत. तुम्ही १० मार्क मिळवून, दुसरे सहा आणि पांचच, मिळवून खुष असतात, ह्मणून डाव चालू राहतो. अधिक पानें न घेतल्यामुळें डाव हरलां नाहींत. चाललें तें बरोबर आहे नाहीं काय ?" सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणतात "मी तुम्हांला खरोखर सांगतों, कीं, तुम्ही संसारी किंवा गृहस्थ असलांत तरी हरकत नाहीं. फक्त तुम्हीं आपलें मन ईश्वराकडे लावलें पाहिजे. एका हातानें तुमचें काम करा, व दुसऱ्या हातानें ईश्वराचे चरण धरा. जर कांहीं काम करावयाचें नसेल तर दोन्ही हातांनीं देवाचे चरण घट्ट हृदयाशीं धरा. मन हेंच मुख्य आहे. मनाची स्वतंत्रता गेली कीं तुमचीहि गेलीच. मन स्वतंत्र तर तुम्ही स्वतंत्र ! मन तांबड्या, निळ्या, पिवळ्या किंवा कोणत्याहि रंगांत रंगवून घ्या. इंग्रजी शिका म्हणजे तुमची इच्छा नसली तरी तुम्हांला इंग्रजींत बोललें पाहिजे, व बूट पाटलोण घालून शीट वाजविली पाहिजे; मग खरोखर इंग्लंडच्या रहिवाशाप्रमाणें वागण्याचा तुम्ही शक्य तितका प्रयत्न करतां. संस्कृत शिकणारा पंडित हा श्लोक पाठ ह्मणणार ! मन जर वाईट संगतींत घालविलें तर त्याचा आपल्या विचारावर आणि भाषणावर परिणाम होणारच. पण तेंच जर भक्तांच्य. संगतींत असलें, तर तें परमेश्वराचें ध्यान करील, आणि त्याच्याच गोष्टी बोलेल. मन हें प्रमुख आहे. वस्तूप्रमाणें—ज्यामध्यें तें राहतें आणि काम करितें त्याप्रमाणें तें आपला स्वभाव बदलतें. पत्नीवरील आसक्ति एका तऱ्हेची असते, आणि मुलीवरील आसक्ति अगदीं निराळ्याच प्रकारची असते. एका बाजूस आपली पत्नी आणि दुसऱ्या बाजूस आपली मुलगी अशा दोघींचेंहि एकादा चुंबन घेतो; पण दरेक वेळीं किती निराळ्या हेतूनें तो प्रेरित होतो ! "

परिस्थितीचा जोर.

# चतुर्थ परिच्छेद–अध्याय तिसरा.

पापाची भावना; ख्रिस्ती धर्माला आणि ब्रह्मसमाजाला संदेश.

श्रीरामकृष्ण ब्रह्मोभक्तांनां ह्मणतात "बंधन हें मनाला आहे. तसाच मोक्षहि मनाला आहे. मी मुक्त आत्मा आहें; मी संसारांत असो किंवा अरण्यांत असो, मी बद्ध नाहीं; मी राजांचा राजा, परमेश्वराचा पुत्र आहें; मला शृंखलांत कोण बद्ध करणार! सर्पांचा दंश झाला असतां विष नाहींसा करण्याचा एक उपाय असा आहे, कीं, आपल्या इच्छाशक्तीचा उपयोग करून असें ह्मणावें 'विष मला बाधत नाहीं, विष मला बाधत नाहीं!' त्याप्रमाणें 'मी बद्ध नाहीं, मी मुक्त आहें,' असें ह्मणत असावें. आपली इच्छाशक्ति उपयोगांत आणावी ह्मणजे तुह्मी मुक्त होतां. ख्रिस्ती लोकांनीं लिहिलेलें एक पुस्तक कांहीं लोकांनीं माझ्या हातांत दिलें. मीं त्यांनां त्यांतील कांहीं भाग वाचून त्याचा अर्थ सांगण्यास सांगितलें. अध्यायाच्या आरंभापासून तों शेवटपर्यंत एकच विषय–**पाप आणि पापच** त्यांत भरलेला होता, हें तुह्मांला खरें तरी वाटेल काय?"

सद्गुरु केशवाकडे वळून ह्मणतात "ब्रह्मसमाजाचे लोकहि पाप आणि पापी यांविषयींच बोलत असतात. जो मूर्ख नेहमीं 'मी बद्ध आहें' असें एकसारखें ह्मणत असतो, तो शेवटीं स्वतःला बद्ध करून घेतो! जो दुर्भागी 'मी पापी आहें, मी पापी आहें,' असा मंत्र एकसारखा जपत असतो, तो खरोखरच पापी होतो! पाप्यानें ईश्वराचें नाम श्रद्धेनें घेतलें असतां त्याला मोक्ष मिळेल. 'काय? मीं ईश्वराचें नाम गायिलें नाहीं काय? आणि मी अद्यापि पापीच? मी अद्यापि बद्धच?' हे शब्द ईश्वरावर श्रद्धा ठेवणाराचे असणार. कृष्णकिशोर हा धर्मशील हिंदु, ब्राह्मणांत ब्राह्मण होता. त्याची ईश्वरावर अनन्य भक्ति होती. तो वृंदावनाच्या यात्रेस गेला होता. एके दिवशीं देवालयें पहात फिरत असतां त्याला फार तहान लागली. तो एका विहिरीजवळ गेला व तेथें उभा असलेल्या एका मनुष्यास ह्मणाला 'अरे बाबा, मला थोडें पाणी काढून देतोस का? तूं कोणत्या जातीचा आहेस?' त्या मनुष्यानें उत्तर दिलें 'अहो महाराज, मी नीच जातीचा चांभार आहें.' त्यावर कृष्णकिशोर ह्मणाला 'कांहीं हरकत नाहीं! देवाचें नाम घे, शिव शिव, असें ह्मण, आणि माझ्यासाठीं पाणी काढ!'"

सद्गुरु पुढें ह्मणाले "देवाचें नाम गात चला ह्मणजे निःसंशय तुमचा देह, मन आणि आत्मा शुद्ध होईल. पाप आणि यमयातना यांविषयींच साऱ्या

जन्मभर कां बोलत बसतां ? एकदांच असें ह्मणून टाका, कीं–' परमेश्वरा, मीं करूं नये तें केलें आहे आणि जें करावें तें केलें नाहीं. हे परमेश्वरा माफी कर!' आणि त्याच्या पवित्र नामावर श्रद्धा ठेवा ह्मणजे तुमचीं सर्व पापें नाहींशीं होतील"

सद्गुरु पुढें ह्मणाले " फक्त भक्तीसाठींच मीं जगन्मातेची प्रार्थना करीत असें.

**परमेश्वराची प्रार्थना.**

करसंपुटांत फुलें घेऊन मीं प्रार्थना केली, कीं, हे माते! मला तुझी शुद्ध आणि निर्मल भक्ति दे. येथें पाप आहे, येथें पुण्यहि आहे, हीं दोन्हीं घे; मी तीं तुझ्या पायांपाशीं ठेवितों. येथें ज्ञान (पुष्कळ गोष्टींचें) आहे, आणि अज्ञानहि आहे; हीं दोन्ही घे; मला नुसती भक्ति दे. येथें शुचि आहे, आणि अशुचिहि आहे; मला दोन्हीहि नकोत. सत्कर्मे आहेत आणि दुष्कर्मेंहि आहेत; दोन्हीं तुझ्या पायांपाशीं ठेवितों. हे माते! मला तुझ्याविषयीं नुसती भक्ति आणि प्रेम दे."

सद्गुरु ब्राह्मोभक्तांनां उद्देशून ह्मणतात "रामप्रसादाचें पद ऐका:--

आय मन बेडाते जाबि ।
कालीकल्पतरुमूले रे मन चारि फल कुडाये पाबि ॥
प्रवृत्ति निवृत्ति जाया, तार निवृत्तिरे संगे लबि ।
ओरे विवेक नामे तार बेटा, तत्वकथा ताय सुधाबि ॥
शुचि अशुचिरे लये दिव्य घरे करे शुबि ।
जखन दुर सतीने पिरीत हबे, तखन श्यामा माके पाबि ॥
अहंकार अविद्या तोर, पिता माताय ताडिये दिबि ।
जदि मोहगर्ते टेने लय, धैर्यखोंटा धरे रबि ॥
धर्माधर्म दुटो अजा, तुच्छ खोटाय बेंधे थुबि ।
जदि ना माने निषेध, तबे ज्ञानखड्गे बलि दिबि ॥
प्रथम भार्यार संतानेरे दूर हेते बुझाइबि ।
जदि ना माने प्रबोध, ज्ञानसिंधु माझे डुबाइबि ॥
प्रसाद बले एमन हले कालेर काछे जबाब दिबि ।
तबे बापू बाछा बापेर ठाकुर, मनेर मतन मन हबि ॥"

सद्गुरु पुढें ह्मणतात "गृहस्थालाहि देवाचें दर्शन होऊं शकेल. जनक-

राजर्षि—याला देवाचा साक्षात्कार झालेला होता. एका भक्तानें जग किंवा संसार स्वप्नवत् आहे, असें ह्मटलें होतें; पण भक्त रामप्रसाद ह्मणतो, कीं, हें सारें खरें नाहीं. आणि एकादा संसारांत असून संसारी असणार नाहीं."

**गृहस्थाचा प्रश्न.**

सद्गुरु गाऊं लागले:—

**एइ संसारइ मजार कुटि**
**आमि खाइ दाइ आर मजा लुटि**
**जनकराजा महातेजा तार किसे छिल त्रुटि ।**
**से ये एदिक् ओदिक् दुदिक् रेखे खेयेछिल दुधेर वाटि ॥**

सद्गुरु पुढें ह्मणाले "पण जनकराजाच्या योग्यतेला कोणालाहि एकदम उडून जातां यावयाचें नाहीं. जनकराजानें बरींच वर्षें जगाच्या दंग्याधोप्यापासून फार दूर अशा एकांतवासांत भक्तीचें साधन करीत काढलीं होती. ह्मणून प्रत्येकानें कांहीं वेळपर्यंत तरी एकांतवास स्वीकारावा. मनुष्याच्या भरवस्तीपासून दूर अशा एकांतवासांत एकसारखे तीन दिवस रडत बसणें हें फार मोठें काम होईल. खरोखर अशा तऱ्हेनें एक दिवस घालविणेंसुद्धां फार फायद्याचें होईल. आपल्या बायकामुलांकरितां लोक घागरभर अश्रु ढाळतील. पण ईश्वराकरितां कोण रडतो? ईश्वराचें दर्शन व्हावें, त्याचा साक्षात्कार व्हावा, ह्मणून लोक जर वेळोवेळीं एकांतवासाचें सेवन करितील, तर त्यांचें अपरिमित कल्याण होईल. आध्यात्मिक उन्नतीच्या प्रथम अवस्थेंत साधकाच्या मार्गांत हजारों विघ्नें येतात. हीं विघ्नें संसार आणि संसारांतील मोह यांमुळें प्राप्त होतात. रस्त्यावर लाविलेल्या वृक्षाच्या रोपाला कुंपण पाहिजे. नाहीं तर गाई, शेळ्या तो रोपा खाऊन टाकितील. रोपा लहान आणि मृदु असेतोंपर्यंत कुंपणाची आवश्यकता आहे. मुळें खोल गेलीं आणि बुंधा जाड व बळकट झाला, ह्मणजे कुंपण नसलें तरी चालेल. मग हत्ती जरी त्या झाडाच्या बुंधाला बांधला तरी त्या झाडाला कांहीं इजा होणार नाहीं. संसारी मनुष्याचा रोग भयंकर स्वरूपाचा असतो. त्यांचीं इंद्रियें आणि इंद्रियवृत्ति हीं बिघडलेलीं असतात. तो परमेश्वराला—आपल्या पित्याला विसरून जातो आणि कनककांता यांच्यामागें लागतो. हींच (कनक आणि कांता) त्याला गोत्यांत घालतात. त्यामुळें विश्रांति आणि एकांतवास यांची त्याला फार

**ब्रह्मसमाज आणि जनकराजा.**

जरूरी असते. विषमज्वरानें आजारी असलेल्या रोग्याच्या खोलींत पाण्यानें भरलेली घागर आणि लोणचें हे पदार्थ तुह्मी ठेवाल काय? असा रोगी बरा व्हावा असें तुह्मांला वाटत असेल तर घागर व लोणचें तेथून काढणें शक्य नसल्यास त्या रोग्याला तरी दुसरीकडे नेलें पाहिजे! संसारी मनुष्य असा रोगी आहे. संसारांतील गोष्टी ह्मणजे पाण्याची घागर होय. या वस्तूंचा उपभोग घेण्याची इच्छा ही त्या रोग्याची तृषा होय. लोणच्याची कल्पना येतांच तोंडास पाणी सुटतें. लोणचें आमच्यासमोरच पाहिजे असें नाहीं. वाईट दृष्टीनें पाहिलेल्या स्त्रिया हें त्यासारखें होय. याला उत्तम उपाय ह्मणजे एकांतवासच होय."

सद्गुरु पुढें ह्मणतात "प्रथम खरें काय आहे, मिथ्या काय आहे, याचा नीट विचार करा; नंतर संसारांत अनासक्त कसें रहावें, हें जाणा. विवेक आणि वैराग्य हीं दोन्हीं मिळविलीं ह्मणजे आह्मीं संसारांत रहावें. संसारांत मनोविकार, वासना इत्यादि नक्र आणि मगर आहेत. त्या सागरांत स्नान करण्याची इच्छा असेल तर हळदीची पूड अंगाला चांगली चोळून घ्या. असें केलें ह्मणजे तुह्मांला नक्रमगरांपासून कांहीं त्रास होणार नाहीं. हळद ह्मणजे विवेक (आत्मानात्मविवेक) आणि वैराग्य होय. ईश्वर काय तो सत्य आहे; दृश्य जगत् मिथ्या आहे. याबरोबरच एका वस्तूची—ईश्वराविषयीं उत्कट भक्तीची जरूर आहे. वृन्दावनच्या गोपींची भक्ति अशी होती. श्रीकृष्णांविषयीं त्यांचें प्रेम अत्युत्कृट होतें. त्यांच्या देवाविषयींच्या निरतिशय प्रेमाबद्दलचें हें पद पहा:—

देवभक्ति.

वंशी बाजील ए बिपिने।
आमार तो ना गेले नय श्याम पथे दांडाये आछे॥
तोरा जाबि कि ना जाबि बल गो॥
तोदेर श्याम कथार कथा।
आमार श्याम अंतरेर व्यथा (सइ)॥
तोदेर बाजे बाँशी कानेर काछे।
बाँशी आमार बाजे हृदयमाझे॥
श्यामेर बाँशी बाजे बेराओ राई।
तोमा बिना कुंजेर शोभा नाइ॥"

हें पद गात असतां श्रीरामकृष्णांचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. ते केशव आणि इतर भक्त यांनां मोठ्या कळकळीनें ह्मणाले "तुह्मीं ब्राह्मो आहांत; तुह्मी

ईश्वर निराकार आहे असें मानतां; ईश्वरी अवतारावर तुमचा विश्वास नाहीं; राधा किंवा श्रीकृष्ण किंवा दुसरे कोणी ईश्वराचे अवतार आहेत असें पाहिजे तर तुह्मी मानूं नका. पण गोपींची श्रीकृष्णांविषयींची उत्कट प्रीति व अद्वितीय भक्ति तुह्मी आपलीशी करा. देवाविषयीं खरी भक्ति ही साक्षात्काराची, देवदर्शनाची पुढची पायरी होय. ”

## अध्याय चवथा.

## गुरु आणि शिष्य. परमेश्वर हाच गुरु.

आतां ओहोटी सुरू झाली. वाफर झपाट्यानें कलकत्त्याकडे चालले. हावरा पुलाच्या दुसऱ्या बाजूस वनस्पत्युद्याना ( बोटॅनिकल गार्डन ) च्या जवळ वाफर आलें. आणखी थोडें खालीं जावें, असा कप्तानास हुकूम होता. श्रीरामकृष्णांकडे सारखी दृष्टि लावून त्यांचा उपदेश ऐकणारांनां वाफर कोठपर्यंत खालीं गेलें, याचें भानहि नव्हतें. त्यांचें सर्व लक्ष सद्गुरूंचें भाषण ऐकण्याकडे होतें. काल व देश यांची त्यांनां या वेळीं शुद्धिहि नव्हती !

केशवानें सद्गुरूंनां खोबरें मिश्र केलेले पोहे दिले. मंडळींनींहि त्यांचा स्वीकार करावा, अशी विनंति करण्यांत आली. सर्वांनीं पोहे थोडे थोडे खाल्ले, आणि त्यांनां समाधान वाटलें. वाफरावर उत्सवच चालला आहे, असें त्यांनां वाटले.

विजय आणि केशव एकमेकांशीं मोकळेपणानें वागत नाहींत, हें सद्गुरूंच्या लक्षांत आलें, आणि त्या दोघांचें पुन्हां जुळलेलें बरें, असें त्यांनां वाटलें. पृथ्वीवर मानवांमध्यें शांतता आणि प्रेमभाव असावा, हें सद्गुरूंचें मुख्य काम–मिशन नव्हे काय ?

सद्गुरु केशवास ह्मणाले “ महाराज ! हा पहा येथें विजय आहे. तुमच्या तंटेभांडणांनीं त्रास करून घेऊं नका. शिव आणि राम यांच्यामध्येंहि पुष्कळ भांडण झालें होतें. ” सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणाले “ शिव हा रामाचा गुरु होता. प्रथम थोडेसे ते भांडले, पण कांहीं वेळानंतर भांडण संपवून पूर्वीप्रमाणें ते पुन्हां मित्र बनले; पण त्यांच्या अनुयायांमध्यें मात्र भांडण चालूच राहिलें ! भूतांच्या चेष्टा आणि माकडांचें किचकिचणें–दांत करकरां वाजविणें हीं कांहीं लवकर शांत करितां येईनात ! तुह्मीहि परस्परांचे मित्र व्हाल, पण मी खचित सांगतों, कीं, तुमचे अनुयायी पाठीमागून भांडत राहतील. ” पुनः सर्व हसूं लागले.

सद्गुरु पुढें ह्मणतात "विजय तर तुझा आप्त आहे. मतभेद हा असणारच. बापमुलामध्येंसुद्धां ओढाताण होते. राम आणि त्याचे पुत्र लव व कुश यांचेंच उदाहरण पहा! दुसरें एक उदाहरण सांगतों. आईचें आणि मुलीचें हित एकच असतें; पण प्रत्येकजण आपला मंगळवार (मंगळागौरी) निरनिराळा पाळते. जणूं काय, प्रत्येकीचें हित भिन्न भिन्न आहे! त्याप्रमाणें केशव, तुझा एक समाज आहे आणि विजयलाहि आपला एक निराळा समाज पाहिजेच! मतभेद, वादविवाद, तंटेभांडणें इत्यादि सर्व गोष्टींस या परमेश्वरी योजनेंत जागा आहे. श्रीकृष्णांनीं जेव्हां वृंदावनामध्यें अवतार घेतला होता, तेव्हां जटिल आणि कुटिल हे अडथळे नसते तर त्या दैवी प्रियकराच्या लीलेची मौज नाहींशीं झाली असती. **अडथळयानें कोणत्याहि कार्याला उत्साह व जोम येतो.** रामानुज हा विशिष्टाद्वैती होता. त्याचा गुरु केवलाद्वैती होता. त्या दोघांमध्यें थोडासा मतभेद होता. गुरु शिष्य परस्परांवर टीका करीत. अशा गोष्टी नेहमीं घडून यावयाच्याच. असें होणारच! पण गुरूनां शिष्य आपलाच आहे असें वाटतें." सर्व मंडळी आनंदित होते.

श्रीरामकृष्ण केशवाला सांगूं लागले "तुझे शिष्य तुला सोडतात, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. प्रथम आंत घेतेवेळेस त्यांच्या स्वभावाचें तूं नीट निरीक्षण करीत नाहींस. मनुष्य बाह्य आकारानें सर्व सारखे दिसतात, पण त्यांच्या स्वभावाचे गुणधर्म निराळे असतात. कांहीं सत्वगुणी असतात, त्यांचा कल ईश्वराकडे असतो; कांहीं रजोगुणी असतात त्यांचा कल कामें—कर्तव्यकर्में करण्याकडे असतो; आणि कांहीं तमोगुणी असतात त्यांचा कल ईश्वरापासून दूर नेणाऱ्या अज्ञानाकडे असतो. पोळया दिसतांना सारख्या दिसतात, पण त्यांच्या आंतील पदार्थ निराळे असतात. कांहीं पोळयांत घट्ट केलेलें मिष्ट दूध असतें, कांहींमध्यें खोबरेंमिश्रित साखर असते, तर कांहींमध्यें नुसतें पुरण असतें. माझ्या जगन्मातेनें माझी विचारसरणी आणि समजूत कांहीं निराळीच केलेली आहे. मी त्या मातेचें मूल आहें. मी आपला खातों, जेवतों आणि उड्या मारितों. बाकी सर्व कांहीं तिला माहीत आहे."

**श्रीरामकृष्णांचें जगन्मातेशीं नातें.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "खरोखर, मला तीन शब्द जिव्हाळीं झोंबतात. (१) गुरु; (२) कर्ता घरचा मुख्य यजमान; (३) बाबा. मी कर्ता नाहीं, माझी

माता आहे; मी तिच्या हातांतील एक साधन आहें. मी प्रपंच चालवावा व मला मुलें व्हावीं, अशी माझी इच्छा नाहीं. एका मानवी कुटुंबांतच नव्हे, तर सर्व प्राण्यांत व्यक्त असलेल्या देवाची सेवा करण्यांत मी आपला सर्व वेळ घालवीन. आणखी परमेश्वरच आमचा गुरु आहे. सद्गुरूप्रमाणें शिकविण्यास समर्थ तोच आहे. आई दृष्टीस न पडली ह्मणजे मुलांनां जसें चुकल्याचुकल्यासारखें वाटतें, तशी माझी स्थिति होते. मानवी गुरु लाखों मिळतील. प्रत्येकजण गुरु होण्यास उत्सुक आहे! पण शिष्य होण्यास कितीजण तयार आहेत ?"

देव हा एकच गुरु.

सद्गुरु पुढें ह्मणतात "शिष्याला शिकविणाऱ्या गुरूचें काम फार कठीण आहे! गुरूनें जर देव पाहिला असेल आणि त्याच्याकडून लोकांनां शिकविण्याचा त्याला आदेश मिळाला असला, तर गोष्ट निराळी. नारद, शंकराचार्य व शुकदेव असे आदिष्ट गुरु होते. जर तुला असा आदेश मिळाला नसेल, तर तुझें कोण ऐकणार! कलकत्याचे लोक कसे चळवळे आहेत याची तुला माहिती आहेच. भांड्यावरील दूध विस्तवावर ठेवतांच तें फसफस करून उतास येऊं लागतें. विस्तव काढून घेतला कीं ऊत येणें बंद होतें! कलकत्याचे लोक चळवळीचे फार भोक्ते. ते एका ठिकाणीं विहीर खोदण्यास सुरू करतील, पण जरा खडकाळ व घट्ट जमीन लागतांच खोदण्याचें काम बंद करितील, आणि दुसरीकडे खोदूं लागतील. पण समजा, तेथें रेताड जमीन लागली तर ती जागाहि ते सोडून देतील आणि दुसरी जागा शोधतील! ज्या लोकांची रीत अशी आहे, त्यांच्या चांगल्या मताची कांही किंमत नाहीं!"

आदिष्ट–गुरु.

सद्गुरु पुढें ह्मणतात "पुन्हां आणखी असे कांहीं लोक आहेत, कीं, ते आपल्या मनांत कांहींएक विचार करतात आणि तीच ईश्वराची आज्ञा आहे, असें समजतात. ही समजूत अगदीं चुकीची आहे. देवाला पहावें, त्याच्याशीं भाषण करावें, ह्मणजे त्याची आज्ञा काय आहे हें समजेल. असें केलें नाहीं तोंपर्यंत कशी समजणार? देवाचा शब्द! त्यांत किती विलक्षण सामर्थ्य असलें पाहिजे. त्यानें एकादा पर्वतदेखील सहज हलून जाईल. देवाची प्रत्यक्ष आज्ञा नसेल तर नुसत्या व्याख्यानांत कांहीं राम नाहीं. व्याख्यानें कांहीं दिवस लोक लक्षांत ठेवितील; पण नंतर सर्व कांहीं विसरून जातील. व्याख्यानांत सांगितल्याप्रमाणें आचरण करण्याकडे ते कांहींच लक्ष्य देणार नाहींत."

देवाची प्रत्यक्ष आज्ञा काय आहे?

सद्गुरु पुढें ह्मणाले " कमरपुकर गांवांत हल्दारपुकर नांवाचें एक तळें आहे; त्यासभोंवतीं लोक केरकचरा टाकीत असत. स्नानाकरितां किंवा धुण्याकरितां येणारे लोक मोठमोठयानें केरकचरा टाकणाऱ्या लोकांनां शिव्या देत, पण सर्व व्यर्थ! दुसरे दिवशीं सकाळीं पुन्हां पूर्ववत् घाण, केरकचरा आहेच. शेवटीं निराश होऊन त्यांनीं ही गोष्ट म्युनिसिपालिटीच्या अधिकाऱ्यांस कळविली. पट्टा घातलेला एक शिपाई चौकशी करण्यास तेथें लगेच आला व ' **येथें घाण करूं नये** ' ह्मणून त्यानें तेथें एक नोटीस चिकटविली; दुसरे दिवशीं काय चमत्कार सांगावा? सर्व घाण आपोआप बंद झाली ! "

**दैवी आदेशाशिवाय शिष्य करणें व उपदेश देणें यांचा निषेध.**

सद्गुरु पुढें ह्मणतात " दिव्य तत्वांचा उपदेश करण्यास अधिकाराचा पट्टा पाहिजे आहे. नाहीं तर पाहिजे त्यानें उठावें आणि लोकांनां शिकवावें, हा वेडेपणा होय. स्वतः अज्ञानी आहे आणि असा हा दुसऱ्यास शिकविणार! आंधळयानें आंधळयास वाट दाखविण्यासारखाच हा प्रकार आहे! यानें फायद्यापेक्षां तोटाच अधिक होईल. देवाचें दर्शन जर तुला होईल, तर दुसऱ्याचें मनोगत तुला कळेल आणि त्यांनां कोणत्या पीडा झाल्या आहेत हें सांगतां येईल. देवाकडून तुला प्रत्यक्ष आदेश मिळाला पाहिजे. नाहीं तर 'मी उपदेश करणारा गुरु आहें, आणि तुह्मी शिष्य आहांत,' असें तुह्मीं आग्रहानें ह्मटल्यासारखें होईल. अशा तऱ्हेची आत्मप्रौढी हें अज्ञान होय. या जगतामध्यें ईश्वरच काय तो कर्ता आहे, आणि आह्मी सर्व त्याच्या हातांतील साधनें आहोंत असा अनुभव कोणास येईल, तर मात्र त्याला या जगांत खरी स्वतंत्रता प्राप्त होते. 'मी कर्ता आहें, मी ईश्वर आहें,' या कल्पनेपासून सर्व त्रास, तळमळ इत्यादि उत्पन्न होतात."

**कर्माविषयीं पाश्चिमात्यांची कल्पना. कर्म हें आयुष्याचें इतिकर्तव्य आहे किंवा हें एक त्याचें साधन आहे?**

श्रीरामकृष्ण, केशव आणि इतर भक्तांनां ह्मणाले " जगाचें हित करावें असें तुह्मी चुरूचुरू बोलतां. ज्या जगाचें तुह्मी हित करणार तें काय सुपारी एवढें लहान आहे? दुसरें, जगाचें हित करणारे तुह्मी कोण? प्रथम भक्तिमार्गानें जाण्याचा अभ्यास करा, साधन करा आणि देवाचें दर्शन घ्या. असें झालें ह्मणजे मग तुह्मांला स्फूर्ति आणि सिद्धी मिळतील, आणि नंतर जगाचें हित करावें अशा गोष्टी बोला. तोंपर्यंत बोलूं नका."

# चतुर्थ परिच्छेद–अध्याय चवथा.

यावर एका ब्राह्मो भक्तानें विचारिलें "देवाचें दर्शन होईपर्यंत आम्हीं सर्व कर्में सोडून द्यावीं, असें आपलें ह्मणणें आहे काय?"

श्रीरामकृष्ण ह्मणतात "तसें नाहीं महाराज! सर्व कर्म कां टाकावें? ध्यान, स्तोत्रें गाणें, नामघोष आणि इतर भक्तीचीं साधनें यांचा अभ्यास केला पाहिजे."

ब्राह्मो भक्त विचारतो "तर सर्व ऐहिक कर्में टाकून द्यावीं, असें आपलें ह्मणणें आहे काय?"

श्रीरामकृष्ण ह्मणतात "नाहीं, तींसुद्धां कामें तुह्मांला करावीं लागतील. या जगांत जिवंत राहण्यास जितकीं आवश्यक कामें आहेत, तितकीं केलींच पाहिजेत; पण तीं करते वेळीं 'देवाची कृपा व्हावी, आणि फलाची आशा न धरितां किंवा या लोकीं अगर परलोकीं शिक्षेची भीति न बाळगतां कर्तव्यकर्में करण्याचें सामर्थ्य यावें,' ह्मणून नेत्रांत अश्रु आणून परमेश्वराची तुम्हीं प्रार्थना करावी. प्रार्थनेच्या वेळीं तुह्मी असें ह्मणा, कीं, 'हे परमेश्वरा, माझीं या जगांतील ऐहिक कामें दिवसेंदिवस कमी होतील असें कर. कारण, कामें वाढतील तर तुझी विस्मृति होईल, अशी मला शंका वाटते. केव्हां केव्हां मी संसारांत अनासक्त राहून कामें करितों, असें मला वाटतें; पण मी तीं आसक्तीनें करतों आणि स्वतांस कसें फसवून घेतों हें मला समजत नाहीं. मी भिक्षा मागतों, पण पहा! मला कीर्ति पाहिजे असते; परंतु कशी, तें मात्र नीट कळत नाहीं!' हास्पिटलें,

**जीविताचें इतिकर्तव्य.**

दवाखाने, शाळा आणि कॉलेजें इत्यादि स्थापन करावीं, रस्ते बांधावे, विहिरी, तलाव खोदावे, हीं कामें सार्वजनिक हितासाठीं करावीं, असें शंभु मलिक एकदां ह्मणाला. मीं त्याला ह्मटलें 'होय. पण दुसऱ्याचें हित करतांना तुह्मीं अनासक्त असलें पाहिजे आणि तुमच्या मार्गांत आटोक्यांत येतील तितकीं, अगदीं आवश्यक कामें करण्यास घेण्याची खरबरदारी घ्यावी. तीं कामें आपण होऊन शोधूं नयेत, आणि आपल्या ताकदीपेक्षां अधिक कामें करण्यास जाऊं नये. तसें तुह्मी कराल तर देवाचा तुम्हांला विसर पडेल.' जगन्माता कालीच्या मंदिराकडे चला. जातांना वाटेंत आणि देवीचें दर्शन होईपर्यंत वाटेल तर गोरगरिबांनां भिक्षा द्या. पण मंदिराचे दरवाजे संध्याकाळीं बंद होईपर्यंत तुम्ही एकसारखे भिक्षाच देत राहिलां, तर तुह्मांला मातेचें दर्शनहि होणार नाहीं! दरवाज्यांत जमलेल्या गर्दी-तून आपला मार्ग काढून हुषार लोक प्रथम मातेचें दर्शन घेतील, आणि नंतर

भिक्षा व दुसरीं सत्कृत्यें यांकडे लक्ष देतील. प्रथम देवाचें दर्शन घ्या आणि नंतर कर्तव्यकर्मांविषयीं गंभीरपणानें बोला."

सद्गुरु पुढें ह्मणतात "आपलीं कर्तव्यकर्में करीत राहणाऱ्या मनुष्यांचा अंतिम हेतु काय असतो? कर्म किंवा कर्तव्याचरण हें साधन आहे, आणि ईश्वर साध्य आहे. साध्य आणि साधन यांचा विपर्यास करूं नका. मी एकदां शंभूस ह्मटलें, कीं, तूं देवाला पाहतोस, किंवा देवानें तुला दर्शन दिलें, तर मग तूं असें मागशील काय. कीं, मला पुष्कळसे दवाखाने, हास्पिटलें, शाळा आणि कॉलेजें मिळावीं? छे! जोंपर्यंत तुह्मी या जगांत—संसारांत आहांत तोंपर्यंत या गोष्टी पाहिजे आहेत. पण हें जग सनातन जीविताशीं तुलना करून पाहतां क्षणभंगुर आहे. खरा भक्त असें मागून घेईल, कीं 'हे प्रभो, तुझ्या चरणकमलांत मला स्थान मिळो, ह्मणजे मला नेहमीं तुझ्या सान्निध्यांत राहण्याचा हक्क प्राप्त होईल. आणि तुझ्याविषयीं शुद्ध, खोल भक्ति मला प्राप्त होवो!' आसक्तिरहित कर्मयोग फार कठिण आहे. धर्मग्रंथांत सांगितलेलीं सर्व कर्में, सर्व कर्तव्यें या युगामध्यें करणें फार कठिण आहे. कर्म आणि कर्तव्यकर्में! अरेरे! तीं करण्यास वेळच मिळत नाहीं. संसारतापानें त्रस्त झालेल्या रोग्याला जुन्या वैद्याचें औषधपाणी पुष्कळ दिवस देत राहिलें तर तो बहुतेक आटपेल. लोक अल्पायुषी झाले आहेत आणि ताप बहुतेक थोड्या तासांतच निकाल लावितो. हल्लीं रामबाण उपाय ह्मटला ह्मणजे डॉक्टर गुप्तांचें तापावरील औषध ( फिव्हर मिक्श्चर ) होय, त्यानें गुण तात्काळ येतो! होय, या युगांत देवाचा साक्षात्कार मिळविण्यास हाच एक उपाय आहे, कीं, खरी भक्ति करावी, त्यावर खरें प्रेम करावें, त्याची कळकळीनें प्रार्थना करावी, त्याचीं पवित्र नामें व गुण गावे."

**कर्मयोग आणि भक्तियोग.**

सद्गुरु, केशव व इतर ब्राह्मो भक्त यांनां ह्मणतात "तुमचा मार्गहि प्रभूची भक्ति करावी, त्याला शरण जावें, हाच आहे. तुमच्याप्रमाणें प्रभूचें नांव गाणारे धन्य होत. तुमचा मार्ग शुद्ध आणि सयुक्तिक आहे. तुह्मांला अहंकार सोडतां येत नाहीं ह्मणून 'ब्रह्म सत्य आहे, दृश्य जग स्वप्नवत् मिथ्या आहे,' असें अद्वैत्यांप्रमाणें तुमचें मत नाहीं, हें योग्यच आहे. तुह्मी वेदान्ती किंवा ज्ञानी नाहींत, भक्त आहांत. तुम्ही देव सगुण आहे असें मानतां, हें बरोबर आहे. त्याच मार्गानें चला, पण ईश्वराविषयीं खरी कळकळ बाळगा, ह्मणजे तुह्मांला त्या खऱ्या देवाचें दर्शन होईल."

## अध्याय पांचवा.

## एका शिष्याच्या घरीं.

वाफर परत कलकत्त्यास कोळसाघाटास परत आलें. सर्व मंडळी उतरण्याची तयारी करूं लागली. खोलींतून बाहेर येतांच पौर्णिमेच्या चंद्रानें गंगानदीचें पात्र आणि किनारे आपल्या मंद प्रकाशानें शांत करून सोडले.

सद्गुरु, मी आणि दोनतीन शिष्य यांसहित किनाऱ्यावर तयार असलेल्या गाडींत बसलों. केशवाचा पुतण्या नंदलाल हा गाडींत येऊन बसला. सद्गुरू-बरोबर कांहीं लांब जाण्याची त्याची इच्छा होती.

गाडींत सर्वजण बसल्यावर "केशव कुठें आहे ?" म्हणून श्रीरामकृष्णांनीं विचारिले. थोड्या वेळांत केशव येऊन हंसत विचारूं लागला, कीं, "यांचेबरोबर कोण कोण जाणार ?"

समाधानकारक उत्तर मिळाल्यामुळें केशवानें सद्गुरूंस साष्टांग प्रणाम केल्यावर सद्गुरूंनीं त्याला प्रेमानें निरोप दिला.

गाडी निघाली. इंग्रज लोकांच्या वस्तीतून ती जाऊं लागली. सुंदर, रुंद आणि पाणी शिंपडलेले रस्ते व दुतर्फा मोठमोठ्या हवेल्या ! आज पौर्णिमा असल्या-मुळें मंद आणि शांत अशा प्रकाशांत या मोठ्या इमारती जणूं काय विश्रांति घेत आहेत, असें दिसत होतें. त्या हवेल्यांच्या दरवाजापाशीं गॅसचे दिवे असून आंत उत्तम रीतीनें प्रकाशित असे दिवाणखाने होते. हार्मोनियम आणि पियानोवर गात असलेल्या युरोपियन तरुणींचे मंद मधुरध्वनि कानावर येत होते.

गाडी जात असतां सद्गुरु दिव्यानंदानें भरून गेलेले दिसले. ते एकदम म्हणाले "मला तृषा लागली आहे, आतां काय करावें ?"

इंडिया क्लबाच्या समोर नंदलालनें गाडी थांबविली, व पाणी आणण्याकरितां म्हणून तो माडीवर गेला; व एका ग्लासांतून पाणी घेऊन आला. सद्गुरूंनीं हंसत विचारलें "ग्लास चांगला धुतला आहे काय ?"

"होय," असें नंदलालनें हंसत हंसतच उत्तर दिलें. नंतर सद्गुरु पाणी प्याले.

सद्गुरु मुलाप्रमाणें सरल वृत्तीनें दोन्ही बाजूंस वस्तु पाहण्याकरितां डोकावून पाहूं लागले. मनुष्यें, जनावरें, गाड्या, घरें, चांदणें, प्रकाशित रस्ते इत्यादि पाहून सद्गुरूंस अतिशय आनंद झाला.

नंदलाल कोलुतुला येथें उतरला. सुरेश मित्राच्या घरासमोर गाडी थांबली. पण तो घरीं नव्हता. कांकुरगच्ची येथें नवीन विकत घेतलेली बाग पाहण्यास

तो गेला होता. त्याच्या घरांतील मंडळीनें एक ग्लालची खोली उघडून दिली आणि तेथें बसण्यास सांगितलें.

गाडीभाडें द्यावयाचें होतें, तें कोणीं द्यावें ? सुरेश घरीं असता तर कांहीं बोलावयासच नको होतें. सद्गुरूंनीं एका शिष्यास सांगितलें, कीं, "घरांतल्या बायकांनां भाडें देण्यास सांग. सुरेश वगैरे पुरुषमंडळी आमच्याकडे वारंवार येतात, हें त्यांनां चांगलें माहीत असावें, असें मला वाटतें."

**नरेंद्र सद्गुरूंकडे येतो.**

नरेंद्र तेथून जवळच राहत होता, ह्मणून सद्गुरूंनीं त्याला बोलावण्यास पाठविलें. इतक्यांत घरच्या मंडळींनीं दिवाणखान्यांत सद्गुरूंस नेलें. दिवाणखान्यांत जमिनीवर गालीचा आंथरला असून त्यावर पांढरा कपडा होता. तीनचार तक्के ठेविले होते. भिंतीवर 'सर्वधर्मांची एकवाक्यता' असें एक चित्र होतें. या चित्रांत, सर्व धर्म, मग तो हिंदु, मुसलमानी, बौद्ध, ख्रिस्ती किंवा त्यांचे इतर पोटधर्म असोत, एकाच ध्येयाकडे-परमेश्वराकडे नेतात, हें श्रीरामकृष्ण केशवास दाखवीत आहेत, असें दर्शविलें होतें.

सद्गुरु हंसत बोलत होते, इतक्यांत नरेंद्र आला. सद्गुरूंचा आनंद दुणावला. ते हंसत नरेंद्रास ह्मणाले "केशव सेनबरोबर आह्मी वाफरांतून फारच सुखकर प्रवास केला. विजयहि आला होता आणि आतां येथें हजर असलेली मंडळीहि आमच्याबरोबर होती."

मजकडे बोट दाखवून सद्गुरु ह्मणाले "मंगळागौरीचा उपवास आईलेकी प्रत्येक आपापल्या कल्याणासाठीं कसा पाळतात, जटिल व कुटिल यांच्यासारखीं विघ्नें किंवा अडथळे नसतील तर या जगांतील ईश्वरीलीलेंतील सौरस्य कसें कमी होईल हें मीं केशव आणि विजय यांनां कसें सांगितलें, हें तूं महेंद्राला विचार."

असें ह्मणून सद्गुरु मला विचारतात "होय ना महेंद्र ?"

मीं उत्तर दिलें "अगदीं खरें महाराज !"

बराच उशीर झाला तरी सुरेश अद्याप परत आला नव्हता. सद्गुरु दक्षिणेश्वरांतील देवालयाच्या उद्यानाकडे परत जावयास निघाले. साडेदहा वाजले, आणि सद्गुरूंला आतां तिकडे जावयास पाहिजे होतें.

रस्त्यांवर स्वच्छ चांदणें पडलेलें होतें. गाडी दरवाजापाशीं तयार होती. सद्गुरु गाडींत बसले आणि नरेंद्र आणि मी सद्गुरूंस नमस्कार करून आपापल्या घरीं गेलों.

---

# पंचम परिच्छेद.

## केशव चंद्र सेन यांजबरोबर कमलकुटीरांत.

### १८८३.

### अध्याय पहिला.

### जगन्माता आणि तिचीं रूपें.

तारीख २८ नोव्हेंबर, १८८३ या दिवशीं, दुपारीं दोन वाजल्यानंतर, लिली कॉटेज ( कमलकुटीर ) समोरील सर्क्युलर रोडच्या पायवाटेवर एक तरुण फिरत होता. ही पायवाट कुटीराजवळून दक्षिणोत्तर गेलेली आहे.

केशवाच्या समाजाचे ब्रह्मोभक्त मंगळवाडींत रहात असत. मंगळवाडीच्या दक्षिणेस कमलकुटीर आहे, व येथें केशव आपल्या कुटुंबासहित रहात असे. केशव या वेळीं फारच आजारी होता, आणि तो बरा होण्याची आतां फारच थोडी आशा आहे, असें त्याच्या मित्रांनां वाटत होतें.

श्रीरामकृष्णांचें केशवावर प्रेम असल्यामुळें त्याला पहाण्याकरितां ते आज येणार होते. कलकत्त्यास येण्यासाठीं दक्षिणेश्वराहून ते या वेळीं निघाले असतील, ह्मणून हा तरुण पायवाटेवर फिरत असून तो आपल्या सद्गुरूंची वाट पहात होता. सद्गुरु आले कीं काय, ह्मणून एकामागून एक येणाऱ्या गाड्यांकडे तो पहात होता.

याप्रमाणें तो बराच वेळ तेथें वाट पहात होता. रस्त्यानें जाणाऱ्यायेणाऱ्या लोकांकडेहि तो पहात होता. आपल्यासमोर असलेल्या इमारतीकडे—व्हिक्टोरिया कॉलेजकडे तो पहात होता. येथें ब्रह्मो मुली आणि बायका शिकत असतात. कॉलेजच्या उत्तरेकडील एका उद्यानगृहांत एक इंग्रज गृहस्थ रहात असे. हें घरहि या आमच्या तरुणास स्पष्ट दिसत होतें.

या घरांत आज कांहीं तरी विलक्षण घडलेलें दिसलें. घरांतील मंडळी खिन्न असून इकडे तिकडे धांवपळ करीत होती. इतक्यांत एक प्रेतें वाहण्याची गाडी घेऊन गाडीवान नोकर काळा पोषाख घालून आले. अर्थात्‌च यमराजाची ही सामुग्री होती. त्या घरांत यमराजानें कोणावर तरी धाड घातली होती. एक प्राणी

निघून गेला; आपला जड देह सोडून एक जीवात्मा निघून गेला. अनंतांतून तो या जगांत आला होता, आतां तो हें जग सोडून गेला !

"कोठें ?" तो शिष्य फिरत असतांना आपल्याशींच ह्मणतो " हें जग सोडलें ह्मणजे जीवात्मा कोठें जात असेल? निःसंशय अनंतांतून तो येऊन अनंताकडेच जातो ! "

इतक्यांत कांहीं गाड्यांचा आवाज झाला. त्यासरशी त्यानें डोळे वर करून पाहिलें, पण सद्गुरु दिसले नाहींत.

पांच वाजले. सद्गुरु आले. लाटू, महेंद्र, राखाल आणि दोनतीन शिष्य त्यांचेबरोबर होते.

केशवाच्या लोकांनीं येऊन सद्गुरूंला माडीवर नेलें, आणि दिवाणखान्याच्या दक्षिणेकडे असलेल्या गॅलेरींत बसविलें.

**समाधि.**

बराच वेळ सद्गुरूंनीं वाट पाहिली. आंतल्या खोलींत आजारी असलेल्या केशवाला ते पाहणार होते. सद्गुरु थोडेसे उत्कंठित झाले. " त्यांनां बऱ्याच वेदना होतात; आतां कोठें ते थोडीशी विश्रांति घेत पडले आहेत; लवकरच येऊन ते आपली भेट घेतील," असें मंडळीनें सद्गुरूंस सांगितलें.

केशव बराच आजारी असल्यामुळें त्याचे शिष्य त्याची फार काळजी घेत होते. पण इकडे श्रीरामकृष्ण अधिकाधिक उत्कंठित होऊं लागले. त्याला आपल्याला भेटवा, ह्मणून प्रसन्न, अमृत इत्यादि केशवाच्या शिष्यांची ते विनवणी करूं लागले.

श्रीरामकृष्ण केशवाच्या शिष्यांनां ह्मणाले " बरें, त्यानें येथें येण्याचें कारण नाहीं. मलाच आंत जाऊन त्याला पाहूं द्या !"

यावर प्रसन्न ह्मणाला " महाराज, एक क्षणभर थांबा, ते आतां इतक्यांत येथेंच येतील. "

श्रीरामकृष्ण ह्मणाले "अरे बाबा, तूंच मला त्याला भेटूं देत नाहींस–त्याला केव्हां पाहीन असें मला झालें आहे !"

**मातेशीं संभाषण.**

सद्गुरूंचें लक्ष्य दुसरीकडे जावें ह्मणून प्रसन्ननें केशवाविषयीं बोलण्याला सुरुवात करून तो ह्मणाला " महाराज, केशवांत आतां बराच फेरपालट झाला आहे. आपल्यासारखे ते जगन्मातेशीं बोलतात, असें दिसतें; आणि आपल्यासारखे तिचे शब्द त्यांनां ऐकूं येतात, आणि ते केव्हां केव्हां अश्रु ढाळीत असतात. "

# पंचम परिच्छेद–अध्याय पहिला.

केशव जगन्मातेशीं बोलतो, हंसतो, आणि मुलाप्रमाणें रडतो काय? हें अतिशय आनंदाचें वर्तमान ऐकून सद्गुरूंस राहवेना. त्यांचें सर्व देहभान गेलें, आणि त्यांनां एकदम समाधि लागली.

भक्तीनें धुंद झालेले श्रीरामकृष्ण पुतळ्याप्रमाणें निश्चेष्ट बसलेले दिसले. थंडी बरीच असल्यामुळें त्यांच्या अंगांत हिरव्या काश्मीरीचा कोट होता. हात जोडून ते ताठ बसले होते. दृष्टि स्थिर होती. समाधींत ते पूर्ण मग्न झाले. त्या स्थितींत ते बराच वेळ राहिले. ही तुर्यावस्था लवकर संपेल, अशीं कांहीं चिन्हें दिसेनात.

संध्याकाळ झाली. दिवाणखान्यांत दिवे लाविले. आतां सद्गुरु देहभानावर येऊं लागले. त्यांनां तेथें न्यावें, ह्मणून मंडळी आतां खटपट करूं लागली.

मऊ खुर्च्या, कोचें आणि सर्व बाजूंस आरसे, अशा रीतीनें सुशोभित केलेल्या आणि दिवे पेटविलेल्या दिवाणखान्यांत एका कोचावर सद्गुरूंनां नेऊन बसविलें. समाधि पूर्ण उतरलेली नव्हती. धुंद झालेल्या मनुष्याप्रमाणें ते हंसत होते. कोचें, खुर्च्या आणि आरसे इत्यादिकांकडे ते पाहूं लागले व आपल्याशीं आणि आपल्या जगन्मातेशीं बोलूं लागले. श्रीरामकृष्ण कोचें पाहून ह्मणाले "पूर्वी यांचा उपयोग होता; पण आतां त्यांचा कांहीं फारसा उपयोग नाहीं."

**साक्षात्कार आणि आत्म्याचें अमरत्व.**

केशवाची घटी भरली, आणि आतां तो हें जग सोडून जगन्मातेकडे जाणार, असें सद्गुरूंनीं अंतर्दृष्टीनें जाणिलें काय?

राखाल नांवाच्या तरुण शिष्याकडे पाहून सद्गुरु प्रेमानें विचारतात "तूं आला आहेस काय, राखाल?"

नंतर जगन्मातेशीं ते बोलूं लागले "माते, तूं येथें आहेस! तुझा पोषाख किती सुंदर आहे. हे माते, तूं तसदी घेऊं नको आणि तूं स्वस्थ आपल्या जागीं बैस!"

इतक्यांत खोलींत ब्राह्मोभक्त येऊन भरले. सद्गुरूंचे लाटू, राखाल आणि मी इत्यादि शिष्य त्यांचेपाशीं बसलों. सद्गुरु आत्म्याच्या अमरत्वाविषयीं बोलत होते. केशवाचा आत्मा हें जग सोडून जाणार असें त्यांनां स्पष्ट दिसत होतें काय? ते ह्मणाले "देह आणि आत्मा! देहाला आदि आहे आणि अंतहि असलाच पाहिजे. देह मरण पावणारच; आत्मा मरत नाहीं! आत्मा देहापासून भिन्न आहे. देवाचें दर्शन झालें नाहीं तोंपर्यंत आत्मा म्हणजे देहच आहे, असें वाटल्यावांचून राहवत नाहीं. देहात्मबुद्धि अज्ञान्याला—देवाचें दर्शन न घेत-

लेल्याला चिकटते. ज्ञान्याला आत्मा देह नव्हे हें स्पष्ट दिसतें. सुपारी कच्ची असली म्हणजे वरील कवच सुपारीस इतकें घट्ट बसलेलें असतें, कीं, सुपारी आणि कवच निरनिराळें करणें फार कठीण जातें. पक्क सुपारीची स्थिति अशी नसते. कवच सुपारीस घट्ट लागलेलें नसतें. हालविलें असतां सुपारी आंत निराळी वाजत असलेली ऐकूं येते."

आतां खोलींत कोण येत होतें? एक अस्थिचर्मांची आकृति—प्रत्यक्ष एक भूतच—सद्गुरूंच्या समोर येत होतें! ती आकृति भिंतीस धरून चालत होती. ती कोचाजवळ आली आणि तिनें श्रीरामकृष्णांच्या चरणांवर लोटांगण घातलें. सद्गुरु जमिनीवर पसरलेल्या सतरंजीवर बसले होते आणि अद्याप थोडेसे तुर्यावस्थेंत होते. त्यांच्या समोरील आकृति केशव होता, असें म्हणण्यापेक्षां केशवाचें अवशेष—ज्या केशवानें आपल्या व्याख्यानांनीं शेंकडों व्यासपीठें दणाणून सोडलीं होतीं, ज्याचेवर लोकांचें सर्वांपेक्षां अधिक लक्ष्य असे, तरुण बंगालचा जो देवच, इतक्या जोरदार, कळकळीच्या, मधुर आणि मोहक व कधींहि न विसरल्या जाणाऱ्या शब्दांनीं ब्रम्हसमाजांत उपासना चालवीत असतांना आणि जगन्मातेची प्रार्थना करतेवेळीं आपलें सर्व हृद्गत लहान मुलाप्रमाणें बाहेर काढीत असतांना, ज्याचें नुसतें अस्तित्व वारंवार स्फूर्तिदायक होत असे—अशा त्या केशवाचें अवशेष होतें!

**परमेश्वर, आदिशक्ति; मनुष्यरूपी ईश्वर.**

अद्यापि सद्गुरु तुर्यावस्थेंतच होते. केशवाची जणूं त्यांनां कांहीं माहितीच नाहीं, असे ते त्याच्याकडे पाहात होते. केशव जवळ बसून मोठ्यानें म्हणाला "महाराज, हा मी आहें!" आणि त्यानें सद्गुरूंच्या हाताला हळूच स्पर्श केला.

पण अद्याप देहभान नाहीं! अमर नित्य अशा आनंदांत पूर्ण मग्न! कांहीं वेळ गेल्यावर वेड्याप्रमाणें सद्गुरु आपल्याशीं बोलूं लागले. दिव्य भक्तीचें हें वेडेपण आहे काय?

**सर्वशक्तिमती शक्तिदेवी.**

सद्गुरु म्हणाले "माझ्या खऱ्या आत्म्याचें ज्ञान जोंपर्यंत मला झालें नाहीं, उपाधीमुळें जोंपर्यंत मला सद्वस्तु दिसत नाहीं, तोंपर्यंत केशव, अमृत, प्रसन्न इत्यादि अनेक पुरुष आणि वस्तु मला दिसतात. पूर्णज्ञान म्हणजे ऐक्याचें—अनेक उपाधींत असलेल्या एका सद्वस्तूचें—दृश्य जगापलीकडील एका परमेश्वराचें ज्ञान होय. हा परमात्मा—ही सद्वस्तु, प्राणी, जग, थोडक्यांत सांगा-

वयाचें ह्मटलें ह्मणजे सांख्यांचे चे.त्रीस पदार्थ, इत्यादि रूपांनीं व्यक्त झाला आहे, असें ज्ञानी जाणतो. ही दैवी शक्ति सर्व ठिकाणीं कमीअधिक प्रमाणानें व्यक्त झाली आहे. एकच आत्मा अनेक रूपांनीं नटला आहे. पण कांहीं रूपांमध्यें व्यक्त झालेली शक्ति अधिक आहे; कांहींत कमी आहे. विद्यासागरानें विचारलें होतें, कीं, 'देवानें दिलेल्या शक्ति कित्येकांमध्यें कमी आणि कांहींजणांमध्यें अधिक असतात काय? देव पक्षपाती आहे काय?' मीं उत्तर दिलें, कीं, 'असें जर नाहीं, तर एक मनुष्य दहाजणांला, केव्हांकेव्हां पन्नासजणांनां भारी होतो हें कसें? असें जर नाहीं, तर आह्मीं इतक्या लांब तुह्माला भेटण्यासाठीं दक्षिणेश्वराहून आलों हें कसें?' विषमता ईश्वराच्या सृष्टींत आहे, आणि त्यांत बराच खोल अर्थ आहे. देव पक्षपाती आहे असें विषमतेमुळें सिद्ध होत नाहीं."

**व्यक्तस्वरूपांत भिन्न.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "ज्याच्यामध्यें परमेश्वराचें ऐश्वर्य व्यक्त झालेलें आहे, त्याच्या शक्ति इतर सर्वांहून फार मोठ्या असतात. श्रीमंत मनुष्याचीं पुष्कळ घरें असतात; पण तो एका आपल्या आवडत्या दिवाणखान्यांतच भेटत असतो. ईश्वराचा भक्त असा जीव हा परमेश्वराचा दिवाणखाना होय. अशा जीवालाच पुष्कळ सिद्धी परमेश्वरापासून प्राप्त होतात. अशा मनुष्याचीं चिन्हें काय, असें तुह्मी विचाराल. ईश्वराचें नाम घेऊन तो असलीं मोठमोठालीं कामें करितो. ही सिद्धीचीं—त्या मोठ्या शक्तीचीं फळें होत."

**विशिष्ट व्यक्तस्वरूप, दैवी अवतार.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "आदिशक्ति आणि ब्रह्म हीं एकच. एकाची दुसऱ्यावांचून कल्पनाच करितां येत नाहीं. रत्नाची कल्पना आल्यावांचून त्याच्या तेजाची कल्पना कशी होणार? सर्प आणि त्याची नागमोडीची चाल हेंहि उदाहरण पहा. एकाची कल्पना दुसऱ्याची कल्पना आल्याशिवाय मनांत येत नाहीं. निर्गुण आणि सगुण ब्रह्म यांचें ऐक्य शब्दांनीं नीट सागतां येत नाहीं. दृष्टान्तांनीं थोडासा उजेड पडतो, एवढेंच."

**ब्रह्म आणि जगन्माता एकच.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "सगुण परमात्मा—माझी जगन्माता हीच सांख्याचे चोवीस पदार्थ नटली आहे. हा अनुलोम आणि विलोम यांचा प्रकार आहे. हिच्यामध्यें प्रथम जीव आणि जगत् हीं गुप्तरूपानें होतीं, आणि तीं क्रमाक्रमानें

तिच्यापासून व्यक्त झाली. राखाल, नरेंद्र आणि इतर तरुण यांनां भेटण्यास मी इतका उत्सुक कां असतों? त्यांनीं संसारास, जगास—कनक आणि कांता यांस अद्याप स्पर्श केला नाहीं. खरोखर, आदिमाता मानवांत–जगांत आणि विशेषतः अशा तरुणांत व्यक्त होते."

सद्गुरु पुढें ह्मणतात "हझरा वरचेवर मला असें ह्मणतो, कीं, या तरुण मंडळी-विषयीं तूं नेहमीं इतका विचार कां करतोस? ईश्वराकडे तुझें मन कसें लागणार कोण जाणे!" केशव आणि इतर हंसतात.

**मातेचीं विशिष्ट रूपें; संसारास स्पर्श न केलेले नरेंद्रासारखे पवित्र जीवात्मे.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "हझराच्या शब्दांनीं मला या गोष्टीविषयीं चांगला विचार करावा लागला. मीं जगन्मातेची प्रार्थना करून ह्मटलें, कीं, 'अंबे, हझरा ह्मणतो तें सर्व खरें आहे काय? मी खरोखर तुला विसरत चाललों आहें काय?' तसेंच, मी याविषयीं भोलानाथालाहि विचारिलें. महाभारतांत या गोष्टीचा खुलासा केलेला आहे, अशी त्यानें माझी खात्री करून दिली. महाभारतांत असें सांगितलें आहे, कीं, समाधीमध्यें ईश्वराचा साक्षात्कार घेतलेल्या मनुष्याला या दृश्य क्षणभंगुर जगांत मनाचें विश्रांतिस्थान नसतें. ईश्वरावर प्रेम करणाऱ्या आणि कनककांता यांची आसक्ति नसलेल्या शुद्ध जीवात्म्यांच्या समागमांत काळ घालविल्यावांचून त्याला राहवत नाहीं. महाभारतांतील या विधानानें माझ्या मनाचें समाधान झालें. कोर्टांत पक्षकारांनां जसा कायद्याचा आधार मिळावा तसा मला हा आधार सांपडला." सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणतात "हझराला दोष कां द्यावा? देवाचें दर्शन होईपर्यंत 'नेति नेति'—ह्मणजे देव, मनुष्य किंवा निसर्ग यांहून निराळा आहे असा-विचार केला पाहिजे; पण ज्याला देवाचें दर्शन घडलें त्याची गोष्टच निराळी! त्याला अनुलोम आणि विलोम याची–ह्मणजे दृश्य जग आणि जीवात्मा हें ब्रह्मांत होतें आणि स्वतःपासून उत्पन्न झालेल्या या रूपांनीं ब्रह्म व्यक्त झालें आहे या गोष्टीची–साक्ष पटते. तुह्मांला लोणी पाहिजे तर ताक टाकून द्यावें लागतें; पण शेवटीं ताकामुळेंच लोण्याला अस्तित्व आलें, व लोण्यामुळेंच ताकहि निराळें झालें, असा अनुभव आल्यावांचून रहात नाहीं. असा परस्परांचा अन्योन्यसंबंध आहे. होय, मनुष्य आणि निसर्ग त्याचीं व्यक्तस्वरूपें आहेत व तो कमीअधिक प्रमाणांत प्राण्यांमध्यें व्यक्त होतो."

# पंचम परिच्छेद–अध्याय पहिला.

सद्गुरु पुढें ह्मणतात " साक्षात्कारानंतर ईश्वराची भक्ति जसजशी अंतःकरणांत ठसावी, तसतसें सर्व वस्तूंमध्यें त्याचें अस्तित्व जाणणें सोपें होऊं लागतें. पूर होऊन सर्व जलमय होईपर्यंत, तुह्मांला नदीच्या आडव्यातिडव्या मार्गानेंच समुद्रास गेलें पाहिजे. पण पुरानतर जमिनीवर भरपूर पाणी येतें आणि तुम्हांला कोणत्याहि एका टोंकापासून कावळ्याप्रमाणें थेट सरळ समुद्राकडे जातां येतें. पिकाची कापणी झाल्यानंतर, बांधावरून चालण्याची आवश्यकता नाहीं, शेतांतून सरळ पाहिजे तिकडे जातां येतें. "

सद्गुरु पुढें ह्मणतात " एकदां ईश्वराचा ज्याला साक्षात्कार झाला आहे, त्याला सर्व वस्तूंत परमेश्वर व्यक्त झाला आहे, असें दिसतें. त्यांतल्या त्यांत मनुष्यांत–विशेषतः ज्यांनीं संसारांतील क्षुल्लक गोष्टींवरून–कनककांता यांवरून आपलें मन काढून तें ईश्वरावर लाविलें आहे–अशा शुद्ध जीवांत तो व्यक्त होतो." सर्व अगदीं शांतपणें ऐकतात.

**साक्षात्कार झालेल्या मनुष्यांची दृष्टि ( ज्ञान ).**

सद्गुरु पुढें ह्मणतात " समाधीमध्यें देवदर्शन झालेल्या मनुष्याला नंतर संसारांतील क्षुद्र गोष्टींकडे लक्ष्य लावणें फार कठिण आहे. ह्मणून तो अशा शुद्ध जीवांची संगत शोधतो. कारण, त्यांनां संसाराचा आणि त्यांतील पैसा, मान, पदव्या, सत्ता आणि वैषयिक सुखें इत्यादि गोष्टींचा संपर्क नसतो. जगन्माता आणि परमात्मा हीं दोन्ही एकच आहेत. तो निष्क्रिय आहे अशा दृष्टीनें विचार केला ह्मणजे त्याला ब्रह्म किंवा पुरुष ह्मणतात; पण तोच जेव्हां सृष्टि, स्थिति आणि संहार करितो अशा दृष्टीनें त्याचा विचार करितात, तेव्हां त्याला शक्ति किंवा प्रकृति असें ह्मणतात. निर्गुण, सापेक्ष शब्दांत सांगावयाचें ह्मणजे त्याला आदिपुरुष किंवा आदिमाता ह्मणतात. बाप घरची सर्व व्यवस्था मातेकडे सोंपवितो. मातेला सर्व अधिकार आणि शक्ति पित्यापासून मिळते."

**ब्रह्मसमाज आणि ईश्वराचें मातृत्व.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "विश्वाचा देव–जगन्माता याविषयीं कल्पना आल्याशिवाय विश्वापलीकडील निर्गुण ब्रह्माची कल्पना तुम्हांला करितां येणार नाहीं. एकाविषयीं मनांत विचार करूं लागलें, कीं, दुसऱ्याविषयीं विचार येतोच. विश्वांतील पुरुषतत्वाविषयीं विचार मातृ ( स्त्री ) तत्वाविषयीं विचार सुचवितो, आणि मातृतत्वाविषयीं विचार पुरुषतत्वविचार सुचवितो. जो 'पिता' ओळखूं शकतो त्याला 'माता' ओळखतां येते. " केशव हंसतो.

सद्गुरु पुढें ह्मणतात "ज्याला अंधकाराची कल्पना आहे त्याला प्रकाशाचीहि कल्पना असते. ज्याला रात्र समजते त्याला दिवस समजतो. ज्याला सुख होतें त्याला दुःखहि होतें, समजलें काय ?"

केशव ह्मणाला "होय, महाराज."

श्रीरामकृष्ण पुढें ह्मणाले "माता ह्मणजे कोण, असें मी ह्मणतों ? जगन्माता. जी सृष्टि उत्पन्न करिते आणि तिचें पालन करिते, जी आपल्या मुलांचें वाईटापासून संरक्षण करिते आणि या जगांत कसें रहावें आणि मोक्ष व ज्ञान कसें प्राप्त करून घ्यावें हें जी त्यांनां शिकविते, ती. मुलाला कांहीं कळत नाहीं. त्याची माता सर्व कांहीं जाणते. मातेच्या हातून मूल आपलें अन्न खातें आणि उड्या मारीत खेळतें. आपल्या सर्व चिंता तें आपल्या मातेकडे सोंपवितें."

केशव ह्मणाला "हें अगदीं खरें, महाराज."

---

## अध्याय दुसरा.

## केशव चंद्र सेनाबरोबर शेवटचे शब्द.

आतां श्रीरामकृष्ण देहभानावर आले. केशवाबरोबर हंसत बोलत असतांना दिवाणखान्यांतील जमलेली मंडळी उत्सुकतेनें त्यांच्याकडे पाहूं लागली. "कसें काय आहे, आपली प्रकृति ठीक आहे ना ? आपणास कसें वाटतें ?" इत्यादि प्रश्न केशव किंवा सद्गुरु परस्परांनां विचारीत नाहींत, हें जरा विलक्षण दिसतें ! ईश्वराशिवाय दुसरे कोणतेच शब्द ते दोघे बोलत नव्हते.

श्रीरामकृष्ण केशवास ह्मणाले "ब्रह्मसमाजाचे सभासद ईश्वराच्या अद्भुत कृत्यांचें वैभवच इतकें कां गात असतात ? 'हे ईश्वरा, तूं सूर्य उत्पन्न केलास, चंद्र आणि तारे निर्माण केलेस !' अशा गोष्टीच वरचेवर तुह्मी कां ह्मणतां ? उद्यानांतील शोभेनें–सुंदर फुलांनीं आणि मधुर वासांनीं–पुष्कळजण मोहून जातात; पण उद्यानाच्या यजमानाला फारच थोडे शोधितात ! दोन्हींपैकीं कोण श्रेष्ठ ? उद्यान किंवा त्याचा यजमान ? खरोखर, जोंपर्यंत मृत्यु आमच्यामध्यें मिरवितो आहे, तोंपर्यंत उद्यान क्षणभंगुर आणि मिथ्या आहे; पण उद्यानाचा यजमान काय तो एकच सत्य आहे !"

सद्गुरु पुढें ह्मणाले "गुत्यांत कांहीं प्याले झोंकल्यावर पिपांत विक्रीस ठेविलेल्या दारूचें वजन किती टन भरेल याची चौकशी कोण करितो ? एका इसमास एक

वाटली पुरे. नरेंद्रास पहातांच मी आनंदानें धुंद होऊन जातों. त्याचा बाप कोण, आई कोण, त्याची घरें, मिळकत किती आहे, हें मीं त्याला केव्हांहि विचारिलें नाहीं. मनुष्याला आपल्या मिळकतीचें महत्त्व वाटतें. पैसा, घरेंदारें, सामान यांची त्याला किंमत आहे ह्मणून त्याला असें वाटतें, कीं, ईश्वर आपली मिळकत—सूर्य, चंद्र, तारे इत्यादि त्याच दृष्टीनें पहात असेल. ईश्वराच्या मिळकतीचें—वैभवाचें वर्णन केल्यास त्याला आनंद होईल, असें मनुष्यांनां वाटतें !"

सद्गुरु पुढें ह्मणाले " शंभु मलिक एकदां ह्मणाला, कीं, ' महाराज, माझ्यावर एकदां अनुग्रह करा, ह्मणजे मी आपली सर्व दौलत ईश्वराच्या चरणीं समर्पण करून मरेन. ' मीं उत्तर दिलें, कीं, ' तूं हें काय बोलतोस ? तुला ती दौलत ! माझ्या जगन्मातेला तिची किंमत तुझ्या पायाखालच्या मातीहून अधिक नाहीं !' एकदां विष्णूच्या मंदिरांत चोरी झाली. देवावर असलेलें सर्व जवाहीर चोरांनीं चोरून नेलें. मथूर ( देवालयाचा व्यवस्थापक आणि राणी राशमणीचा जांवई ) आणि मी काय प्रकार झाला आहे तें पहाण्यासाठीं तेथें गेलों. मथूर मोठ्यानें ओरडून ह्मणाला ' देवा, तूं कुचकामाचा ! तुझें जवाहीर चोर लुटून नेतात, पण तुला कांहींच करितां आलें नाहीं !' यावर मीं त्याला निषेधून जोरानें ह्मटलें 'तूं अशा रीतीनें बोलतोस हा तुझा किती तरी मूर्खपणा ! या मूर्तीत तूं ज्या विश्वचालकाला भजतोस त्याला तुझें सर्व जवाहीर आणि माती हीं दोन्ही सारखींच ! लक्ष्मीचें सर्व वैभव त्याच्यापासून तिला मिळतें, हें ध्यानांत ठेव !' कोणीं आपली संपत्ति ईश्वराला अर्पण केली तर त्याची त्याला पर्वा आहे काय ? जो भक्ति आणि प्रेम देईल त्याच्यावरच त्याची कृपा होते ! भक्ति, विवेक आणि वैराग्य हीच संपत्ति त्याला आवडते."

**भक्ताचे निरनिराळे वर्ग.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "आपापल्या स्वभावाप्रमाणें ईश्वराविषयीं कल्पना बदलते. तमोगुणी मनुष्याला मांस आवडतें, आणि तो आपल्या देवाला जनावरांचा बलि देतो; रजोगुणी मनुष्याचें मन पुष्कळ गोष्टींकडे धांवतें आणि तो आपल्या आवडीप्रमाणें पुष्कळ वस्तु देवाला देतो; सत्वगुणी मनुष्याला आपल्या भक्तीचा डांगोरा जगांत पिटविणें आवडत नाहीं. तो फुलें, बेलपत्रें आणि गंगाजल ईश्वरास अर्पण करितो. तो बत.से, पायस यासारख्या अगदीं साध्या वस्तु अर्पण करितो. भक्तांचा आणखी एक वर्ग--गुणातीत भक्त–आहे.

ते मुलाप्रमाणें असतात. आपला देह आणि मन यांचे घटकावयव—तिन्ही गुण —यांशींसुद्धां त्यांचा आत्मा आसक्त नसतो. देवाच्या नामावर दृढविश्वास आणि अनन्यभक्तीनें त्या नामाचा उच्चार, हीच काय ती त्यांची पूजा होय. परमेश्वराचें नामच–दुसरें कांहीं नाहीं–त्यांनां सत्य आणि तारक वाटतें."

**परमेश्वराचें हास्पितल आणि आत्म्याची जोपासना.**

श्रीरामकृष्ण हंसत हंसत केशवास ह्मणतात " तूं आजारी आहेस, यांतसुद्धां बराच खोल अर्थ आहे. परमेश्वरास आळविणारे बरेच भक्तीचे विचार तुझ्या शरीरांतून गेले आहेत. हा तुझा रोगच त्या विचारांची साक्ष देत आहे. हे विचार शरीराचा कसा फन्ना उडवितात, हें ते उद्भवलेल्या वेळीं समजत नाहीं. गंगेंतून एकादें मोठें जहाज जात असतें, तेव्हां तिकडे कोणी लक्ष देत नाहीं; पण कांहीं वेळानंतर मोठमोठया लाटा किनाऱ्यावर येऊन आदळतात आणि त्याचा कांहीं भाग उध्वस्त करून टाकितात. हत्ती एकाद्या झोंपडींत शिरला म्हणजे पायासकट ती झोंपडी तो हालवून सोडतो, आणि उपटून टाकतो. ईश्वराची भक्ति अशीच हत्तीप्रमाणें मोठी आहे. ती देह नांवाची मातीची कच्ची झोंपडी वहुतकरून पाडवून सोडते. घराला आग लागली म्हणजे प्रथम आंतील कांहीं वस्तु जळतात आणि नंतर सबंध घरच विस्तवानें पेटूं लागतें. ईश्वराचें दर्शन–साक्षात्कार–होतो तेव्हां पुष्कळसा असाच प्रकार होतो. ईश्वरी साक्षात्काररूप अग्नि प्रथम कामवासना, क्रोध इत्यादि विकारांनां जाळतो; नंतर ' मीं कर्ता (ईश्वर) आहें ' या मिथ्या अहंकाराला जाळतो; आणि तदनंतर सर्व घर म्हणजे देह जाळतो. ईश्वराच्या इच्छेप्रमाणें घडून येणार असें तूं म्हणशील; पण नाहीं. रोगी पूर्ण बरा झाल्याशिवाय वैद्य त्याला सोडीत नाहीं. हास्पितलाच्या रजिष्टर बुकांत रोगी म्हणून तुझें नांव दाखल झालें आहे, आणि तूं पूर्ण बरा झाल्याशिवाय डॉक्टरसाहेब तुला रजा देणार नाहींत ! प्रथम तू तुझें नांव कां दाखल करूं दिलेंस ? " सर्वजण हंसूं लागले. परमेश्वराचें हास्पितल याविषयीं सद्गुरूंचें हें भाषण ऐकून केशवासहि हंसूं कोसळलें.

श्रीरामकृष्ण केशवास पुढें म्हणतात "हृदय ह्मणत असे, कीं, ' अशी ईश्वराची भक्ति आणि त्याला जोडूनच असा रोग, हें आपण कधीं पाहिलेलें नाहीं !' मला त्या वेळीं कडक संग्रहणीचा उपद्रव झाला होता. लाखों मुंग्या माझ्या मेंदूस लागल्या आहेत, असें वाटे; पण माझ्या तोंडांतून येणारे शब्द ईश्वरविषयक

असत. नाटागोरचे राम नांवाचे हिंदु वैद्य मला पाहण्यास आले होते. त्या वेळीं मी ईश्वराची मोठ्यानें प्रार्थना करीत होतों. तें पाहून तो म्हणाला ‘ या मनुष्याला खरेंच खूळ लागलेलें आहे काय ? चर्म आणि थोड्याशा अस्थि यांनीं युक्त असा याचा देह असून हा असा बरळत सुटला आहे !”

सद्गुरु केशवास पुढें म्हणतात “सर्व कांहीं तिच्या इच्छेप्रमाणें घडून येतें. हे जगन्माते, तूं तुझी इच्छाच चालवितेस ! तूं सर्व तुझें काम करितेस पण ‘मीं हें सर्व केलें आहे’ असें म्हणून मूर्ख मनुष्य त्याचें श्रेय घेऊं पहातो.”

**दैवी मालाकार.**

सद्गुरु पुढें म्हणाले “साधा गुलाब आणि त्याहून उत्तम असा बसोरा गुलाब यांची कशी व्यवस्था लावावी, हें माळ्याला चांगलें समजतें. रात्रीं पडलेल्या दंवाचा फायदा मिळावा म्हणून तो बसोरा गुलाबाच्या मुळांजवळची जमीन साफ करितो. दंवानें त्या रोप्याला टवटवीतपणा आणि शक्ति येते. तुझीहि अशीच स्थिति असेल. तुझी व्यवस्था कशी करावी हें त्या दैवी मालाकारास चांगलें माहीत आहे. आपल्या स्फूर्तीचें दंव तुझ्यावर चांगलें पडावें, आणि तूं अधिक शुद्ध आणि बळकट व्हावेंस, आणि तुझें कार्य पूर्वीपेक्षां चांगलें आणि चिरंतन व्हावें, यासाठीं तो तुझ्या मुळांभोंवती खोल खणत आहे. तूं आजारी आहेस असें

**केशवासाठीं सद्गुरूंची प्रार्थना.**

मी जेव्हां ऐकितों, तेव्हां माझें अंतःकरण भडभडून जातें. गेल्या खेपेस तू आजारी होतास, तेव्हां मी मध्यरात्रीं उठत असें आणि रडून जगन्मातेची प्रार्थना करीत असें, कीं,— हे माते, जर का केशवाचें बरेंवाईट झालें तर मी कलकत्त्यास गेल्यावर तुझ्याविषयीं कुणापाशीं बोलूं ? कलकत्त्यास आल्यावर तुझ्या आरोग्यासाठीं मीं तिची खऱ्या कळकळीनें प्रार्थना केली आणि फळें, साखर यांचे नवस मागून घेतले. हे जिन्नस तिला अर्पण करण्याचें मागणें मीं केलें होतें.”

केशवाविषयीं सद्गुरूंचें खोल आणि अनिर्वचनीय प्रेम कसें आहे, याविषयीं विचार करीत हजर असलेली सर्व मंडळी आश्चर्यानें आणि विस्मयानें सद्गुरूंकडे पाहूं लागली.

सद्गुरु पुढें ह्मणाले “खरें ह्मणशील, तर पूर्वी तुझ्या आजारीपणाविषयीं मला जी चिंता वाटत होती ती सध्यांच्या रोगाच्या चिंतेपेक्षां फार अधिक होती. गेल्या दोनतीन दिवसांत ती बरीच कमी झालेली आहे.”

दिवाणखान्यांत उघडणाऱ्या पूर्वेकडील दरवाज्यापाशीं केशवाची पूज्य माता उभी होती. उमानाथ मोठयानें सद्गुरूंस ह्मणाला "महाराज, ही पहा, केशवाची माता आपणास प्रणाम करिते."

सद्गुरु हंसले. उमानाथ आणखी ह्मणाला ." महाराज, केशवाच्या मातेची अशी विनंति आहे, कीं, तो लवकर बरा व्हावा ह्मणून आपण त्याला आशीर्वाद द्यावा."

**सर्व शक्तीचा उगम मातेपासून.**

सद्गुरु ह्मणाले "तुह्मीं आपल्या प्रार्थना सच्चिदानंद जगन्मातेला अर्पण करा. मानवांच्या सर्व आधिव्याधि नाहींशा करण्याला तीच समर्थ आहे!"

केशवाला सद्गुरु ह्मणतात "बराच वेळ आंतल्या खोलींत तूं न राहणें हें बरें. बायकांमुळें तुझ्या सभोंवार असलीं, कीं, तूं अज्ञानांत आणि मोहांत बुडून जाण्याचा आणि परमेश्वरास विसरून जाण्याचा संभव आहे. तुझ्या मित्रांनीं तुझ्याशीं ईश्वराच्या गोष्टी बोलल्या तर तुला बरें वाटेल."

**केशवास महत्वाची गंभीर सूचना.**

सद्गुरूंनीं फार गंभीरपणानें हे शब्द उच्चारले. लगेच गुरूच्या पायरीवरून एकदम ते लहान मुलाच्या स्थितींस येऊन हंसत केशवास ह्मणतात "तुझा हात मला पाहूं दे!"

आपल्या हाताच्या तळव्यावर केशवाचा हात घेऊन तो वर खालीं करून जणूं काय त्याचें वजन त्यांनीं पाहिलें! शेवटीं सद्गुरु ह्मणाले "नाहीं, बरोबर आहे, तुझा हात बराच हलका आहे. जे नेहमीं अनिष्ट चिंतितात आणि अनिष्ट करतात त्यांचे हात असे हलके नसतात!" सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणाले "माता सर्व कांहीं आपल्या हुकुमानें घडवून आणते; परंतु मूर्ख मनुष्य जो आतां आहे आणि पुढच्या घटकेस अनंतांत मिळाल्यामुळें दिसेनासा होतो, तो आपणच सर्व श्रेय घेऊं पाहतो! दोन निरनिराळ्या प्रसंगीं देव हंसतो. वडिलार्जित मिळकत दोन बंधु दोरी घालून वांटणी करितात आणि ह्मणतात, कीं, 'ही माझी जमीन, ही तुझी जमीन!' तेव्हां देव हंसून ह्मणतो, कीं, 'मूर्ख बेटे! जमीन माझी ह्मणून भांडतात, सर्व विश्व माझें आहे हें जाणत नाहींत!' पुन्हां एकदां देव हंसतो. मूल अत्यवस्थ आहे आणि वैद्य रुदन करणाऱ्या आईला ह्मणतो 'माते, भिऊं नको, तुझ्या मुलाला मी बरें करितों!' त्या बिचाऱ्या मूर्ख वैद्याला माहीत नाहीं, कीं, ईश्वर मारणारा आहे आणि कोणाच्याहि हातून बचाव होणें शक्य नाहीं!"

# पंचम परिच्छेद–अध्याय दुसरा.

केशवाला खोकला आला व तो बराच वेळ टिकला. त्याच्या वेदना पाहून हजर असलेल्या प्रत्येकास कळवळा आला. खोकला बंद केव्हां होईल ह्मणून मोठ्या उत्कंठेनें सर्व वाट पाहूं लागले. खरोखरच वेदना फार असह्य असून केशवाला दिवाणखाना सोडून परत आपल्या खोलींत जाण्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. केशवानें सद्गुरूंच्या पायांवर पडून, जमिनीस मस्तक लावून प्रणाम केला व भिंतीला पूर्वीप्रमाणें धरून हळुहळू तो आपल्या खोलींत गेला.

परत दक्षिणेश्वरांतील देवालयास जाण्यास निघण्यापूर्वी कांहीं मिठाई घ्यावी, अशी श्रीरामकृष्णांस विनंति करण्यांत आली. हजर असलेल्या मंडळीबरोबर ते बोलत होते. केशवाचा वडील मुलगा अमृत हा त्यांच्याजवळ बसला होता. अमृत ह्मणाला " कृपा करून आपण त्यांनां आशीर्वाद द्या."

त्या मुलाच्या अंगावरून सद्गुरु हात फिरवूं लागले. अमृत पुन्हां ह्मणाला " त्यांच्या मस्तकावर हात ठेवून आशीर्वाद द्या."

सद्गुरु ह्मणाले " आशीर्वाद देण्याचें काम माझें नाहीं, हें काम जगन्मातेचें.

**जगन्माताच आशीर्वाद देणार; दुसरा कोणी नाहीं.**

तिच्यापासून सर्व आशीर्वाद, वर प्राप्त होतात." असें ह्मणून ते हंसले आणि पूर्वीप्रमाणें त्या मुलाला गोंजारूं लागले.

अमृत आणि इतर केशवाचे शिष्य यांनां केशवाविषयीं बोलतांना सद्गुरु ह्मणाले "तो बरा होऊं दे असें मला कुणाविषयींहि ह्मणतां येत नाहीं. ही सिद्धि जगन्मातेपाशीं मीं कधींच मागितली नाहीं. माझी नेहमींची प्रार्थना अशी असते, कीं,

**सद्‌गुरूंची प्रार्थना.**

'हे माते, मला तुझी शुद्ध भक्ति दे. देहाची सुस्थिति, सुख, पैसा, कीर्ति इत्यादिकांविषयींच्या कोणत्याहि ऐहिक कामनेनें ती भक्ति मिश्रित–कलुषित–न होवो.' रोग बरे करण्यासारखे चमत्कार करून दाखविण्याची शक्ति मीं केव्हांहि तिच्याकडे मागितलेली नाहीं."

सद्गुरु पुढें ह्मणतात " केशव किती थोर आहे ! पैशाच्या मागें लागलेले संसारी

**शिष्यांसमोर केशवाची योग्यता–स्तुति.**

लोक आणि भक्तीसाठीं हपापलेले साधु असे दोघेहि त्याला सारखा मान देतात. मला एकदां दयानंद (स्वामी) एका उद्यानगृहांत भेटले होते. केशव त्यांनां त्या दिवशीं भेटण्यास येणार होता. 'केशव आला आहे काय ?' असें प्रत्येकाला ते विचारीत असत. चौकशी करण्यासाठीं वरचेवर ते आपल्या खोली-

बाहेर येत. बंगाली भाषेला दयानंद गौरंद ( ग ) भाषा ह्मणतात. वेदांतील देवतांवर आणि होमहवनांवर केशवाचा विश्वास नव्हता, असें मला वाटतें. ह्मणून दयानंदांनीं त्याला म्हटलें 'ईश्वरानें इतक्या वस्तु केल्या आहेत, त्याला देवताहि करितां येणार नाहींत काय ?' "

केशवाविषयीं आपलें मत फारच चांगलें आहे असें सांगून त्याच्या शिष्यांसमोर सद्गुरु म्हणाले "केशवाला मोठेपणानें गुरुपणा मिरविणारा ग्राम्य अभिमान मुळींच नाहीं. पुष्कळदां त्यानें आपल्या शिष्यांनां सांगितलें आहे, कीं, तुम्हीं दक्षिणेश्वराच्या देवालयास चला, तेथें तुमच्या सर्व शंका नाहींशा होतील. मीहि असेंच ह्मणतों, कीं, केशवाची कीर्ति लाखोपट वाढो. मला कीर्ति घेऊन काय करावयाची ? होय, केशव महात्मा खरा ! त्याला संसारी लोक आणि साधु सारखाच मान देतात."

**सद्गुरूंची कीर्ति.**

थोडासा फलाहार झाल्यावर सद्गुरु देवालयास जाण्याकरितां निघाले. ब्राह्मोभक्त त्यांनां पोहोंचविण्यास जिन्याखालीं आले. जिन्याखालीं येतांच, जिन्याच्या पायथ्याशीं दिवा नाहीं असें सद्गुरूंस दिसलें. ते अमृत आणि इतर शिष्य यांनां ह्मणाले "या सर्व जागा प्रकाशित कराव्या. कारण, जगन्माता प्रत्येक ठिकाणीं वास करिते. अशा हयगयीनें दारिद्र्य येतें. अशी चूक पुन्हां होऊं नये ह्मणून खबरदारी ठेवा."

**आमच्या गृहांमध्यें मातेचें अस्तित्व.**

दोनतीन शिष्यांसहित नंतर श्रीरामकृष्ण गाडींत बसून देवालयास जाण्यास निघाले.

---

# षष्ठ परिच्छेद.

## १८८३.

## अध्याय पहिला.

### श्रीरामकृष्णांबरोबर दक्षिणेश्वराच्या देवालयांत एक दिवस.

रविवार, वद्य प्रतिपदा, ता. १९ आगष्ट १८८३. आज भक्तांनां कालीमातेच्या देवालयांत येऊन सद्गुरूंस भेटण्यास सवड होती. सर्वांनां मुक्तद्वार होतें. भेटण्यास येणाऱ्या प्रत्येकाबरोबर सद्गुरु भाषण करीत होते. संन्यासी, परमहंस, हिंदु, ख्रिश्चन, ब्रम्हो, शाक्त, वैष्णव आणि शैव, त्याचप्रमाणें स्त्रिया आणि पुरुष इत्यादि सर्व तऱ्हेचे लोक भेटण्यास आले होते. जेथें या मनुष्यरूपी ईश्वरास भेटण्यास आणि नमस्कार करण्यास अनेक लोक वारंवार येतात तें देवालय जिनें बांधिलें त्या उदार राणी राशमणीची धन्य होय!

मध्याह्नींची वेळ. सद्गुरु आपल्या खोलींत लहानशा खाटेवर बसले होते. भोजनोत्तर त्यांनीं थोडीशी विश्रांति घेतली. मी तेथें जाऊन त्यांनां नमस्कार केला. मला बसण्यास सांगून माझ्या कुटुंबाच्या खुशालीविषयीं चौकशी करून कांहीं वेळानंतर सद्गुरु माझ्याशी वेदांतावर बोलूं लागले. सद्गुरु म्हणाले "अष्टावक्र-संहितेमध्यें आत्मज्ञानाविषयीं चर्चा आहे. आत्मज्ञानी म्हणतात, कीं, 'मी तो आहें, मी ब्रम्ह आहें.' वेदान्ती संन्याशाचें असेंच मत आहे; पण संसारी गृहस्थाचें असें मत असणें योग्य नाहीं. कारण, गृहस्थ सर्व कांहीं करतो आणि पुन्हां तो कर्मातीत असा परमात्मा कसा होईल?"

सद्गुरु पुढें म्हणाले "आत्म्याला कोणत्याहि वस्तूची अपेक्षा नसते, असें वेदान्ती समजतात. सुखदुःख, सद्गुणदुर्गुण इत्यादिकांचा आत्म्यावर कसलाहि परिणाम होत नाहीं; पण आत्मा म्हणजे देह आहे असें समजणारांवर त्यांचा परिणाम होतो. धूर भिंत काळी करून सोडील; ज्यांतून तो वर जाऊं लागतो त्या आकाशावर त्याचा कांहीं परिणाम होत नाहीं!"

सद्गुरु पुढें ह्मणाले "कृष्णकिशोर नांवाचा एक भक्त होता. तो आपण 'ख' (आकाश) आहों, असें ह्मणत असे. त्याचा अर्थ असा, कीं, ब्रह्माविषयीं कांहीं सांगतां येत नाहीं, तसें आकाशाविषयींहि कांहीं सांगतां येत नाहीं, ह्मणून ब्रह्माला आकाशाची उपमा देतात; याकरितां आपण आकाशासारखे ब्रह्म आहों. तो खरा भक्त असल्यामुळें त्याला असें ह्मणण्याचा अधिकार होता; इतरांनीं असें ह्मणणें शोभत नाहीं. पण मी मुक्त आहें अशी कल्पना प्रत्येकानें बाळगणें चांगलें. मनुष्य जर नेहमीं असेंच ह्मणत गेला, तर तो खात्रीनें मुक्त होणार; पण 'मी बद्ध आहें' असें नेहमीं ज्याला वाटतें तो स्वतःला शेवटीं खरोखरच बद्ध करून घेणार."

सद्गुरु पुढें ह्मणाले " 'मी पापी आहें ! मी पापी आहें !' असें नेहमीं घोकत बसलेला दुबळा मनुष्य नरकास (अवनतीस) निःसंशय जातो ! त्यापेक्षां मनुष्यानें नेहमीं असें ह्मणावें कीं 'मी ईश्वराचें पवित्र नाम गातों. माझें पाप शिल्लक कसें राहील ? आणि मी बद्ध कसा होईन ?' "

माझ्याकडे वळून सद्गुरु पुढें ह्मणाले "आज माझें मन स्वस्थ नाहीं. हृदयचें अंग फार दुखत आहे असें त्याचेकडून मला समजलें. माझी चिंता मायेमुळें उत्पन्न झाली कीं दयेमुळें?"

यादर काय उत्तर द्यावें हें मला न समजल्यामुळें मी स्वस्थ राहिलों.

श्रीरामकृष्ण पुढें ह्मणाले "माया ह्मणजे काय हे तुला माहीत आहे काय ?

**माया व दया.**

आपल्या माता, पिता, बंधु, भगिनी इत्यादि आप्तांविषयीं प्रेम, याला माया ह्मणतात; आणि सर्व प्राण्यांवर प्रेम करणें याला दया ह्मणतात. माझी चिंता कशामुळें—मायेमुळें किंवा दयेमुळें—उत्पन्न झाली असेल ? पण हृदयनें माझ्याकरितां पुष्कळ श्रम केले आहेत. त्यानें माझी बरीच सेवा केली. माझें कोणतेंहि काम करण्याला त्यानें काकूं केलें नाहीं. शेवटीं शेवटीं मात्र त्यानें मला बराच त्रास दिला. एकदां तर त्या त्रासाची इतकी परमावधि झाली, कीं, बुरुजावरून खालीं गंगेंत जीव देण्यास मी तयार झालों ! पण तें जाऊ द्यां आतां. त्याला कांहीं पैसा मिळेल तर माझें मन स्वस्थ होईल. पण पैशाकरितां मीं कोणापाशीं तोंड पसरावें ? याकरितां बाबूंनां विनंति करण्याची कोण पर्वा करितो ?"

## षष्ठ परिच्छेद–अध्याय दुसरा.

दुपारीं दोनतीन वाजतां अधरचंद्र आणि बलराम वसु असे दोन शिष्य आले आणि ते सद्गुरूंस नमस्कार करून बसले. "कुशल आहांतना?" असें त्यांनीं सद्गुरूंस विचारिलें. सद्गुरूंनीं उत्तर दिलें "माझें शरीर बरें आहे, मन मात्र स्वस्थ नाहीं!"

हृदयच्या दुखण्याविषयीं ते कांहींच बोलले नाहींत.

---

### अध्याय दुसरा.

बडबाजारच्या मलिक कुटुंबाची देवी सिंहवाहिनी इच्याविषयीं भाषण निघालें असतां सद्गुरु ह्मणाले "मी एकदां ती देवी पाहण्यास गेलों होतों. ती देवी कलकत्त्याच्या चाशाधोपापारा भागांत एका कटुंबांत होती. तें कुटुंब फार गरीब झालें होतें. त्यांचें घर बहुतेक जीर्ण झालें होतें. घरांत कांहीं ठिकाणीं घाण आणि कचरा सांठलेला होता. कांहीं ठिकाणीं शेवाळ वाढलेलें होतें. भिंतीचा चुना गळून गेला होता, आणि विटा व वाळू हीं भिंतींतून पडलेलीं होतीं. मलिकचीं दुसरीं घरें फार स्वच्छ व व्यवस्थेशीर आहेत, पण हें तसें नाहीं."

नंतर माझ्याकडे वळून सद्गुरु ह्मणाले "हें असें कां झालें, हें तुला सांगतां येईल काय?"

कांहीं न सांगतां आल्यामुळें मी स्वस्थ राहिलों. श्रीरामकृष्ण ह्मणाले "असें आहे, कीं, प्रत्येकाला आपल्या पूर्वकर्मांचीं फळें भोगिलीं पाहिजेत. कर्माच्या नियमावर आह्मीं विश्वास ठेवावा."

सद्गुरु माझ्याकडे वळून ह्मणाले "या जीर्ण घरामध्यें मीं एक गोष्ट पाहिली. ती गोष्ट ही, कीं, त्या देवीचें मुख तेजानें चमकत होतें. देवाच्या मूर्तीत दिव्य चैतन्य भरलेलें आहे असें आह्मीं मानिलें पाहिजे.

**मूर्तीची प्राण-प्रतिष्ठा.**

मी एकदां विष्णुपुराला गेलों होतों. तेथें राजाचीं कांहीं उत्तम देवालयें होतीं. एका देवालयांत मृण्मयी नांवाची मूर्ति आहे. देवालयासमोर एक मोठा तलाव आहे. पण स्त्रियांनीं आपल्या केंसाला लाविलेल्या सुगंधी तेलाचा वास मला त्या तलावाच्या पाण्यांत आला, हें कसें? पूजा करतेवेळीं अशीं सुगंधी तेलें लोक देवीला अर्पण करितात, हें मला माहीत नव्हतें. मी तळ्यापाशीं गेलों, आणि देवीची मूर्ती पाहिली नव्हती पण मला समाधींत तिची कमरेपर्यंत दिव्य आकृति दिसली. जगन्माता समाधींत मृण्मयीच्या रूपानें मला दिसली."

इतक्यांत दुसरे भक्त आले. नंतर भाषणाचा ओघ काबूलच्या युद्धाकडे आणि त्यानंतर झालेल्या यादवीकडे वळला. याकुबखानाला पदच्युत केलेलें आहे, अशी बातमी एका भक्तानें दिली. तो ह्मणाला "याकुबखान मोठा भक्त आहे!"

**अनिष्टाचा प्रश्न आणि भक्त.**

श्रीरामकृष्ण ह्मणाले "होय. सुखदुःख, संपत्तिविपत्ति हीं शरीराला लागलेलीं आहेत. कविकंकणाच्या 'चंडीं'त काळुवीर नांवाच्या भक्ताला तुरुंगांत टाकिलें होतें, असें लिहिलें आहे. त्याच्या छातीवर मोठा दगड ठेविला होता, इतकें असूनहि काळुवीर हा जगन्मातेचा फार आवडता भक्त होता. सुखदुःख, संपत्तिविपत्ति हीं शरीराबरोबर येतात, हें खरें. श्रीमंत हा किती मोठा भक्त होता. त्याची माता खुलना इच्यावर जगन्मातेचें किती विलक्षण प्रेम होतें. पण त्याला किती त्रास सोसावा लागला! त्याला फांशीं देण्यास सुळावर चढविण्यांतसुद्धां आलें होतें."

सद्गुरु पुढें ह्मणाले "एका जंगली भक्ताला सुदैवानें जगन्मातेचें दर्शन झालें. जगन्मातेचें त्याच्यावर विशेष प्रेम होतें, आणि ती त्याच्यावर आपली कृपा करी; पण त्याला लांकडें तोडण्याचें काम करावें लागत असे. आपल्या उपजीविकेसाठीं त्याला लांकडाचे भारे विकावे लागत असत. भक्ताची स्थिति या जगांत उत्तम असते, असें कांहीं नाहीं. त्याची दैवी संपत्ति मोठी असते, पण ऐहिक संपत्तीनें तो गरीब असतो. शंखचक्रगदाधारी ईश्वराला मनुष्याच्या रूपांत देवकीनें तुरुंगांत पाहिलें; पण असा साक्षात्कार होऊनहि तिची तुरुंगांतून सुटका झाली नाहीं."

मी ह्मणालों "तुरुंगांतूनच काय, आपल्या सर्व दुःखांचें मूळ जें शरीर त्यांतूनहि तिला मुक्त होतां आलें असतें!"

सद्गुरु ह्मणाले "असें आहे, कीं, शरीर हें आपल्या पूर्वकर्माचें फळ आहे. जोंपर्यंत आपल्या भोगाचा क्षय झाला नाहीं, तोंपर्यंत तें धारण केलें पाहिजे. आंधळयानें गंगाजलांत स्नान केलें असतां त्याचीं सर्व पापें नाहींशीं होतात; पण आंधळेपणा हा तसाच राहतो. हें त्याच्या पूर्वकर्माचें फल होय."

मीं ह्मटलें "मनुष्यापासून सुटलेला बाण हा कुठें तरी जाऊन लागला पाहिजे. एकदां सुटलेल्या बाणावर आपला ताबा राहत नाहीं!"

सद्गुरु ह्मणाले "शरीर सुखी किंवा दुःखी असेल, पण खरा भक्त आत्मज्ञानी आणि भक्तींत श्रीमंत असतो. उदाहरणार्थ, पांडव पहाना! त्यांनां किती संकटें, त्रास आणि दुःखें सोसावीं लागलीं! पण हें सर्व सोशीत असतां त्यांचें देवावरील

प्रेम आणि भक्ति कमी झाली नाहींत. त्यांच्यासारखे ज्ञानी आणि भक्त असे दुसरे कोण तुम्हांला आढळणार ?

---

## अध्याय तिसरा.

### समाधींत आणि नरेंद्राबरोबर.

इतक्यांत नरेंद्र आणि विश्वनाथ उपाध्याय हे आले. विश्वनाथ हे नेपाळचे रेसिडेंट कलकत्त्यास रहात असत. सद्गुरु त्यांनां क्याप्टन असें ह्मणत, ह्मणून सर्व शिष्यहि त्यांनां त्याच नांवानें हांक मारीत. नरेंद्राचें वय या वेळीं बावीस वर्षांचें असून तो सीनीयर बी. ए. क्लासांत होता. तो बहुतेक रविवारीं सद्गुरूंकडे येत असे. सद्गुरूंस नमस्कार करून नरेंद्र आपल्या जागेवर बसला.

सद्गुरूंनीं त्याला गाण्यास सांगितलें. एक तंबोरा खोलीच्या पश्चिमबाजूच्या भिंतीवर लटकत होता. नरेंद्रानें तो काढून खालीं घेतला, आणि पेटी तबला इत्यादि वाद्यांशीं ताल जुळविण्यासाठीं त्याच्या खुंट्या फिरविण्यास सुरवात केली. त्याचें गाणें ऐकण्यासाठीं प्रत्येकजण मोठया उत्सुकतेनें त्याच्या तोंडाकडे पाहूं लागला.

सद्गुरु विवेकानंदास ह्मणतात "हें भांडें पूर्वीप्रमाणें वाजत नाहीं !"

यावर क्याप्टन ह्मणाले "तें भरलेलें आहे ह्मणून वाजत नाहीं ! कंठापर्यंत भरलेलें भांडेंहि आवाज करीत नाहीं."

सद्गुरु ह्मणाले "पण नारद आणि भक्त यांच्या चरित्रांचा तुह्मी कसा उलगडा कराल? ते साक्षात्कारानें पूर्ण भरलेले होते तरी ते बोलत होते. ते भरलेले होते, पण आवाज करीत होते."

क्याप्टन ह्मणाला "मानवजातीच्या कल्याणाकरितां ते बोलत होते."

सद्गुरु ह्मणाले "होय, तें खरें. नारद आणि शुकदेव हे अत्युच्च समाधींतून खालीं येत असत. त्रस्त, दुःखी, ईश्वरास न जाणणाऱ्या अशा मूढ जीवांकडे त्यांचा ओढा फार असे. त्यांचें कल्याण व्हावें ह्मणून ते उपदेश करीत."

नरेंद्रानें पुढील गाणें सुरू केलें.

**सत्यं शिव सुन्दररूप भाति हृदि मन्दिरे ।**
**निरखि निरखि अनुदिन मोरा डुबिब रूपसागरे ॥**

से दिन कबे हबे दीन जनेर भाग्ये नाथ ।
ज्ञान अनन्तरूपे पशिबे नाथ मम हृदे ।
अवाक् इहये अधीर मन शरण लइबे श्रीपदे ॥
आनन्द अमृतरूपे उदिबे हृदय आकाशे ।
चन्द्र उदिले चकोर जेमन क्रीडये मन हरषे ।
आमराओ नाथ तेमनि करे मातिब तव प्रकाशे ॥
शान्तं शिव अद्वितीय राजराजचरणे ।
विकाइब ओहे प्राणसखा सफल करिब जीवने ।
एमन अधिकार कोथा पाव आर स्वर्गभोग जीवने । ( सशरीरे ) ॥
शुद्धमपापविद्धं रूप हेरिये नाथ तोमार ।
आलोक देखिले आंधार जेमन जाय पलाइये सत्वर ।
तेमनि नाथ तोमार प्रकाशे पलाइबे पापआंधार ॥
ओहे ध्रुवतारासम हृदे, ज्वलन्त विश्वास हे ।
ज्वालि दिये दीनबंधु पूराओ मनेर आश ।
आमि निशिदिन प्रेमानंदे मगन हइये हे ॥
आपनारे भूले जाब तोमार पाइये हे ।
से दिन कबे हबे हे दीनजनेर भाग्ये नाथ ॥

अमृताप्रमाणें मधुर आणि जीवनदायक 'आनंद अमृतरूपे' इत्यादि शब्द ऐकतांच सद्गुरूंची समाधि लागली. तेथेंच ते हातांत हात घालून, सरळ पूर्वेकडे तोंड करून बसले. सौंदर्यसागरांत–जगन्मातेच्या आनंदांत ते पूर्ण लीन होऊन गेले. बाह्य स्मृति कांहीं नाहीं; श्वासोच्छ्वास बंद. सर्व अवयव स्तब्ध. दृष्टि स्थिर. जणूं काय हें एक चित्रच आहे ! बाह्य जगांतून–इंद्रियांच्या जगांतून ते कोठें दूर गेले आहेत, असें दिसलें.

समाधि उतरली. मध्येंच समाधि लागलेली आहे असें पाहून नरेंद्र खोलींतून पूर्वेच्या व्हरांड्याकडे गेला होता. तेथें हाजरा माळेचे मणि ओढीत बसला होता. नरेंद्र त्याच्याशीं बोलूं लागला.

श्रीरामकृष्णांची खोली भक्तमंडळीनें भरून गेली होती. समाधि उतरल्यानंतर खोलींत नरेंद्र कोठें आहे ह्मणून सद्गुरु पाहतात तों तो तेथें नाहीं. तंबोरा तसाच जमिनीवर होता. सर्व भक्त सद्गुरूंकडे पाहत होते.

# षष्ठ परिच्छेद—अध्याय तिसरा.

सद्गुरु नरेंद्राविषयीं ह्मणाले "त्यानें विस्तव पेटविला; आतां तो खोलींत राहिला काय आणि खोलींतून गेला काय, सारखेंच!"

क्याप्टन आणि भक्त यांच्याकडे वळून सद्गुरु ह्मणाले "सच्चिदानंद प्रभूचें ध्यान करा, ह्मणजे तुह्मांला शाश्वत आनंद प्राप्त होईल. तो सच्चिदानंद प्रभु येथें आणि सर्व ठिकाणीं आहे. अज्ञानामुळें तो दिसत नाहीं. जितका तुमचा इंद्रियांकडचा ओढा कमी होत जाईल, तितकें ईश्वराविषयीं प्रेम वाढत आईल."

क्याप्टन ह्मणाले "आमच्या घराकडे—कलकत्त्याकडे जितके आह्मी जवळ येतों, तितके लांब आह्मी काशीहून असतों; आणि काशीजवळ जितके जातों तितके आमच्या घराहून दूर होतों."

सद्गुरु ह्मणाले "श्रीमती राधा कृष्णाच्या जितकी जवळ जाई तितका तिला त्याच्या मधुर देहाचा सुगंध येई. होय, जितकें देवाच्या सन्निध जावें, तितकें आपलें देवावरचें प्रेम वाढतें. नदी समुद्राच्या अगदीं जवळ गेली ह्मणजे तिला भरतीओहोटी सुरू होते. ज्ञान्याच्या अंत:करणांत वाहणारी ज्ञानगंगा ही एकाच दिशेनें वाहते. त्याला सर्व विश्व स्वप्नवत् वाटतें. तो आपल्या आत्मस्वरूपांत नेहमीं राहतो. पण भक्ताच्या हृदयांतील भक्तिगंगा एकाच दिशेनें वाहत नाहीं. तिला भरतीओहोटी असते. भक्त हंसतो, रडतो, नाचतो आणि गातो. केव्हां केव्हां आपल्या प्रियकरांत लीन होऊन जावें, असें त्याला वाटतें. तो त्यांत पोहतो, बुडी मारतो आणि बर्फ जसें पाण्यावर तरंगतें तसा मोठया आनंदानें वर येतो. पण खरोखर ब्रह्म आणि ईश्वर (शक्ति) एकच आहेत! सच्चिदानंद ब्रह्म, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् आदिमाता आहे. रत्न आणि त्याची प्रभा हीं निराळीं आहेत अशी कल्पना करतां येत नाहीं. कारण, एकावांचून दुसऱ्याची कल्पना होत नाहीं. निर्गुण सच्चिदानंद ब्रह्म हें अनेक रूपांनीं व्यक्त झालें आहे. निरनिराळ्या व्यक्त शक्तीप्रमाणें त्याला निरनिराळीं नांवें देतात. ह्मणूनच त्याला अनेक रूपेंहि आहेत. ह्मणून भक्त ह्मणतो, कीं, हे माते, तूं तें सर्व कांहीं आहेस. जेथें जेथें क्रिया (सृष्टि, स्थिति आणि संहार) आहे, तेथें तेथें शक्ति—चिच्छक्ति आहे. पाणी वाहो अथवा न वाहो, पाणी तें पाणीच. उत्पत्ति, स्थिति, संहार करणारी चिच्छक्तिच सच्चिदानंद ब्रह्म होय. ह्मणून क्याप्टन, मग तो कांहीं न करो,

**ज्ञानी आणि भक्त.**

**ब्रह्म आणि ईश्वर.**

पूजा करो किंवा गव्हरनर जनरलास भेटण्यास जावो, क्याप्टन तो क्याप्टनच ! एकच क्याप्टन हे सर्व प्रकार करतो, किंवा हे प्रकार ह्मणजे त्याच्या उपाधि होत."

क्याप्टन ह्मणाले " होय महाराज, तें खरें आहे."

सद्गुरु ह्मणतात " मीं हें केशव सेनास सांगितलें."

क्याप्टन ह्मणाला " महाराज, केशव सेन आमच्या हिंदु रीतिभातींनां आणि स्मृतींनां मान देत नाहीं. तो खरा साधु असेल काय ? तो प्रापंचिक आहे साधु नव्हे!"

सद्गुरु हंसून व शिष्याकडे वळून ह्मणतात " केशव सेनकडे मी केव्हांहि जाऊं नये, असें क्याप्टन ह्मणतात."

क्याप्टन ह्मणाले " पण महाराज, आपण जातांच ! मी काय करूं ? "

सद्गुरु जोरानें ह्मणाले "तुमच्या शास्त्राप्रमाणें म्लेच्छ ( अनार्य ) अशा गव्हर्नर-जनरलास भेटण्याला तुह्मी जातां, आणि तेंहि पैशासाठीं ! आणि मीं केशव सेनकडे जाऊं नये ? तो देवाचें ध्यान करितो, त्याचें नाम गातो ! देवच मानवी जीव आणि जगत् या रूपांनीं व्यक्त झालेला आहे, असें नेहमीं प्रतिपादन करणाऱ्या तुह्माला हें ह्मणणें शोभत नाहीं. विचाराप्रमाणें उच्चार व आचार असावा, आणि आचाराप्रमाणें विचार असावा." (**'बोले तैसा चाले। त्याचीं वंदावीं पाऊलें.'**)

यानंतर सद्गुरु एकदम खोलींतून ईशान्य दिशेच्या व्हरांड्याकडे गेले. क्याप्टन आणि इतर भक्त त्यांची वाट पाहत खोलींत बसले. मी सद्गुरूंबरोबर, नरेंद्र हाजराशीं बोलत होता त्या जागीं गेलों. हाजरा आपण कट्टा अद्वैती आहों असें दाखवीत असे, हें श्रीरामकृष्णांस माहीत होतें. तो ह्मणत असे " हें सर्व विश्व स्वप्नवत् आहे. सर्व पूजा, नैवेद्य इत्यादि क्रिया मानसिक भ्रम होय. ब्रह्म काय तें एक शाश्वत सत्य आहे. मनुष्यानें आपल्या खऱ्या आत्म्याचें ध्यान करावें आणि दुसऱ्या कशाचेंहि करूं नये, इत्यादि."

सद्गुरु हंसत ह्मणाले "अरे तुह्मी काय बोलत आहां ?"

नरेंद्र हंसत हसत ह्मणाला "साधारण मानवांनां अगम्य अशा मोठमोठया गोष्टी आह्मी बोलत आहों !"

सद्गुरु ह्मणाले "तुह्मी कितीहि मोठया गोष्टी बोला, पण हें पक्कें ध्यानांत ठेवा, कीं, **शुद्ध अहेतुक भक्ति आणि शुद्ध अहेतुक ज्ञान,** हीं एकच आहेत. ध्येय एकच, पण **भक्तीचा मार्ग सोपा आणि सरळ** आहे."

नरेंद्र ह्मणाला "होय, ह्मान्याप्रमाणें तर्क करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हे माते, मला तुझ्या भक्तीचें वेड लाव."

माझ्याकडे वळून नरेन्द्र ह्मणतो "अहो, मी हामिल्टन वाचीत होतों. तो एके ठिकाणीं लिहितो, कीं, 'A learned ignorance is the end of Philosophy and the beginning of Religion'"

सद्गुरूंनीं मला विचारिलें "त्याचा अर्थ काय?"

नरेंद्रानें बंगालींत अर्थ सांगितला. "पुष्कळ शिकून कांहीं न समजणें हा तत्वज्ञानाचा शेवट आणि धर्माचा आरंभ होय!" श्रीरामकृष्ण हंसले आणि "थ्यांक् यू!" असें ह्मणाले. हें पाहून प्रत्येकजण हंसला. कारण, फार झालें तर याच नमुन्याच्या पांचसहा तुटपुंज्या वाक्यांपुरतेंच सद्गुरूंचें इंग्रजी भाषेचें ज्ञान होतें.

---

## अध्याय चवथा.

## सद्गुरूंचीं वचनें.

संध्याकाळ होत चालली. एकामागून एक शिष्यांनीं सद्गुरूंचा निरोप घेतला. नरेंद्रानेंहि सद्गुरूंनां विचारलें.

दिवस बुडत चालला. संध्याकाळ झाली. दिवे लागले. काली आणि विष्णु यांच्या दोघां पूजाऱ्यांनीं पूजेची तयारी चालविली. गंगेंत कमरेपर्यंत जाऊन त्यांनीं आपला देह आणि आत्मा पवित्र करून घेतला. लवकरच ते देवालयांत येऊन आरती इत्यादि विधि करणार होते. दक्षिणेश्वरांतील तरुण मंडळी आपल्या मित्रांसहित हातांत काठया घेऊन उद्यानांत फिरावयास आली होती. बुरुजाच्या बाजूस फिरून पुष्पांनीं सुगंधित केलेल्या वाऱ्याचा त्यांनीं उपभोग घेतला. आगष्ट-महिन्यांत जलद वाहणाऱ्या गंगेचें थोडेंसें उचंबळणारें वक्षःस्थल त्यांनी पाहिलें. त्यांच्यापैकीं कांहीं अधिक विचारी, पंचवटी नामक पवित्र झाडाच्या वनांत एकटेच फिरत असलेले दृष्टीस पडले. श्रीरामकृष्णहि कांहीं वेळ पश्चिमेच्या व्हरांड्यावरून गंगेकडे पहात होते.

संध्याकाळ झाल्यावर देवालयांतील सर्व दिवे लावण्यांत आले. वृद्ध मोलकरी-णीनें श्रीरामकृष्णांच्या खोलींत दिवा लावला आणि धूप जाळला. इतक्यांत

शिवाच्या बारा मंदिरांत आरत्या सुरू झाल्या. लगेच कालीच्या व विष्णूच्या मंदिरांतहि आरती होऊं लागली. झांज, घंटा, मृदंग इत्यादिकांचा संयुक्त ध्वनि जवळ झुळझुळ वाहणाऱ्या गंगेनें प्रतिध्वनित केल्यावर अधिकच गंभीर आणि मधुर भासला.

पौर्णिमेनंतरची ही प्रतिपदा. अंधार झाल्यावर लगेच चंद्र उगवला. उद्यानांतील उंच वृक्षांचीं टोंकें आणि देवालयांतील आवार हीं ज्योत्स्नेनें प्रकाशित झालीं. चंद्रप्रकाशाचा स्पर्श होतांच, गंगेचें पाणी चमकूं लागलें आणि मोठ्या आनंदानें नाचूं लागलें.

संध्याकाळ झाल्यानंतर सद्गुरूंनीं काली मातेला नमस्कार केला. हाताच्या टाळ्यांनीं ताल धरून त्यांनीं देवाचीं पवित्र नामें गाइलीं. त्यांच्या खोलींत ईश्वरी अवताराचीं आणि साधुपुरुषांचीं चित्रें होतीं. ईश्वराची स्तुति गात गौरंग आपल्या भक्तासह, शिशु कृष्ण यशोदा मातेसह, सरस्वती, कालीमाता, ध्रुव, प्रल्हाद, रामराज्याभिषेक, श्रीराधाकृष्ण इत्यादि तसबिरी होत्या. त्या प्रत्येक चित्रांत दाखविलेल्या ईश्वराच्या स्वरूपापुढें, त्यांचीं पवित्र नामें गाऊन सद्गुरूंनीं नमस्कार केला. आपलीं नेहमींचीं मोठ्या विधायक तत्वानें ओतप्रोत भरलेलीं अशीं वचनें सद्गुरूंनीं म्हटलीं. त्यांपैकीं कांहीं खालीं दिल्याप्रमाणें:—

१. ब्रह्म—आत्मा—भगवान्. ( ज्ञान्यांचें ब्रह्म, योग्यांचा आत्मा आणि भक्तांचा भगवान् हे तिन्ही एकांत, एक तिन्हींत आहे. )

२. भागवत—भक्त—भगवान्. ( हे तिन्ही एकांत, एक तिन्हींत. )

३. ब्रह्मशक्ति—शक्तिब्रह्म. ( निर्गुण आणि सगुण परमात्मा एकच. )

४. वेद—पुराण—तंत्र. (हे निरनिराळे धर्मग्रंथ आणि त्यांचा विषय एकच—देव.)

५. गीता—गायत्री.

६. शरणागत शरणागत. ( मी तुझा आहें, मी तुझा आहें. )

७. नाहं, नाहं, तूंहुं तूंहुं ( मी नव्हें, मी नव्हें, पण तूं; खरा कर्ता तूं आहेस, मी तुझ्या हातांतील साधन आहें. )

८. आमि यंत्र, तुमि यंत्री. ( मी यंत्र किंवा बाहुली, आणि तूं सूत्रधार. )

हीं वचनें म्हटल्यावर सद्गुरूंनीं हात जोडून जगन्मातेचें ध्यान केलें.

# षष्ठ परिच्छेद–अध्याय चवथा.

संध्याकाळीं कांहीं भक्त उद्यानांत फिरत होते. देवालयांतील आरत्या संपल्यावर ते एकामागून एक श्रीरामकृष्णांच्या खोलींत आले. ते खाटेवर बसले होते. मी, अधर, किशोरी इत्यादि समोर जमिनीवर बसलों.

सद्गुरु म्हणाले " नरेंद्र, राखाल आणि भवनाथ हे नित्यसिद्ध ( जन्मतःच पूर्ण ) होत. त्यांनां शिक्षणाची जरूरी नाहीं. त्यांनां जें शिक्षण मिळतें, तें त्यांच्या गरजेपेक्षां अधिक असतें. नरेंद्र कोणाची पर्वा करीत नाहीं, हें तुम्ही पहातां. परवां तो माझ्याबरोबर क्याप्टनच्या गाडींतून चालला होता. क्याप्टननें उंच मानाच्या जागेवर त्याला बसण्यास सांगितलें; पण त्यानें त्याच्या म्हणण्याकडे लक्ष्यच दिलें नाहीं. आणखी मी त्याची लोकांसमोर स्तुति करीन या भीतीनें आपणाला कांहीं येतें असेंसुद्धां तो मला दाखवीत नाहीं. त्याला माया, आसक्ति नाहीं. सर्व बंधनांपासून मुक्त आहे, असा तो दिसतो. रीतीभातींत तो फार नम्र आहे. एकच व्यक्ति या दृष्टीनें पहातां वाचन, लेखन, वादन, गायन, इत्यादि अनेक चांगले आणि उच्च गुण त्याच्यामध्यें आहेत. आपलीं इंद्रियें ताब्यांत कशीं ठेवावीं, हेंहि तो जाणतो. आपण लग्न करून घेणार नाहीं, असें त्यानें बोलून दाखविलें आहे. नरेंद्र आणि भवनाथ यांच्यामध्यें बरेंच सादृश्य व प्रेम आहे. नरेंद्र वरचेवर माझ्याकडे येत नाहीं, हें चांगलें आहे. कारण, त्याला पाहिलें म्हणजे माझी समाधि लागते व काय करावें हें मला समजत नाहीं."

# सप्तम परिच्छेद.

## सुरेन्द्राच्या उद्यानांत.

### १८८४.

## अध्याय पहिला.

### सद्गुरु शिष्यांसह गातात आणि नाचतात.

तारीख १५ जून १८८४, रविवार, ज्येष्ठ वद्य ६ या दिवशीं श्रीरामकृष्णांनां सुरेन्द्र नामक शिष्यानें कलकत्त्याजवळ कांकुरगाछी येथें असलेल्या उद्यानगृहांत मेजवानीस आमंत्रण दिलें होतें. अशीं आमंत्रणें ह्मणजे भावी शिष्य आणि भक्त यांचीं संमेलनें होत. हे प्रसंग मृदंग इत्यादि वाद्यांच्या तालावर ईश्वराचें नाम गाऊन आनंद आणि उत्सव करण्याचे होत. अशा प्रसंगीं सद्गुरु फार चांगले शोभत. ते दैवी प्रेमानें गात, नाचत आणि वरचेवर समाधिस्थितींत जात.

भक्तीपर पद्यें ह्मणून झाल्यावर, आणि त्यामुळें उत्पन्न झालेली आध्यात्मिक खळबळ शांत झाल्यावर मानवजातीच्या कल्याणाकरितां सद्गुरूंनीं युक्ति, प्रेरणा आणि स्फूर्ति यांनीं पूर्ण अशा अमृतोपम उपदेशाची मेजवानी दिली. महद्भाग्यामुळें ज्यांनां हा उपदेश ऐकावयास मिळाला त्यांच्या स्मृतिपटांतून तो कधींहि नाहींसा होणार नाहीं!

सकाळची वेळ संकीर्तनांत–ईश्वराचें नाम गाण्यांत गेली. श्रीकृष्ण मथुरेस गेल्यामुळें गोपींनां झालेल्या विरहाचें वर्णन करणारीं पद्यें मंडळी गात होती. पदें गात असतांना सद्गुरूंची वरचेवर समाधि लागे. मंडळी गात असतां सद्गुरु एकदम उठून उभे राहिले आणि ह्मणाले "हे सख्या, माझ्या प्रियकर कृष्णाला मजकडे आण, किंवा तो आहे तिकडे मला घेऊन जा!"

गोपींची मुख्य जी राधा तिच्यांत सद्गुरूंनीं व्यक्तित्व नाहींसें करून टाकलें. आपण आणि राधा एक आहों, असें त्यांनां वाटलें.

# सप्तम परिच्छेद—अध्याय पहिला.

वरील शब्द बोलून सद्गुरु अगदीं स्तब्ध, निष्कंप झाले दृष्टि स्थिर आणि अर्धोन्मीलित झाली, आणि देहभान गेलें. पुन्हां देहभानावर येऊन ऐकणारांस रडूं येईल अशा काकुळतीच्या स्वरांत ते ह्मणाले " हे सख्या, माझ्यावर कृपा कर, ह्मणजे मी तुझा इमानी नोकर होईन. माझ्या **प्रियकरावर** प्रेम करण्यास तूंच शिकविलेंस."

मंडळी एकत्र गाऊं लागली. गाण्यांत राधेचें असें ह्मणणें होतें, कीं, " अग, मी यमुनातीरीं पाणी आणण्यास जाणार नाहीं. कारण, कदंबवृक्षाखालीं येतांच मला त्या माझ्या **प्रियकराची** आठवण होते."

सद्गुरु उसासा टाकून ह्मणाले " अरेरे!"

मंडळी एकत्र मोठयानें देवाचें नाम गाऊं लागली, तों सद्गुरु पुन्हां उठले आणि तुर्यावस्थेस गेले.

देहभानावर येऊन " किस्न किस्न" असें उच्चारूं लागले. आनंदभरांत त्यांनां स्पष्ट नांव उच्चारवेना! "राधे गोविंद जय, राधे गोविंदे जय," असें भजन सद्गुरूंनीं सुरू केलें. मंडळीहि तेंच गाऊं लागली. यानंतर संकीर्तन संपलें. सद्गुरु मध्यें आणि शिष्य सभोंवतीं, अशा थाटानें मंडळी नाचूं लागली.

नाचणें आणि गाणें दिवाणखान्यांत चाललें होतें. तें आटोपल्यावर सद्गुरु पश्चिमेकडील एका जवळच्या खोलींत गेले. गोपींविषयीं मला ते सांगू लागले " किती विलक्षण त्यांचा अनुराग! तमाल वृक्ष दृष्टीस पडतांच त्यांनां भक्तीचें खूळच लागलें!"

**भक्तीचें वेड.**

एक शिष्य ह्मणाला " चैतन्यदेवाची हीच स्थिति होती. आपल्या समोरील अरण्य पहातांच तें त्यांनां वृंदावन—श्रीकृष्णांची पवित्र जन्मभूमि—आहे, असें वाटलें."

सद्गुरु ह्मणाले " या प्रेमाचा एक कणहि जर कोणाला मिळाला, तर तो किती धन्य! काय भक्ति ही! गोपींनां ही पूर्ण (सोळा आणे) भक्ति प्राप्त झाली होती; इतकेंच नव्हे, तर आणखी अधिक पांच सिक्के—पांच आणे मिळाली होती. राधा आणि श्रीकृष्ण यांच्या अवतारावर कोणी विश्वास ठेवो अगर न ठेवो, त्यांत कांहीं फारसें महत्त्व नाहीं. हिंदु किंवा ख्रिस्ती लोकांप्रमाणें कोणाचा ईश्वरी अवतारावर विश्वास असेल, कोणाचा नसेल; पण देवाविषयीं असें उत्कट प्रेम असावें, अशी

**एक अत्यावश्यक गोष्ट.**

सर्वांनां आस्था असावी. हीच एक अत्यावश्यक गोष्ट आहे. जर तूं वेडा होणार तर या ऐहिक गोष्टीनें वेडा होऊं नको; पण ईश्वरी भक्तीनें वेडा हो."

पुन्हां सद्गुरु दिवाणखान्यांत येऊन बसले. शिष्य मागाहून आले. सद्गुरूं-

पवित्रता.

करितां एक तक्क्या ठेवलेला होता. त्याला स्पर्श करण्यापूर्वी ते ह्मणाले 'ॐ तत्सत्.'

संसारी मनुष्यांच्या अपवित्र स्पर्शानें तो तक्क्या दूषित झाला होता, आणि सद्गुरु तर मूर्तिमंत पवित्रताच!

बराच उशीर झाला. अद्याप जेवण वाढलेलें नव्हतें. सद्गुरु थोडेसे उतावीळ झाले. मुलाप्रमाणें वागूं लागले. यजमान सुरेंद्र हा सद्गुरूंचा प्रिय शिष्य होता.

सद्गुरु ह्मणाले "सुरेंद्राचा स्वभाव उत्कृष्ट झाला आहे. खरें बोलण्याचें धैर्य त्याच्या

देवाचीच सेवा करा.

अंगीं आहे. तसेंच तो उदार आहे. त्याची मदत मागण्याकरितां जे येतात ते कधींहि विमुख होऊन परत जात नाहींत."

नंतर सद्गुरु माझ्याकडे वळून ह्मणाले "तूं भगवानदासाकडे गेला होतास काय? तो कसा काय मनुष्य आहे?"

इतक्यांत निरंजन नांवाचा एक तरुण शिष्य आला. त्याला पाहून सद्गुरु उभे राहून ह्मणाले "आलास तूं शेवटीं!"

निरंजनला पाहून सद्गुरूंनां आनंद झाल्यासारखें वाटलें.

सद्गुरु ह्मणाले "हा तरुण फारच निष्कपटी आहे. दांभिकपणाच्या विरुद्ध

सरलता.

असलेली सरलता ही आपल्या पूर्वजन्मांतील तपांचें फल आहे. 'हे बंधो, तूं प्रभूचे चरण सोडूं नको' अशा अर्थाच्या तुळसीदासाच्या सुप्रसिद्ध पदांत 'दांभिकपण आणि कपटहि सोडून दे' असे शब्द आहेत. जेथें जेथें ईश्वरानें मानवी अवतार धारण केला आहे, तेथें तेथें सरलता हा सद्गुण तुमच्या दृष्टीस पडत नाहीं काय? रामाचा पिता दशरथ, कृष्णाचा पिता नंद यांच्याकडे पहा. ते फार निष्कपटी होते."

नंतर सद्गुरु निरंजनास ह्मणाले "संसारी लोकांप्रमाणें तूं नोकरी धरलेली

देवाची सेवा.

आहेस; पण तूं तुझ्या आईसाठीं खपत आहेस. नाहीं तर मीं ह्मटलें असतें, छी! छी! तूं ईश्वराचीच नोकरी केली पाहिजेस!"

# सप्तम परिच्छेद—अध्याय पहिला.

मणि मल्लिकाकडे पाहून सद्गुरु ह्मणाले " हा तरुण मनुष्य फारच सरळ आणि निष्कपटी आहे. फक्त आतां थोडा गप्पीदास झाला आहे, एवढेंच. परवां यानें भेटण्यास येनों ह्मणून सांगितलें होतें, पण आलाच नाहीं !"

याच शिष्याविषयीं सद्गुरु पुढें ह्मणाले " याच्या चेहऱ्यावर वाईट छटा आलेली दिसते. हें सर्व ऑफिसच्या कामामुळें होय. हिशेबाकडे आणि दुसऱ्या शेंकडों गोष्टींकडे लक्ष दिलें पाहिजे !"

**संसारी नोकरीपासून होणारा तोटा.**

भवनाथ नांवाचा दुसरा एक शिष्य माझ्याशीं बोलूं लागला. तो मला ह्मणाला " तूं बरेच दिवस सद्गुरूंकडे आला नाहींस. तुझ्या गैरहजिरीविषयीं सद्गुरु मजजवळ कुरकुरत होते, आणि आपल्याविषयीं तुझ्या ठिकाणीं अरुचि उत्पन्न झाली आहे कीं काय, असें ह्मणत होते. "

**शिष्याविषयीं काळजी.**

सद्गुरूंनीं हें ऐकिलें आणि मला प्रेमानें ह्मटलें "होय, तें खरें. तूं कां बरें आला नाहींस ?"

मी चांचरत कांहीं तरी लंगड्या सबबी सांगूं लागलों. इतक्यांत महिमाचरण आंत आला. त्याला पाहून सद्गुरु ह्मणाले " ही आपली अनपेक्षित भेट ! आमच्या या लहानशा नदींत फार झालें तर होडी यावयाची, पण ही तर एक मोठी आगबोट आली ! पण आतां वर्षाकाल आहे ह्मणा ! " सर्व हंसतात.

' उत्सवाचा आध्यात्मिक उपयोग ' या विषयाकडे नंतर भाषणाचा ओघ वळला. सद्गुरु महिमास म्हणतात " उत्सवांत लोकांनां जेवूं कां घालितात ? सर्व प्राण्यांत असलेल्या वैश्वानराला—ब्रह्माला ही आहुति आहे, असें तुला वाटत नाहीं काय ? पण दुर्जन, ईश्वराला न भिणारे, व्यभिचारी, वेश्यागामी इत्यादिकांनां केव्हांहि उत्सवांत जेवूं घालूं नये ! त्यांचीं पापें इतकीं मोठीं असतात, कीं, ते ज्या ठिकाणीं अन्न खात बसतात त्या खालची किती तरी हात जागा दूषित होते ! एकदां हृदयनें मेजवानी दिली होती. आमंत्रित लोकांपैकीं बरेच पापी होते. मीं हृदयला सांगितलें, कीं, ' हें पहा, तूं जर अशा दुष्ट लोकांनां जेवूं घालशील तर मी एकदम घर सोडून जाईन !' काय रे महिम, तूं पूर्वी पुष्कळदां मेजवानी देत होतास; आतां तुझा घरखर्च आणि इतर खर्च खात्रीनें वाढला असेल ! "

## अध्याय दुसरा.

### श्रीरामकृष्ण आणि कर्माविषयीं पाश्चिमात्य कल्पना.

प्रतापचन्द्र मुजुमदार, ब्रह्मसमाजाचा एक प्रमुख सभासद, आला. त्यानें सद्गुरूंस नमस्कार केला. अत्यंत नम्रतेनें आपलें डोकें लववून सद्गुरूंनीं त्याला परत नमस्कार केला. प्रताप म्हणाला "महाराज, मी नुकताच दार्जिलिंगला गेलों होतों."

श्रीरामकृष्ण ह्मणतात " पण या हवेच्या पालटामुळें तुझी प्रकृती सुधारलेली दिसत नाहीं ! तुला काय झालें आहे ? "

प्रताप म्हणाला " केशवाला मारणारा विकार मलाहि झाला आहे ! "

केशवाच्या चरित्राविषयीं नंतर भाषण झालें. प्रतापानें सांगितलें, कीं, " केशवाच्या अंगीं तरुणपणींहि वैराग्य होतें. तो आनंदी किंवा हंसतमुख असा क्वचित् दिसे. हिंदु कॉलेजांत शिकत असतां त्याची व सत्येंद्रनाथाची दाट मैत्री जमली, आणि अशा रीतीनें सत्येंद्रनाथाच्या पूज्य वडिलांची—देवेंद्रनाथ टागोरची ओळख झाली. केशव नेहमीं ईश्वराचें ध्यान व भक्ति करीत असे. अत्युत्कट अशा भक्तीमुळें केंव्हां केंव्हां त्याला बेशुद्धीचे झटके येत, पण ते तो आपल्या ताब्यांत ठेवी. गृहस्थाच्या आटोक्यांत धर्म आणणें—गृहस्थाला सुखानें धर्माचरण करतां येणें—हें त्याच्या जीवितांचें इतिकर्तव्य होतें."

नंतर भाषणाचा ओघ एका दक्षिणी स्त्रीकडे वळला. ती स्त्री इंग्लंडला गेली होती.

**कीर्तीची इच्छा**

तिनें ख्रिस्तीधर्म स्वीकारला, असें प्रतापानें सांगितलें "आणि या स्त्रीविषयीं आपण ऐकिलें आहे काय ?" असें सद्गुरूंस विचारलें.

सद्गुरु म्हणाले " नाहीं. पण तूं जें कांहीं सांगितलेंस त्यावरून आपलें नांव व्हावें, अशी त्या स्त्रीची इच्छा दिसते."

**अहंकार.**

नंतर मंडळीकडे वळून सद्गुरु ह्मणाले " या तऱ्हेच्या अहंकाराचा निषेध केला पाहिजे. कीर्तीच्या मागें लागलेला मोहांत सांपडतो. प्रत्येक गोष्ट त्या सर्वज्ञ परमात्म्याच्या इच्छेनुरूप घडत आहे, आणि सर्व त्याचेंच आहे, दुसऱ्या कोणाचें नाहीं, हें ते विसरतात. सुज्ञ लोक नेहमीं ह्मणतात ' हे परमेश्वरा, तूं सर्व कांहीं करितोस.' पण अज्ञ लोक ' मी सर्व करतों, मी सर्व करतों, ' असें ह्मणत असतात. गाईचा पाडा हंमा

( अहंम् मी ) हंमा असें ओरडतो. आतां या मी मी ह्मण।ऱ्या अहंकारापासून किती त्रास होतो तें पहा. प्रथम त्या पाड्याला शेतांत नेऊन नांगराला जुंपतात. उन्हांत, पावसांत सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्याला काम करावें लागतें. इतक्यानेंहि त्याचे त्रास संपत नाहींत ! खाटीक बहुशः त्याचा प्राण घेतो. त्याचें मांस खातात आणि त्याच्या त्वचेचीं कातडीं बनवून त्याचे जोडे करितात. या स्थितींत त्या पाड्याच्या त्रासाला गणती नाहीं. इतक्यानेंच भागत नाहीं ! त्या कातडीचे पडघम, तासे इत्यादि वाद्यें करितात, आणि तीं हातांनीं किंवा काठीनें झोडतात—वाजवितात. जेव्हां त्याच्या आंतड्याचे कापूस पिंजण्याचे धनुष्याचे दोर करितात, तेव्हां मात्र त्या बिचाऱ्या प्राण्याचे त्रास संपतात; आणि याचें कारण असें, कीं, तो या वेळीं 'हम्मा हम्मा' ( मी, मी, ) ह्मणत नाहीं; पण तुहुम् तुहुम् (तूं! तूं! ईश्वरा तूं !) असें ह्मणतो."

**' पाडा आणि त्याचें नशीब ' किंवा ' मी'ची गोष्ट.**

सद्गुरु पुढें ह्मणतात " देव सर्व वस्तूंचा नियामक आहे अशी ज्याची खात्री झाली आहे, आणि जो पूर्ण स्वार्थत्यागाचा किंवा ' मी माझें ' पूर्णपणें विसरण्याचा धडा शिकला आहे, त्यालाच मुक्ति मिळते. ज्यानें देवाचें दर्शन घेतलें, तोच खरा शहाणा मनुष्य. तो मुलाप्रमाणें होतो. मुलाला स्वतःचें निराळें व्यक्तित्व, भिन्नत्व आहे असें दिसतें; पण तें खरें नव्हे, नुसता भास आहे. मुलाचें व्यक्तित्व (अहंकार) पूर्ण वाढ झालेल्या मनुष्यासारखें नसतें. त्या शहाण्या मनुष्यानें देवाचें दर्शन घेतले आहे, आणि आतां तो बदललेला प्राणी आहे."

**साक्षात्कारानंतरचा अहंकार.**

सद्गुरु पुढें ह्मणतात " पोलादाची तरवार परीसाच्या स्पर्शानें तत्काळ सुवर्णाची होते. तिची नंतर तरवारीची आकृति दिसते खरी, पण ती कोणास अपाय करीत नाहीं. ईश्वरी साक्षात्कारानें पुनीत झ.लेला अहंकार कोणालाहि इजा करीत नाहीं. मुलाचा अहंकार आरशांत प्रतिबिंबित झालेल्या मुखाप्रमाणें आहे. आरशांतील मुख खऱ्या मुखाप्रमाणें दिसतें, पण तें कोणासहि दुखवीत नाहीं. ईश्वराचें दर्शन घेतलेल्या मनुष्याचीं चिन्हें अशीं आहेत. त्याची वर्तणूक मुलाप्रमाणें असते. तो अपवित्र प्राणी आहे असें केव्हां केव्हां दिसतें. तो आपल्या देहाची काळजी बाळगीत नाहीं. पवित्रता आणि अपवित्रता यांमध्यें तो भेद करीत नाहीं. घटकेंत

**ईश्वरी साक्षात्काराचीं चिन्हें.**

हंसणाऱ्या, घट ंत रडणाऱ्या, आणि घटकेंत आपल्याशींच बोलणाऱ्या, केव्हां केव्हां सभ्य गृहस्थासारखा पोशाख करणाऱ्या, आणि केव्हां केव्हां आपली लंगोटी खाकेंत घालून मुलाप्रमाणें नग्न हिंडणाऱ्या अशा वेड्याप्रमाणें तो दिसतो. तो एकाद्या अजाण, बुद्धिहीन प्राण्याप्रमाणें जडवत् दिसतो."

**इंग्लंड आणि अमेरिका.**

सद्गुरु प्रतापास ह्मणतात "तूं इंग्लंड आणि अमेरिका येथें गेला होतास; तुझा अनुभव मला सांग पाहूं."

प्रताप ह्मणाला "इंग्रज लोकांचें राष्ट्रीय लक्षण एका शब्दांत सांगतां येईल, व तें आपण ज्याला कांचन ( सुवर्ण ) ह्मणतां त्याची पूजा होय ! याला कांहीं लोक अपवाद आहेत, तरीपण साधारणपणें जेथें तेथें रजोगुण–ऐहिक कर्मवृत्ति दिसून येते. अमेरिकेंतहि ह्याच प्रकार आहे !"

**आसक्तिरहित कर्म.**

यावर सद्गुरु ह्मणतात "इंग्रज आणि अमेरिकन लोकांचें मुख्य लक्षण 'कर्म–प्रवृत्ति' आहे असें तूं सांगितलेंस, तोच प्रकार सर्व मानवी समाजांत आढळून येतो. पण ही आयुष्यांतील खालची पायरी होय, हें लक्षांत ठेव. आपल्या ऐहिक हिताकरितां–पैसा, कीर्ति, मान यांकरितां केलेलें कर्म नीच (हलकें) आहे. रजोगुण अज्ञान वाढविणारा आहे. हा देवाचा विसर पाडील, आणि कनककांता यांची आसक्ति जडवील. ह्मणून, इंग्लंड आणि अमेरिका येथें दिसून येणाऱ्या आणि आध्यात्मिक अवनति करणाऱ्या कर्मांच्या आसक्तीला निषेध केला पाहिजे. कर्म तर कोणालाहि टाळतां यावयाचें नाहीं. कारण, प्रकृति कर्म करावयास लावितेच. अशी स्थिति असल्यानें कर्म योग्य रीतीनें करावें. अनासक्तपणें केलेलें कर्म ईश्वराप्रत नेईल; असें कर्म हें साधन होय, आणि ईश्वर साध्य होय. अनासक्तपणें कर्म करणें ह्मणजे फळाची आशा न धरितां किंवा या अगर परलोकीं शिक्षेची भीति न बाळगतां, कर्म करणें होय. या कलियुगांत अनासक्तपणें कर्म करणें फार कठिण आहे. खरें पाहिलें, तर प्रत्येकाला ज्ञान आणि भक्ति पाहिजे.

**या युगांत हें फार कठिण आहे.**

अनासक्तपणें कर्म करून आयुष्य घालविणें हें फक्त उच्च आदर्शरूप मनुष्यासच शक्य आहे. बाकी इतर लोक कमी अधिक प्रमाणांत ऐहिक गोष्टींशीं नकळत आसक्त होतात."

# सप्तम परिच्छेद–अध्याय दुसरा.

सद्गुरु पुढें ह्मणतात "ह्मणून अपूर्ण अशा आह्मां मानवांचें कर्तव्य, आमचें ध्येय जो ईश्वर त्याप्रत नेणारा सोपा आणि जवळचा मार्ग शोधून काढणें, हें होय. आमचें आद्यतम कर्तव्य आह्मी प्रथम करूंया. ईश्वराची खरी भक्ति करून त्याला शरण जाऊन आमचें कर्म होतां होईल तितकें कमी करूं या. आसक्तिरहित कर्ममार्ग फार कठिण असल्यामुळें भक्तिमार्ग–प्रार्थना, प्रेम, भक्ति–नारदीय भक्तियोग हाच या युगामध्यें मार्ग सांगितला आहे. हा कर्ममार्ग किंवा ज्ञानमार्ग यापेक्षां या युगीं अधिक पसंत आहे. दुसऱ्या कोणत्याहि मार्गापेक्षां भक्तिमार्गानेंच देव आह्मांला फार कमी त्रासानें दृष्टीस पडेल. कर्म तर कोणालाहि टाळतां येणार नाहीं. मनाची प्रत्येक क्रिया हें कर्मच आहे. 'मला वाटतें, मी विचार करतों,' ही जाणीव–ज्ञान कर्मच आहे. कर्माशीं भक्तिमार्गाचा संबंध असा आहे, कीं, भक्तीनें–प्रेमानें कर्म सुलभ होत जातें."

**प्रश्नाचा या युगा-कारितां निकाल.**

**भक्तीचा कर्मावर परिणाम.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "प्रथम भक्तीनें, आपल्या ध्येयाकडे–ईश्वराकडे सर्व लक्ष लाविल्यामुळें कर्म कमी होत जातें. दुसरी गोष्ट अशी, कीं, भक्तीमुळें अनासक्तकर्म करण्यास मदत होते. एकाच वेळीं ईश्वरावर प्रेम करणें आणि पैसा, सुखें, कीर्ति, सत्ता यांच्यावर प्रेम करणें शक्य नाहीं. शर्करामिश्रित पेयाची ज्यानें रुचि घेतलेली आहे, तो काकवी मिसळलेल्या पेयाची पर्वा करणार नाहीं! कर्म हेंच मानवी जीविताचें इतिकर्तव्य आहे असें मानणें, यासारखी दुसरी मोठी चूक नाहीं. कर्म हा मानवी जीविताचा पहिला अध्याय आहे; ईश्वर हा शेवट होय. एकदां एक गृहस्थ–शंभू मला ह्मणाला 'मला जर दवाखाने आणि हास्पीटलें बांधतां येतील, रस्ते नाहीत तेथें नवे रस्ते करतां येतील, अवर्षणाच्या वेळीं लोकोपयोगाकरितां विहिरी खोदतां येतील, शाळा–कॉलेजें स्थापन करतां येतील, तर मी स्वतःला मोठा भाग्यवान् समजेन!' यावर मीं ह्मटलें, 'तूं हीं कामें करावींस, हें फार चांगलें; पण तुला तीं अनासक्त राहून करतां येतील काय? तसें असेल तर तीं तुला ईश्वराप्रत नेतील; नसेल तर नेणार नाहींत. पण अनासक्तपणें कर्म कठिण आहे. कसेंहि असो, साध्य आणि साधन यांचा घोटाळा करूं नकोस. अनासक्तपणें केलेलें कर्म हें साधन, पण आयुष्यांतील साध्य ईश्वर होय. साध्य-साधन यांचा घोटाळा करूं नको, मार्गावरील पहिला मुक्काम शेवटचा मानूं नको, हें मी तुला पुन्हां सांगतों. छे, कर्म आयुष्यांतील इतिकर्तव्य आहे, जीविताचें

**कर्म हें जीविताचें इतिकर्तव्य नव्हे!**

साफल्य आहे, असें मानूं नकोस. समज, कीं, तुझ्या नशीबानें तुला देवाचें दर्शन झालें, मग तूं काय मागशील? हास्पीटलें, दवाखाने, तळीं व विहिरी, रस्ते आणि धर्मशाळा यांकरितांच तूं प्रार्थना करिशील? छे, छे, जोंपर्यंत आम्हांला देवदर्शन झालें नाहीं, तोंपर्यंत या सर्व गोष्टी सत्य आहेत; पण एकदां का आम्ही देवासमोर गेलों, कीं, त्या सर्वांचें खरें स्वरूप क्षणभंगुर आणि स्वप्नवत् आहे हें आम्हांला दिसतें. नंतर अधिक प्रकाश, अधिक ज्ञान आणि अधिक भक्ति—ज्या भक्तीनें आम्ही मनुष्याचे ईश्वर होतों आणि त्या सच्चिदानंद प्रभूचे खरेखुरे पुत्र आहोंत अशी खात्री पटते, अशी भक्ति मिळावी अशी प्रार्थना आम्हीं करावी."

**भक्तीकरितां प्रार्थना.**

सद्गुरु पुढें ह्मणतात "एक मनुष्य जंगलांत लांकडें तोडीत होता. त्याला एक तपस्वी भेटला. त्यानें त्याला ह्मटलें, कीं, 'पुढें जा!' डोक्यावर मोळी घेऊन लांकूडतोड्या घरीं आला. त्या साधूनें 'पुढें जा' असें आपल्याला कां सांगितलें, याचें त्याला आश्चर्य वाटलें. यानंतर कांहीं दिवस गेले. एके दिवशीं त्याच्या लक्षांत हे साधूचे शब्द आले आणि लांकडें तोडण्यासाठीं त्या दिवशीं पुढें जाण्याचा त्यानें निश्चय केला. पुढें जातो, तों त्याला चंदनवृक्षाचें दाट अरण्य लागलें. त्यानें चंदनाच्या लांकडांच्या गाड्या बाजारांत आणिल्या, आणि त्या विकून तो श्रीमंत झाला. यानंतर आणखी कांहीं दिवस गेले. पुन्हां त्याला त्या साधूचे शब्द आठवले, आणखी त्याप्रमाणें त्यानें पुढें जाण्याचें मनांत आणलें; आणि त्याप्रमाणें जाऊन पाहतो, तों नदीच्या पात्राला लागून त्याला एक रुप्याची खाण लागली. अशी खाण सांपडेल असें त्याला स्वप्नांतहि खरें वाटलें नसतें. त्यानें खाणींत काम करून बरेंच रुपे बाजारांत आणून त्याचा सौदा केला आणि त्यामुळें तो लक्षाधीश बनला. कांहीं वर्षांनीं पुन्हां त्या साधूचे शब्द त्याला आठवले. तो आपल्याशींच विचार करूं लागला, कीं, या रुप्याच्या खाणीकडेच थांबावें, असें त्या साधूनें सांगितलें नाहीं; पण 'पुढें जा!' असें सांगितलें आहे. या खेपेस तो नदी ओलांडून पुढें गेला आणि त्याला सोन्याची, नंतर रत्नांची खाण सांपडली. तो कुबेराप्रमाणें श्रीमंत झाला, हें सांगणें नकोच."

**लांकुडतोड्या आणि तपस्वी यांची गोष्ट. किंवा पुढें जा.**

**सद्गुरु पुढें ह्मणाले** "याकरितां माझ्या मुलांनों, पुढें चला व आपलें ध्येय कधींहि विसरूं नका. पुढें चला आणि शेवटास—ध्येयास पोहोंचेपर्यंत थांबूं नका. एकाद्या

मुक्कामाला गेलों ह्मणजे प्रवासाच्या शेवटच्या मुक्कामाला गेलों अशी खोटी समजूत करून घेऊं नका. कर्म प्रवासाचा पहिला मुक्काम आहे. अनासक्त पणें कर्म करणें फार कठिण आहे. ह्मणून या युगांत भक्तिमार्ग हा अधिक योग्य आहे. अनासक्तपणें केलेलें कर्म हें साध्य नसून साध्याचें साधन आहे, हें ध्यानांत ठेवा. ह्मणून 'पुढें चला' आणि तुमच्या जीविताचें ध्येय–ईश्वरदर्शन गांठेपर्यंत वाटेंत थांबू नका!"

---

## अध्याय तिसरा.

### श्रीरामकृष्ण, ब्रह्मसमाज व एक अत्यावश्यक गोष्ट.

'केशवाच्या निधनानंतर ब्रह्मसमाजामध्यें झालेली फूट' हा नंतर भाषणाचा विषय होता.

**ब्रह्मसमाजांतील भेद.**

सद्गुरु प्रतापास ह्मणाले "तुझ्यामध्यें आणि इतर सभासदांमध्यें मतभेद आहे, असें मी ऐकतों. तुझ्याविरुद्ध मला तर हरे, प्याला आणि पंचा (साधारण लोक) दिसतात."

दिव्य आनंदानें मुखाला प्रकाशित करणारें असें एक मदहास्य करून प्रतापाकडे बोट दाखवून सद्गुरु हजर असलेल्या मंडळीला ह्मणाले "अमृत, प्रताप इत्यादि शंख बराच मोठा ध्वनि करितात; पण शखांत अनेक प्रकार आहेत. दुसरे कित्येक आहेत ते ध्वनि करीत नाहींत; ते एकहि आवाज करीत नाहींत." सर्व मंडळी पोट धरभरून हसते.

**रसो वै सः**

ब्रह्मसभा, हरिसभा यांच्या सभासदांच्या व्याख्यानांविषयीं बोलतांना सद्गुरु ह्मणाले 'व्याख्यात्यांच्या व्याख्यानांवरूनच त्यांची परीक्षा कोणालाहि करतां येते. एक गृहस्थ (एस.) एका हरिसभेचा अध्यक्ष या नात्यानें व्याख्यान देत होते. व्याख्यानांत ते ह्मणाले 'परमेश्वर अगदीं रसविरहित आहे, तेव्हां आम्हीं आमच्या स्वभावांतील रस देऊन त्याला मधुर केलें पाहिजे.' रस, मधुरता याचा अर्थ, प्रेम आणि दुसरे दिव्य गुणधर्म, असा त्यांनीं केला. मी हें जेव्हां ऐकिलें, तेव्हां आपल्या मामाच्या घरीं पुष्कळ घोडे आहेत ह्मणून सांगणाऱ्या मुलाची गोष्ट मला आठवली; त्या मुलानें 'आपल्या मामाचा सबंध गोठा भरून घोडे आहेत!' असें सांगितलें, आणि श्रोत्यांची खात्री करण्याचा प्रयत्न केला. गोठयांत घोडे बांधीत नाहींत, मुलानें कांहींतरी गप्प ठोकून दिली आहे, आणि त्याला घोड्याची फारशी माहिती किंवा अनुभव नाहीं, असें चतुर श्रोत्यांनीं तेव्हांच ताडलें.

देव रस, प्रेम, आनंद इत्यादि धर्मविरहित आहे असें विधान करणें, ह्मणजे निवळ वेडेपणा आहे. यानें आपण काय बोलतों आहों हें स्वतःस माहीत नाहीं, आणि अखंड प्रेम, ज्ञान, आनंद यांचा झरा जो परमेश्वर त्याचा आपण केव्हांहि साक्षात्कार घेतला नाहीं, असें त्यानें सिद्ध करून दिलें."

**भक्ति आणि त्याग.**

सद्गुरु एकदम गंभीर होऊन प्रतापाकडे वळून ह्मणतात "तूं सुशिक्षित आणि चतुर आहेस. तूं मनानें हलका नसून गंभीर आणि खोल आहेस. गौर ( चैतन्य ) आणि नित्य यांच्याप्रमाणें केशव आणि तूं बंधु होतां. या जगाचा—व्याख्यानें, वादविवाद, मतभेद इत्यादिकांचा तूं बराच अनुभव घेतला आहेस, नाहीं काय ? तुझ्या आत्म्याला याचा आतां कंटाळा आला असेल. आतां तुझा एकच उद्देश–देवाकडेसच सर्व लक्ष लागणें, त्याच्या अगाध प्रेमसागरांत उडी ठोकणें, बुडी देणें, हाच असण्याची वेळ आली आहे. "

प्रताप ह्मणाला " होय महाराज. हीच एक अत्यंत जरूरीची गोष्ट आहे, यांत कांहीं संशय नाही. केशवाचें काम जिवंत ठेवावें, इतकाच माझा प्रयत्न आहे."

सद्गुरु हंसत ह्मणतात " केशवाचें काम चालू ठेवावें, असें तुझें खरोखर ह्मणणे आहे ना ? बरें, थोडे दिवस वाट पहा, ह्मणजे तुझें मत निराळें होईल ! "

**मनुष्याचा भ्रम. स्वार्थ व परार्थ यांचा घोटाळा.**

सद्गुरु पुढें ह्मणाले " एका खडकावर बांधलेल्या झोंपडींत एक मनुष्य सुखानें राहत असे. ती झोंपडी बांधण्यासाठीं त्याला फार श्रम करावे लागले. कांहीं दिवसांनंतर भलें मोठें वादळ आलें. झोंपडी पायासकट हालूं लागली. ती बचावण्याच्या हेतूनें त्यानें मरुद्देवाची प्रार्थना चालविली. ' हे देवा, कृपा करून माझी झोंपडी पाडवूं नको ! ' देवानें हे ऐकिलें नाही, आणि झोंपडी मोडून पडूं लागली. इतक्यांत मरुताचा पुत्र हनुमान् असें त्याला सुचलें, आणि त्यानें प्रार्थना सुरू केली, कीं, ' हे पित्या, झोंपडी मोडून घालूं नको. कारण तिचा मालक तुझा पुत्र हनुमान् हाच आहे.' पण वादळ कांहीं कमी होईना. खुद्द हनुमानाची झोंपडी असें तो पुष्कळदां ओरडला, पण व्यर्थ. झोंपडी पडण्याच्या रंगांत आली. तेव्हां त्यानें पुन्हा नवीन प्रार्थना केली ' हे देवा, ही लक्ष्मणाची, ईश्वरी अवतार रामचंद्र याच्या भावाची झोंपडी, तिचा बचाव कर !' हनुमानाच्या नांवाप्रमाणें लक्ष्मण नांवाचीहि मात्रा चालेना, आणि झोंपडी पडण्याची थांबेना.

## सप्तम परिच्छेद–अध्याय तिसरा.

शेवटीं तो मनुष्य ओरडला, कीं, ‘ हे मरुद्देवा, ही रामाची झोंपडी ! तिचा बचाव कर. खुद्द रामाची झोंपडी !’ पाषाणहृदय असा तो मरुद्दे कांहीं केल्या ऐकेना, आणि झोंपडी करकर मोडूं लागली. आपल्या सर्व प्रार्थना व्यर्थ गेल्या हें पाहून तो मनुष्य झोंपडीबाहेर आला आणि ओरडला ‘याचा सत्यानाश, तळपट होवो, ही भुताची खोपटी !’’ सर्व खोखो हंसतात.

सद्गुरु प्रतापास पुढें ह्मणतात “ केशवाचें नांव राखण्यासाठीं तूं उत्सुक असशील. केशवाचा संबंध असलेली धार्मिक संस्था ईश्वराच्या इच्छेनेंच स्थापिली गेली. आणि जर तिचा कांहीं गौरव झाला असेल, तर तेंसुद्धां त्याच्या इच्छेमुळेंच होय, अशा विचारानें तूं आपलें समाधान मानून घे. याकरितां आनंदसागरांत खोल बुडी मार.’’

यानतर सद्गुरु गाऊं लागले.

डुब डुब डुब रूपसागरे आमार मन ।
तलातल पाताल खुंजले पाबि रे प्रेम रत्न धन ॥
खुंज खुंज खुंज खुंजले पाबि हृदय माझे वृन्दावन ।
दीप् दीप् दीप् ज्ञानेर वाति, हृदे ज्वलबे अनुक्षण ॥
ड्याङ् ड्याङ् ड्याङ् ड्यांगाय डिंगे चालाय आबारसे कोन्‌जन ।
कुबीर बले शोन् शोन् शोन् भाव गुरुर श्रीचरण ॥

सद्गुरु पुढें ह्मणाले “ भिऊं नका, तो अमृतोदधि आहे. मी एकदां नरेंद्राला ह्मटलें, कीं—’’

**भिऊं नका.**

प्रताप मध्येंच ह्मणतो “ हा नरेंद्र कोण ? ’’

सद्गुरु ह्मणाले “ त्या नांवाचा एक तरुण मनुष्य आहे. बरें, तें असो. मीं त्याला ह्मटलें ‘देव हा गोड जलाचा उदधि आहे. माझ्या बाबा, अशी कल्पना कर, कीं, साखरेचा रस असलेलें असें एक रुंद भांडें आहे, आणि त्यांतील मधुर रस चाखणारी अशी तूं माशी आहेस. तूं कुठें बसून पिशील ?’ नरेंद्रानें उत्तर दिलें ‘ मी भांड्याच्या कांठावर बसून प्राशन करीन.’ आणि तो असेंहि ह्मणाला, कीं, ‘आपण आपल्या खोलीच्या आंत गेलों तर बुडून मरूं.’ त्यानंतर मीं त्याला ह्मटलें ‘ बेटा, जर तूं दिव्योदधींत बुड्या मारशील तर तुला मृत्यूची किंवा दुसऱ्या संकटाची भीति नाहीं हें तूं विसरतोस. दिव्योदधि अमृतोदधि आहे

हें ध्यानांत ठेव. या उदधीच्या रसानें मरण केव्हांहि येत नाहीं. उलट अमरत्व प्राप्त होतें. **देवाची भक्ति करतांना आपण ' अति ' करूं असें कांहीं वेडगळ मनुष्यासारखें भिऊं नको.** " *

सद्गुरु पुढें ह्मणाले " दया आणि माया यांत भेद काय ? दया ह्मणजे सर्वांवर प्रेम, आपल्या स्वतःपुरतें, स्वतःचें कुटुंब, पंथ किंवा देश यापुरतें नव्हे. माया ह्मणजे स्वतःवर, स्वतःचें कुटुंब किंवा पंथ, देश यांवरील प्रेम. पहिलें प्रेम उन्नतिकारक असून देवाप्रत नेणारें आहे, आणि दुसरें आत्मविघातक असून तुह्मांला खालीं ओढणारें आहे."

**दया, माया किंवा एकदेशित्व.**

सद्गुरु पुढें ह्मणतात " उच्च ज्ञान ह्मणजे काय ? शहाणा मनुष्य ह्मणतो. ' हे ईश्वरा, तूं या विश्वांत एकटा कर्ता आहेस, मी तुझ्या हातांतील एक क्षुद्र लहानसें साधन आहें. पुन्हां माझें कांहीं नाहीं. सर्व तुझें आहे. मी, माझें कुटुंब, माझी संपत्ति, माझे सद्गुण, हें सर्व तुझें आहे.' ' तूं, तुझें ' हें ज्ञान; ' मी, माझें ' हें अज्ञान."

**खऱ्या ज्ञानाचें फळ.**

सद्गुरु पुढें ह्मणतात " भक्तीवांचून कर्माला या युगांत उभें राहण्यास पाय नाहींत. प्रथम भक्ति वाढवा. बाकी इतर वस्तु, शाळा, दवाखाने इत्यादि हवे असल्यास तुह्मांला प्राप्त होतील. प्रथम भक्ति नंतर कर्म. भक्ति किंवा प्रेम याविरहित कर्म पंगू आहे. "

**धार्मिक आणि इतर कृत्यें.**

प्रतापनें शिष्यांविषयीं चौकशी केली. सद्गुरूंकडे येणाऱ्या शिष्यांची दिवसेंदिवस आत्मोन्नति होत आहे किंवा नाहीं, असें त्यानें विचारलें.

यावर सद्गुरु ह्मणाले " जगांत कसें रहावें हें शिकविण्याकरितां मी त्यांच्यापुढें मोलकरिणीची किंवा दाईची वागणूक हें ध्येय ठेवितों. मोलकरीण आपल्या यजमानाच्या घराविषयीं ह्मणते ' हें माझें घर !' पण तिला माहीत असतें, कीं,

---

* या ठिकाणीं ज्ञानेश्वरांच्या पुढील ओंवीची आठवण होते:—

**हां गा समुद्र अमृताचा भरला । आणि अवसांत वरपडा झाला ॥**
**मग कोणीही आथि त्रोसंडिला । बुडिजेल ह्मणोनि ॥**

भावार्थदीपिका, अ. ११ ओं. ६२४.

हें आपलें घर नव्हे. तिच घर दूर एका खेडयांत असतें तिचे सर्व विचार त्या आपल्या खेडयांतील घराविषयीं असतात. आपल्या हातां-तील यजमानाच्या मुलाविषयीं बोलतांना ती ह्मणते 'माझा हरि वाईट झाला आहे; माझ्या हरीला हें खाण्यास पाहिजे, तें खाण्यास पाहिजे,' इत्यादि. पण तिला पक्कें माहीत असतें, कीं, हरि कांहीं आपला नव्हे. मजकडे येणारांनां या मोलकरिणीप्रमाणें अनासक्तपणें आयुष्य काढावें, असें मी सांगतों. या जगाशीं आसक्त राहूं नये. संसारांत रहावें पण संसारी होऊं नये. ज्या ठिकाणाहून आह्मी येतों तें आमचें घर–देव–यावर मन लावावें, असा मी त्यांनां उपदेश करतों. देवाची भक्ति मिळावी ह्मणून प्रार्थना करा, ह्मणजे वर सांगितल्याप्रमाणें तुह्मांला राहतां येईल, असें मी त्यांनां सांगतों."

**कसें रहावें? गृहस्थाच्या या प्रश्नाचा उलगडा.**

कांहीं वेळानंतर युरोप आणि अमेरिका येथील अज्ञेयवादावर भाषणाचा ओघ फिरला. प्रतापचंद्र मुजुमदार ह्मणाला "ते लोक कांहींहि सांगोत, पण त्यांपैकीं कोणीहि अंतःकरणानें नास्तिक नाहीं, असें दिसतें. या विश्वाच्या मागें एक अज्ञेयशक्ति आहे, असें युरोपियन विद्वान् कबूल करितात."

**युरोप आणि अमेरिका येथील अज्ञेयवाद.**

सद्गुरु ह्मणतात "विश्वाचें नियमन करणाऱ्या शक्तीवर त्यांचा विश्वास असल्यास बस आहे."

प्रताप ह्मणतो "विश्वांत नीतीचें साम्राज्य आहे हेंहि ते कबूल करितात."

प्रताप निरोप घेण्यासाठीं उठला, तेव्हां सद्गुरु त्याला ह्मणतात "मी आतां काय बोलूं? आतां तूं वादविवाद, मतभेद, फूट इत्यादि गोष्टींशीं कांहीं संबंध न ठेवणें हें बरें. कांता आणि कनक हीं आह्मांला संसारांत बुडवून ठेवितात आणि ईश्वरापासून दूर नेतात. आपली पत्नी चांगली, मध्यम, वाईट कशीहि असो, तिची प्रत्येक जण स्तुतिच करतो, हें फार विलक्षण आहे."

**त्याग–शेवटची विनंति.**

नंतर प्रतापचंद्र मुजुमदार गेले.

# अष्टम परिच्छेद.

## एका विद्वान् हिंदु उपदेशकाची भेट.

### १८८४.

### अध्याय पहिला.

[ **स्थळ**—कॉलेज स्ट्रीट, कलकत्ता. वेळ—रथयात्रा, २५ जून १८८४. आषाढ शु. २, या सायंकाळचे ४ ते ६॥ पर्यंत.]

### सद्गुरु—समाधि.

पंडित शशधर तर्कचूडामणि रहात होते त्या घरीं जाण्याकरितां श्रीरामकृष्ण जेव्हां गाडींत बसले, तेव्हां त्यांची पुन्हां समाधि लागली. समाधीच्या निश्चल व आनंदमय अवस्थेमध्यें त्यांचें देहभान नाहींसें होऊन ते पूर्ण ईश्वरमय बनून जात. या स्थितीस ते आपला '**आवेश**' असें ह्मणत. या अवस्थेमध्यें योगी इंद्रियातीत अशा स्थितींत असतो.

सायंकाळचे चार वाजण्याची वेळ. ईशनच्या घराहून श्रीरामकृष्ण निघतेवेळीं पावसाची बुरबुर येत होती. रस्त्यांत चिखल झाला होता. शिष्यगण गाडीमागून पायींच चालत होता. सर्व शिष्य या मौजेच्या भेटीच्या प्रसंगीं शक्य ती मदत करण्यास तयार होते. रथयात्रेचा दिवस असल्यामुळें वाटेंत मुलें खेळत होतीं, व नारळीच्या पानाचीं शिंगें वाजवीत होतीं. सद्गुरूंची गाडी दरवाज्यापाशीं येतांच घरांतील मंडळीनें त्यांचें चांगलें स्वागत केलें.

जिन्यावर· चढतांना. शशधर सामोरे आले. हे वर्णानें गोरे, पंचेचाळीस पन्नास वर्षें वयाचे, असे दिसले. त्यांच्या गळयांत रुद्राक्षांची माला होती. मोठया अदबीनें पुढें येऊन· त्यांनीं सद्गुरूंनां प्रणाम केला, आणि मुद्दाम सुशोभित केलेल्या एका मोठया दिवाणखान्यांत त्यांनां नेलें, त्यांच्यामागून सर्व शिष्य आणि

# अष्टम परिच्छेद—अध्याय पहिला.

इतर लोक आंत आले व जवळ बसले. शिष्यमंडळीमध्यें, नरेंद्र, महेन्द्र, राखाल आणि राम हे हजर होते.

सद्गुरु अर्ध्यामुर्ध्या समाधिअवस्थेंत हंसत आणि मोठया खुषींत येऊन ह्मणाले "उत्तम, वाहवा, कसलीं व्याख्यानें आपण देत असतां ?"

शशधर ह्मणाले "महाराज, धर्मशास्त्रांतील तत्वांचाच मी उपदेश करितों."

सद्गुरु ह्मणाले "या कलियुगांत, प्रेम, भक्ति आणि पूर्ण आत्मसमर्पण—ह्मणजे नारदप्रणीत भक्ति—या मार्गानेंच ईश्वरप्राप्ति करून घ्यावी, असें सांगितलें आहे. शास्त्रांत सांगितलेलीं सर्व कर्मे करण्यास मनुष्यास वेळ क्वचित्‌च मिळतो. ताप आला असतां दशमूलांचा काढा हें औषध हल्लीं कोणीहि घेत नाहीं, हें आपण पहात नाहीं काय ? काढा तयार होऊन तो लागू पडेपर्यंत रोगी मरून जातो. तापावरील रामबाण औषध—फिव्हर मिक्श्चर—घेण्याची वहिवाट आतां पडून गेली आहे. हें पहा, लोकांनां पाहिजे तर कर्मकांडाचा उपदेश करा, पण त्यांत निरुपयोगी व घोंटाळयाचा भाग वगळून मुख्य महत्त्वाचा भाग काय आहे हें सांगा. संध्या आणि त्याप्रमाणें लांब लांब आह्निक कर्में करण्याचा त्रास घेऊं नका, छोटासा गायत्रीमंत्र जपल्यास बस्स आहे, असें मी लोकांनां सांगतों."

**कर्ममार्ग नव्हे—तर भक्तिमार्ग.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "ईशानसारखे कर्मी फार थोडे असतात. अशा लोकांनांच शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें कर्मकांडानुरूप पूर्णपणें आपलें वर्तन ठेवण्याविषयीं पाहिजे तर तूं उपदेश कर. संसारामध्यें पूर्णपणें गढून गेलेल्या लोकांवर आपल्यासारख्या उपदेशकांचा कांहीं परिणाम होत नाहीं. दगडामध्यें खिळे ठोकणें शक्य आहे काय ? तशा तऱ्हेचा कोणी प्रयत्न करूं लागला, तर दगडावर कांहीं परिणाम होण्याऐवजीं खिळयांचीं डोकींच मोडून जाण्यांचा अधिक संभव आहे. सुसरीच्या पाठीवर तरवार किंवा भाला यांनीं व्यर्थ प्रहार करण्यांत काय अर्थ आहे ? हिंदुस्थानांतील सर्व तीर्थांनां—चतुर्धामाला संन्याशाचा भोंपळयाचा कमंडलु नेला जातो; पण तो नेहमींप्रमाणें कडूच राहतो. ह्मणून मी ह्मणतों, अशा लोकांनां तुझ्या व्याख्यानांचा कांहीं उपयोग नाहीं. व्याख्यानें ऐकूनहि संसारी ते संसारीच राहणार !"

**संसारी जनांवर उपदेशाचा परिणाम.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "पण मी खात्रीनें सांगतों, कीं, आपणहि अनुभवानें अधिकाधिक शहाणे होत जाल. वासराला आपल्या पायांवर उभें राहतां येत नाहीं. तें प्रथम पायांवर उभें रहावयास जातें, तोंच खालीं पडतें; पण याच रीतीनें तें उभें राहण्यास व चालण्यास शिकतें. संसारी कोण व मुमुक्षु कोण हें ओळखतां न येणें हा कांहीं आपला दोष नव्हे. तुफानाचा वारा सुटला ह्मणजे धूळ उडून वादळ होतें आणि अमुक वृक्ष कोणता (ह्मणजे हा आंब्याचा किंवा चिंचेचा वृक्ष आहे) हें ओळखणें कठिण जातें. तुझ्यामध्येंहि आतां प्रथमच अनुरागाचा वारा जोरानें वाहूं लागला आहे. यामुळें संसारी व मुमुक्षु कोण, हें तुला ओळखतां येत नाहींत. ते सर्व तुला सारखेच दिसतात. ज्यानें ईश्वर पाहिला आहे, ज्यानें ईश्वराचा साक्षात्कार घेतला आहे, त्यालाच सर्व कर्मांचा त्याग शक्य आहे. प्रश्न असा आहे, कीं, संध्या आणि इतर आन्हिक हीं कुठपर्यंत करावींत ? याचें उत्तर हें आहे, कीं, ईश्वराचें पवित्र नाम घेतांच जर डोळ्यांत अश्रु आणि अंगावर रोमांच आले, तर या सर्व आन्हिकांची मुदत संपली, असें समजावें."

**अनुभवानें उपदेशक शहाणे होतात.**

**प्रथम अनुरागाचा विवेकावर परिणाम.**

**कर्मत्याग व साक्षात्कार.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "'ॐ राम' असें ह्मणतांच जर एकदम डोळ्यांत प्रेमाश्रु आले, तर पक्कें समाजा, कीं, तुमच्या कर्मांची मुदत संपली. नंतर तुह्मांला संध्यादि सर्व आन्हिक सोडून देण्यास पूर्ण मुभा आहे. कर्मकांडाच्या पलीकडे तुह्मी गेलां. फलांचा आगम झाला, कीं, मोहोर आपोआप झडून पडतो. ईश्वराचा साक्षात्कार करून देणारी भक्ति हें फल आहे, आणि कर्म हें मोहोर आहे. घरीं सून गरोदर असली ह्मणजे दिवसेंदिवस तिचें गृहकृत्य कमी कमी होत जाईल अशी सासू काळजी घेते. नववा महिना भरतांच तिचें सर्व काम बंद होतेंच. संध्येचें पर्यवसान गायत्रीमंत्रांत होतें. गायत्रीचें पर्यवसान अव्यक्त आणि अमर्याद अशा ब्रह्माचें वाच्य जो वेदांतील ओंकार, त्यांत होतें. ओंकाराचें पर्यवसान समाधींत ( दिव्य-जाणीवेंत ) होतें."

सद्गुरु पुढें ह्मणाले "घंटानाद या अवस्थांचें सूचक चिन्ह आहे. डॉंग् डॉंग् असा नाद क्रमशः अनंतांत मिळून लय पावतो. योग्यांनां अनुभवास आलेला

# अष्टम परिच्छेद–अध्याय पहिला.

नादवेद अव्यक्तापासून उत्पन्न होऊन अव्यक्तांत लीन होतो, याचें घंटानाद हें चिन्ह आहे. त्याचप्रमाणें संध्यादि कर्मांचा शेवट अखेरीस समाधींत होतो. ईश्वराचा साक्षात्कार होऊं लागला ह्मणजे कर्म कमी कमी होत जातें."

समाधि.

समाधीविषयीं सद्गुरु बोलत होते आणि त्यांच्या वृत्तींत एकदम विलक्षण फरक पडत चालला होता. त्यांच्या गोड व प्रफुल्लित चेहऱ्यावर एक प्रकारची दिव्य प्रसन्नता दिसूं लागली. त्यांचें सर्व देहभान हारपलें. कांहीं वेळ या स्थितींत राहिल्यानंतर ते नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें थोडेंसें पाणी मागूं लागले. पाणी मागणें ह्मणजे सद्गुरु समाधींतून देहभानावर आल्याची बिनचूक खूण होती.

सद्गुरु नंतर बोलूं लागले "हे माते, तूंच ईश्वर विद्यासागराची मला भेट करून दिलीस. मीं पुन्हां तुला सांगितलें, कीं, 'एका पंडितास भेटण्याची माझी इच्छा आहे,' आणि तूं माझी प्रार्थना ऐकून घेतलीस."

अभ्यासाची आवश्यकता.

शशधरकडे वळून सद्गुरु ह्मणाले "बेटा, तूं आपलें बल अद्याप अधिक वाढविले पाहिजेस. आणखी कांहीं दिवस तूं भक्तीचें साधवाढीव. तूं झाडावर कुठें चढला नाहींस तोंच त्या झाडाच्या उंच टोंकावरील फळाच्या घोंसाला एकदम हात घालावा अशी तुझी हांव! त्यांतल्या त्यांत तुझें वर्तन, दुसऱ्यांचे हित साधावें या सद्धेतूनें प्रेरित झालें आहे, ही फार चांगली गोष्ट आहे."

विवेकरहित पांडित्य.

यानंतर शशधरला नमस्कार करून सद्गुरु पुन्हां बोलले, कीं, "मीं जेव्हां प्रथम तुझें नांव ऐकिलें, तेव्हां मीं लोकांपाशीं चौकशी केली, कीं, हे पंडित नुसते विद्वान् आहेत किंवा यांनां आत्मानात्मविवेक होऊन जगाचें वैय्यर्थ (पोकळपणा) कळून आलें आहे? एकादा मनुष्य नुसता पंडित असला आणि त्याला जग मिथ्या आहे असा अनुभव आला नाहीं, तर तो कुचकामाचा होय. जर हुकुम मिळाला

ईश्वराच्या हुकुमाचें–आदेशाचें तत्व. आदिष्ट उपदेशक अजिंक्य आहे.

असेल, धर्माचीं तत्वें शिकविण्याचा हुकुम ईश्वराकडून मिळाला असेल, तर उपदेशाचा कांहीं वाईट परिणाम होत नाहीं. अशा तऱ्हेच्या आदेशामुळें समर्थ झाल्यानें या उपदेशाचा कोणीहि पराभव करूं शकत नाहीं."

सद्गुरु पुढें ह्मणाले "माझी माता, ज्ञानाची देवी इच्याकडून प्रकाशाचा एक किरण जर मिळेल, तर त्यापुढें मोठमोठे विद्वान् व पंडित हे भूमीवर सरपटणारे किडे होऊन जातील. दिवा पेटविला ह्मणजे त्यावर घालून घेणारे शेंकडों किडे आमंत्रणाची वाट पहात नाहींत. त्यांनां कोणी बोलाविलें नाहीं तरी ते दिव्याच्या ज्योतीवर येऊन आदळणारच. ईश्वराकडून आदेश मिळालेला माणूस श्रोतृवृंदाला हुडकत नाहीं. श्रोतृवृंदच त्याला शोधून काढितो. तो सभा, व्याख्यानें इत्यादि भानगडींत पडत नाहीं. लोक स्वतः होऊन त्याच्यापाशीं जातात. त्याच्या आकर्षणशक्तीनें सर्व वश होऊन जातात. आणि राजेरजवाडे व श्रीमंत बाबु त्याच्यापाशीं जमतात, व त्याला विचारतात, कीं, 'हे आंबे, ही मेवामिठाई, हें सोनें, हिरे, जवाहीर, शालू इत्यादि इत्यादि यांचा कृपा करून स्वीकार कराल काय?' अशा लोकांनां मी स्पष्ट सांगतों 'चालते व्हा, छे माफी करा, मला कशाचीहि जरूरी नाहीं!' खरोखर, लोहचुंबकाला लोखंडाच्या तुकड्यांनां भेटीसाठीं आपल्याजवळ या, असें सांगावें लागत नाहीं. तर उलट ते तुकडेच लोहचुंबकाकडे धांव घेतात आणि त्यांनीं तशीच धांव घेतली पाहिजे."

**आदिष्ट उपदेशक ह्या संस्थेविषयीं उदासीनता, मुद्दाम भरविलेल्या सभा व लौकिक याविषयीं तिरस्कार, या गोष्टींनीं ओळखिला जातो.**

**गुरु—सर्वोत्तम त्यागी (संन्यासी) व उपदेशक.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "असा उपदेशक, विद्वान्, धर्मशास्त्रप्रणीत सर्व तत्वें अवगत असलेला असा पंडित दिसत नाहीं ह्मणून तुला कांहीं शंका येते काय? खरेंच तो पढतपंडित नसतो ह्मणून कांहीं शंका येते काय? छे, अशा शंकेचें कांहीं कारण नाहीं. त्या ज्ञानाची उणीव त्याला केव्हांच भासत नाहीं. दिव्यज्ञानाचा, प्रत्यक्ष अनुभविलेल्या अशा तत्वांचा अलोट संग्रह त्याच्यापाशीं असतो—आणि हें तर पुस्तकी ज्ञानापेक्षां किती तरी पटीनें श्रेष्ठ आहे. धान्याच्या राशींतून धान्य मापतांना लोकांनां पुष्कळांनीं पाहिलें असेल. एका मापानें एकजण मापत असतो. त्याच्याजवळचें धान्य संपत आलें, कीं, दुसरा इसम धान्य त्याच्याकडे लोटत असतो. याचप्रमाणें बहुशः दिव्य किंवा आदिष्ट उपदेशकाला सर्व ज्ञानाचा झरा—सत्यांचा सांठा दैवी माता इजकडून पुरविला जातो, आणि हा सांठा तर केव्हांच संपत नाहीं. एकाद्या व्यक्तीचें नशीब उघडून

**आदिष्ट उपदेशक आणि ज्ञान.**

# अष्टम परिच्छेद—अध्याय पहिला.

जर त्याला ईश्वराकडून एकच प्रेमकटाक्ष प्राप्त झाला, तर त्याला पुरेसें दिव्यज्ञान लाभून तो कृतकृत्य होऊन जातो. ह्मणून मी तुला विचारितों, कीं, तुला परमेश्वराकडून कांहीं आदेश मिळालेला आहे काय ?"

हाजरा पंडिताकडे वळून ह्मणाला "अशा तऱ्हेचा कांहीं तरी प्रकार असला पाहिजे. होय ना ?"

पंडित ह्मणाले "असा कांहीं प्रकार नाहीं, असें मला वाटतें."

घरचा यजमान ह्मणतो "आपलें कर्तव्यकर्म ह्मणून तो उपदेश करीत असतो."

**दैवी आदेशाच्या अभावीं उपदेशाची किंमत.**

सद्गुरु ह्मणाले "उपदेशाचें शील चांगलें नाहीं, दिव्य आदेशाचें जर त्याला कांहीं पाठबळ नाहीं, तर त्याच्या उपदेशाची, व्याख्यानांची किंमत काय ? कोणीं एकानें आपल्या व्याख्यानांत ह्मटलें होतें, कीं, 'हे बांधव हो, मी पूर्वी दारू पीत होतों इत्यादि.' अशा तऱ्हेच्या भाषणानें त्या व्याख्यात्याची किंमत फारच कमी झाली. कारण, लगेच श्रोते आपसांत ह्मणूं लागले, कीं, 'काय व्यक्ति आहे पहा ! मी दारू पीत होतों असें ह्मणतो. याचा अर्थ काय ?' बारिसालचे पेनशन घेतलेले मुनसफ मला एकदां ह्मणाले, कीं, 'महाराज, आपण व्याख्यान देत फिरतां काय ? तसें असेल तर मीहि कंबर बांधून तुमचें अनुकरण करितों.' मीं सांगितलें, कीं, 'महाराज, एक गोष्ट प्रथम ऐका. कमरपुकर खेड्यांत हालदारपुकुर नांवाचें एक तळें आहे. तळयाच्या कांठावर लोक नेहमीं केरकचरा टाकीत असत. कचरा टाकणाऱ्या लोकांनां प्रत्येक दिवशीं सकाळी शिव्यांची लाखोली मिळे; पण सर्व व्यर्थ. दुसरे दिवशीं पुन्हां घाणीचा प्रकार पूर्ववत् चालू असे. सरतेशेवटीं तेथें मुनिसिपालटीच्या एका शिपायानें 'कोणींहि लोकांनीं असा प्रकार करूं नये !' अशी नोटीस लाविली. अधिकाऱ्यांकडून आलेल्या या नोटिसीचा परिणाम तत्काल झाला. पुन्हां तेथें कांहीं घाणीचा प्रकार घडला नाहीं. ह्मणून मी सांगतों, कीं, उपदेशक साधारण व्यक्ति असतां कामा नये. त्याच्याजवळ दाखले—परमेश्वराचा हुकूम—यांचा जोर पाहिजे. परमेश्वराकडून त्याला आदेश मिळाला पाहिजे."

**ईश्वराकडून आदेश कसा प्राप्त करून घ्यावा ?**

सद्गुरु पुढें ह्मणाले "मानवजातीच्या उपदेशकाला बरेंच आध्यात्मिक बल असलें पाहिजे. हनुमानपुरीसारखे बरेच कसलेले पैलवान कलकत्त्यांत आहेत. आपल्या शक्तीची पारख नवशिक्याकडून करून न घेतां अशा अनुभविक लोकांकडून करून घ्यावी. चैतन्यदेव ह्मणजे प्रत्यक्ष ईश्वराचा अवतार. त्यांच्या

यांचें आतां काय शिल्लक राहिलें आहे? तर मग त्याहून ज्याचें आध्यात्मिक बल फार कमी, आणि ज्याला ईश्वराकडून आदेश मिळाला नाहीं, त्याच्या कार्याची किंमत कित. तरी पटीनें कमी असली पाहिजे. ह्मणून मी ह्मणतों—" असें ह्मणून दैवी भक्तीनें धुंद होऊन सद्गुरु खालीं दिलेलें पद गाऊ लागले:—

डुब डुब डुब रूपसागरे आमार मन ।
तलातल पाताल खुंजले पावि रे प्रेम रत्न धन ॥
खुंज खुंज खुंज खुंजले पावि हृदय माझे वृन्दावन ।
दीप् दीप् दीप् ज्ञानरे वाति, हृदे ज्वल्बे अनुक्षण ॥
ड्याङ् ड्याङ् ड्याङ् ड्यांगाय ढिंगे चालाय आबारसे कोन्‌जन ।
कुबीर बले शोन् शोन् शोन् भाव गुरुर श्रीचरण ॥

भिऊं नका.

पद संपल्यानंतर सद्गुरु पुन्हां बोलूं लागले "मी तुह्मांला सागरांत बुडी मारण्यास सांगतों, ह्मणून तुह्मी घाबरूं नका. तो अमृतोदधि आहे! मीं एकदां नरेंद्राला ह्मटलें, कीं, 'ईश्वर ह्मणजे क्षीरसागर आहे. तूं या सागरांत बुडी मारणार नाहींस काय? अशी कल्पना कर, कीं, मधुर रसानें भरलेलें मोठया रुंद तोंडाचें एक भांडें आहे, आणि त्या अमृताचें पान करण्यास उत्सुक असलेली अशी तूं एक माशी आहेस. तर तूं कुठें बसून प्राशन करिशील?' नरेंद्रानें उत्तर दिलें, कीं, 'त्या भांडयाच्या कांठावर बसून मी प्राशन करीन. कारण, मी माझ्या उंचीपेक्षां खोल गेलों, तर बुडून जाईन. यावर मीं त्याला सांगितलें, कीं, 'बेटा, अमृतोदधींत बुडी मारणाराला मृत्यूचें कांहीं भय नाहीं, हें तूं विसरतोस! सच्चिदानंदसागर (दिव्योदधि) हा अमृतोदधि आहे. या सागराच्या पाण्यानें मृत्यु केंव्हांच येत नाहीं, पण हेंच सनातन आयुष्याचें जीवन आहे. ईश्वराची भक्ति करतांना कांहीं खुळ्या लोकांप्रमाणें अतिरेकाची भीति बाळगूं नको. या अमृतोदधींतील चिदानंदरस—ब्रह्मामृत, अखंड ज्ञान व आनंद प्राशन कर.' याप्रमाणें प्रथम तूं ईश्वराचें दर्शन घे, त्याचा साक्षात्कार करून घे, ह्मणजे नंतर आपोआप त्याचा ध्वनि तुला ऐकूं येईल. तो तुझ्यापाशीं चालत येईल आणि त्याच्या मर्जीस आलें तर तुला तो आपला आदेश देईल."

# अष्टम परिच्छेद–अध्याय पहिला.

सद्गुरु पुढें ह्मणाले "**अमृतोदधीस पोहोंचण्याचे अनंत मार्ग आहेत.** कोणत्या मार्गानें जावयाचें हा गौण प्रश्न आहे. कल्पना करा, कीं, एक अमृताचें सरोवर आहे कुठल्याहि ठिकाणाहून सावकाश उतरून जाण्यास तुह्मांला मुभा आहे. अमृताकडे चला आणि तें प्राशन करा. पुन्हां असें पहा, कीं, कोणीं एकानें त्या सरोवरांत स्वतः उडी ठोकिली किंवा दुसऱ्यानें त्यांत त्याला लोटून दिलें, त्याचा अर्थ काय? दोन्ही प्रसंगीं परिणाम एकच—सारखाच! कसें झालें तरी त्याला जीवनामृत चाखावयास मिळतें आणि तो अमर होतो. मार्ग अनंत आहेत, तेव्हां अर्थात् समानपरिस्थितींत, ज्ञान, कर्म आणि भक्ति हे सर्व मार्ग ईश्वराप्रत आह्मांला नेतात."

**अमृतोदधीस पोहोंचण्याचे मार्ग. सर्व धर्मांच्या व पंथांच्या लोकांनां उद्धाराची आशा.**

**योग किंवा साक्षात्कार.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "योग (ईश्वराचा साक्षात्कार) तीन प्रकारचा आहे. १ ज्ञानयोग; २ कर्मयोग; ३ भक्तियोग. पहिला **ज्ञानयोगः**–या मार्गांत ज्ञानाच्या–उत्कृष्ट ज्ञानाच्या साधनानें परमेश्वराचा साक्षात्कार घ्यावा लागतो. ज्ञान्याचा उद्देश अव्यक्त ब्रह्माचा साक्षात्कार करून घेणें, हा होय. तो 'नेति नेति' ह्मणून प्रत्येक अनात्म वस्तूचा त्याग करीत करीत शेवटीं अशा एका ठिकाणीं पोहोंचतो, कीं, तेथें मग आत्मानात्मवस्तूविषयीं विवेक उरत नाहीं आणि अखंड अव्यक्त असें ब्रह्मच प्रत्ययास येतें. दुसरा **कर्मयोगः**–या मार्गांत कर्म हें ईश्वरप्राप्तीचें साधन आहे, आणि याचाच तूं उपदेश करीत आहेस. आसक्तिरहित आचरलेला योग किंवा राजयोग हा देखील कर्मयोगांतच येतो. ध्यान आणि समाधि यायोगें ईश्वरी साक्षात्कार होतो. गृहस्थाश्रमी लोकांनीं आपलीं सर्व कर्तव्यकर्मे बजाविणें आणि तीं आसक्ति न धरतां परमेश्वराप्रीत्यर्थ करणें, हाच कर्मयोग होय. पूजा, जप इत्यादि कर्मे अनासक्त रीतीनें कृष्णार्पण करून आचरिलीं असतां कर्मयोगांत मोडतात. कर्मयोगाचें उद्दिष्टहि तेंच आहे. निर्गुण किंवा सगुण ब्रह्माचा किंवा दोन्हींचा साक्षात्कार करून घेणें, हेंच तें उद्दिष्ट होय. तिसरा **भक्तियोगः**–या मार्गांत भक्ति, प्रेम, आत्मार्पण या साधनांनीं ईश्वरप्राप्ति होते. आणि हाच मार्ग हल्लींच्या ह्मणजे कलियुगांत श्रेयस्कर व पसंत आहे. भक्तियोग हा या युगाचा युगधर्म आहे."

सद्गुरु पुढें ह्मणाले "मीं पूर्वी ह्मटल्याप्रमाणें आसक्तिविरहित कर्में करणें या कलियुगीं फार कठिण आहे. कारण, प्रथम मीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें शास्त्रांत सांगितलेली सर्व कर्में करण्यास हल्लीं वेळ क्वचित्च मिळतो. दुसरें, संग, फलेच्छा आणि इहपरलोकीं शासनाची भीति, हीं सर्व सोडून कर्में करण्याचा तूं निश्चय करिशील; पण बहुश: असें घडून येईल, कीं, कळत अगर नकळत फलेच्छा व संग हीं तुला येऊन जडतील. तूं सिद्धच असशील तर मात्र फलेच्छा व संग हीं तुला बाधणार नाहींत."

**कर्मयोगाचें काठिन्य.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "ज्ञानयोगाचा मार्ग या युगांत अत्यंत बिकट आहे. प्रथम आमचें आयुष्य ( प्राण ) अन्नगत आहे. दुसरें, मनुष्याची आयुष्यमर्यादा हा मार्ग साधण्यास फारच अल्प आहे. तिसरें, या युगांत आह्मांला चिकटून राहणारी देहात्मबुद्धि–आपण देह आहों ही भावना–सोडून देणें हें बहुतेक अशक्यच आहे. ज्ञानी शेवटीं जो सिद्धांत ठरवितो तो कोणता? तो हा:–मी स्थूल अगर सूक्ष्म देह नव्हें; परमात्म्याशीं–अव्यक्त अमर्याद ब्रह्माशीं माझें ऐक्य आहे; मी देह नसल्यामुळें देहाच्या गरजा–क्षुधा, तृषा, जन्म, मृत्यु, रोग, शोक, सुख, दु:ख, यांनीं मी बांधिला जात नाहीं. या देहाच्या गरजांनीं जो स्पष्ट आहे आणि जो आपणास ज्ञानी ह्मणवितो, त्याची स्थिति एकाद्या तीक्ष्ण कांट्यापासून असह्य वेदना होत असलेल्या मनुष्यासारखी होय. तो कांटा हातास फार दु:ख देतो व रक्त बाहेर काढितो; पण तो मनुष्य तथापि ह्मणतो, कीं, माझ्या हाताला कांहीं इजा झाली नाहीं, किंवा तो कांहीं दुखावलेला नाहीं, तो ठीक आहे. ह्मणून प्रेम, परमेश्वराच्या ठायीं पूर्ण श्रद्धा ह्मणजे भक्तिमार्ग, हा सर्वांत सोपा आहे. भक्तिमार्गानें चाललें ह्मणजे फारच थोडीं कर्में करावीं लागतात. भक्तिमार्ग हा अखंड नामस्मरण ( प्रार्थना ) शिकवितो. भक्तिमार्ग हा ईश्वरास पोहोंचण्याचा या युगांत सर्वांत सोपा व जवळचा मार्ग आहे. याचा अर्थ इतकाच आहे, कीं, ज्ञानयोग (आत्मनात्मविवेक) आणि कर्मयोग हे या युगांत भक्तियोगापेक्षां, ईश्वराप्रत नेणारे कठिण मार्ग आहेत. ध्येय निराळें आहे असें मात्र समजूं नये. ज्ञानयोगी, वस्तुत: निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार घेऊं पहातो."

**ज्ञानयोगाचें काठिन्य**

**भक्तियोग हाच युगधर्म आहे, कर्मयोग किंवा ज्ञानयोग नव्हे.**

**मार्ग भिन्न पण ध्येय एकच.**

# अष्टम परिच्छेद—अध्याय पहिला.

सद्गुरु पुढें ह्मणाले "माझ्या ह्मणण्याचा अर्थ एवढाच आहे, कीं, ज्ञानयोग्यानें सुद्धां या भक्तियोगाचा अवलंब करणें हें फार चांगलें. ज्ञानयोग्यांनीं ईश्वरावर प्रेम करावें, त्याची प्रार्थना करावी, आणि आपला सर्व भार त्यावर टाकावा. तो भक्तवत्सल परमात्मा आपल्या भक्तावर प्रेम करितो, आणि भक्ताला पाहिजे असलें तर ब्रह्मज्ञानहि तो त्याला देतो. ज्ञानयोग्याला याप्रमाणें सगुण आणि निर्गुण ब्रह्मांचा साक्षात्कार होईल. **त्यानें या युगांत भक्तियोगाच्या मार्गानें गेलें मात्र पाहिजे.** परंतु भक्तियोग्याला सगुण ब्रह्माचा साक्षात्कार करून घ्यावयाचा असतो, तथापि भक्तवत्सल परमात्मा त्याला आपल्या अनंत वैभवाचा वारसदार करितो, आणि सगुण निर्गुण ब्रह्मार्चे ज्ञान त्याला देतो. त्याला ज्ञान आणि भक्ति दोन्ही मिळतात. *कारण असें पहा, कीं, कलकत्त्याला जो मनुष्य येऊन पोहोंचतो त्याला मैदान, आक्टरलोनी मान्युमेन्ट, म्युझीयम इत्यादि स्थळें पाहतां येत नाहींत काय? आणि हें अमुक स्थळ आहे असें कळून येत नाहीं काय? मुख्य गोष्ट ती ही, कीं, कसेंहि करून आधीं कलकत्त्याला पोहोंचलें पाहिजे."

**भक्ताला ब्रह्मज्ञान होईल काय?**

सद्गुरु पुढें ह्मणाले "माझ्या **देवी माते**पाशीं तुह्मी या तर खरे, ह्मणजे तुह्मांला भक्तिच नव्हे, तर ज्ञानसुद्धां—फक्त ज्ञानच नव्हे तर भक्तिहि मिळेल! समाधीमध्यें तुह्मी तिचीं अनंत सगुण अथवा साकार रूपें पहाल, किंवा तुमचा अहंकार नाहींसा केला जाईल, आणि मग तुह्मांला सगुणरूपें दिसणार नाहींत. ह्मणजे समाधीमध्यें सगुण निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार होईल. खरा भक्त अशी प्रार्थना करितो, कीं, 'हे परमेश्वरा, आसक्तीनें केलेलें कर्म भयंकर असतें; कारण, जसें पेरावें तसें घ्यावें, हा न्याय आहे. तसेंच आसक्तिरहित कर्म करणें फार कठिण आहे. पहिल्या कर्मापासून हे देवा, मला वांचीव; नाहीं तर तुझा मला विसर पडेल. माझ्या नशीबीं असलेलें कर्म कमीकमी होऊं दे, आणि शेवटीं तुझें दर्शन होऊं दे, आणि मग कर्माची पिरपिर माझ्यामागें नको. हें साध्य होईपर्यंत सर्वांत अत्यावश्यक असें

**भक्ताचें कर्माविषयीं मत. त्याची प्रार्थना.**

---

*भक्तास पाहिजे भक्ति। परंतु देव देऊं पाहे मुक्ति। ह्मणूनी अनादि ईश्वराची युक्ति। कीं हीं दोन्हीं घडतीं सगुण भक्तास.॥—वामनपंडित—यथार्थदीपिका १४ अध्याय.

तुजविषयीं प्रेम, भक्ति आणि श्रद्धा हीं मला कृपा करून दे. तुझ्या कृपेनें माझ्या वांट्याचें, कमीकमी होत आलेलें कर्म माझ्याकडून आसक्तिविरहित होत जावें अशी योजना कर. आयुष्याचें खरें इतिकर्तव्य ह्मणजे तुझें दर्शन साध्य होईपर्यंत, माझ्या जीवाला नवीन कर्म शोधण्याच्या पाशांत—तें आसक्ति-विरहित असलें तरी सुद्धां—घालूं नको. जर तूंच होऊन तुझें एकादें कर्म करण्याची मला आज्ञा दिलीस तर ती गोष्ट निराळी."

पंडित ह्मणाले "महाराज, आपण कुठपर्यंत तीर्थयात्रा करीत गेलां आहांत ?"

सद्गुरु हंसत ह्मणाले "मीं कांहीं तीर्थें पाहिलीं आहेत. परंतु हाजरानें माझ्यापेक्षां अधिक तीर्थयात्रा केली आहे. तो हिमालय-पर्वतावरून हृषीकेशासमुद्धां गेला होता. मी इतका वर गेलों नाहीं. गिधाडें आणि घारी खरोखर फार उंच उडतात; पण त्यांची सर्व दृष्टि मृत जनावरांचीं प्रेतें असलेल्या खळग्या-कडे लागलेली असते. ईश्वराविषयीं प्रेम—भक्ति एकदां साधिली, ह्मणजे तीर्थयात्रा करण्यांत काय फायदा आहे ? तीर्थयात्रा करीत करीत मी एकदां काशीस गेलों आणि तेथें येथल्यासारखेंच गवत आणि चिंचेचीं झाडें पाहून आश्चर्यचकित झालों. ईश्वराविषयीं भक्ति व प्रेम यांशिवाय केलेली तीर्थयात्रा निष्फल होय. तुमच्या हृदयांत ईश्वराविषयीं भक्ति असेल तर तीर्थयात्रा केलीच पाहिजे, असें नाहीं. तुह्मी आहांत तेथेंच सर्व कांहीं चांगलें होईल. ईश्वराविषयीं भक्ति हीच काय ती मुख्य गोष्ट पाहिजे आहे."

**तीर्थयात्रांची किंमत. कर्मविरुद्ध श्रद्धा आणि भक्ति.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "शवास्थिगृह ह्मणजे हें जग होय—त्याचें दुसरें नांव ह्मणजे कांता ( विषयासक्ति ) आणि कनक ( संपत्ति, मान, कीर्ति, आसक्तीनें केलेलें कर्म वगैरे वगैरे ). शास्त्रांत सांगितलेलीं कर्मे करून, मोठमोठ्या गोष्टी बोलून, आपलें आचरण योग्य आहे असें समर्थन करणारे हेच गिधाडें आणि घारी होत. यांचें सर्व लक्ष्य जगाच्या गोष्टींकडे—संपत्ति, मान, विषयोपभोग—यांकडे नेहमीं लागलेलें असतें."

पंडित ह्मणाले "महाराज, आपण ह्मणतां तें खरें आहे. भक्ति नसून तीर्थ-यात्रा करणें ह्मणजे त्रैमूर्तींपैकीं मध्यें असलेल्या श्रीविष्णूच्या हृदयावरील कौस्तुभमणि टाकून देऊन दुसरीं रत्नें धुंडत फिरण्यासारखें आहे !"

## अष्टम परिच्छेद—अध्याय पहिला.

सद्गुरु ह्मणाले " तुझ्या उपदेशाचा कांहीं परिणाम व्हावा असें तुला वाटत असेल, तर तूं कालाकडेहि दृष्टि दिली पाहिजेस. प्रत्येक व्यक्तीसंबंधानें तूं कांहीं काल तरी जाऊं दिल्याशिवाय तुझ्या उपदेशाचा कांहींच परिणाम होणार नाहीं. तं ज्यांनां उपदेश करितोस, ते सर्व त्यांची वेळ आल्याखेरीज बहुशः तुझ्या उपदेशापासून कांहींच फायदा करून घेणार नाहींत. आध्यात्मिक उन्नति ही क्रमाक्रमानें—कालांतरानें साध्य होणारी गोष्ट आहे. गुरु फक्त मदत करितील."

**धार्मिक श्रद्धेचा उगम आणि कालमान.**

सद्गुरु पुढें ह्मणाले " डॉक्टर तीन प्रकारचे असतात. पहिल्या प्रकारचे डॉक्टर रोग्याला पाहतात, त्याची नाडी तपासतात, योग्य तें औषध लिहून देतात, आणि दिवसांतून अमुक वेळां औषध घ्यावें असें सांगतात. सांगितल्याप्रमाणें रोग्यानें औषध घेण्याचें नाकारिलें, तर ते डॉक्टर विशेष काळजी किंवा त्रास न घेतां निघून जातात. त्याचप्रमाणें कांहीं धर्मगुरुहि असे आहेत, कीं, ते आपल्या उपदेशाची चहा झाली किंवा नाहीं, अगर आपल्या उपदेशाप्रमाणें लोक वागतात कीं नाहीं, याकडे विशेष लक्ष्य देत नाहींत. दुसऱ्या प्रकारचे डॉक्टर औषध घेण्यास सांगतात एवढेंच नव्हे, तर रोग्यानें तें घेण्याचें नाकारिल्यास ते त्याची समजूत घालितात. त्याप्रमाणें लोकांनीं धर्माच्या सन्मार्गानें जावें ह्मणून त्यांची हरएक प्रयत्नानें, आपल्या गोड भाषणानें व आर्जवानें समजूत घालणारे धर्मगुरु दुसऱ्या प्रकारचे होत. तिसऱ्या आणि उच्च प्रकारचे डॉक्टर आपल्या मृदु भाषणाचा कांहीं उपयोग झाला नाहीं, तर रोग्यावर आपल्या शक्तीचा उपयोग करितात. रोग्याच्या छातीवर गुडघा देऊन गळ्यांत औषध कोंबण्यास ते मागेंपुढें पहाणार नाहींत!" सर्व हंसतात.

**तीन प्रकारचे धर्मगुरु.**

सद्गुरु पुढें ह्मणाले " त्याप्रमाणें कांहीं धर्मगुरुहि असे आहेत, कीं, आपल्या शिष्यांनीं सन्मार्गानें जावें ह्मणून ते जरूर वाटल्यास त्यांच्यावर आपल्या शक्तीचा उपयोग करितात. हे गुरु उच्च दर्जाचे होत. "

पंडित ह्मणाले " एकूण, कांहीं डॉक्टरांप्रमाणें उच्च दर्जाचे धर्मगुरु आहेत. असें असतां कालमानाचाहि विचार करावा, असें आपण कां सांगितलें ? "

श्रीरामकृष्ण ह्मणाले " उच्च दर्जाचे डॉक्टर असतात खरे, पण समजा, औषध पोटांतच गेलें नाहीं, तर डाक्टराची इतकी खटपट व कळकळ निष्फळ व निरुपयोगी होते. आध्यात्मिक तत्वें ग्रहण करणारीं योग्य पात्रें निवडून काढणें आवश्यक आहे. मजजवळ येणारांनां मी विचारितों, कीं, तुझी काळजी घेणारा, तुझा आप्तइष्ट कोणी आहे काय ? कारण, कल्पना करा, कीं, शिष्य होऊं इच्छिणाराच्या बापानें कांहीं कर्ज करून ठेविलें आहे, आणि त्याची काळजी घेणारा त्याचा दुसरा या जगीं कोणी आप्तइष्ट नाहीं, तर अशा मनुष्यानें देवाकडे लक्ष्य लागणें बहुतेक अशक्यच आहे. तुझ्या लक्ष्यांत आलें काय, बेटा ! "

**सत्यग्रहणास योग्य पात्र पाहिजे.**

पंडित ह्मणाले " होय, महाराज, माझें लक्ष्य आपल्या भाषणाकडेच आहे. "

नंतर भाषणाचा ओघ ' ईश्वरी कृपा ' या दुसऱ्या विषयाकडे वळला. सद्गुरु ह्मणाले "एकदां कांहीं शीख शिपायी देवळांत आले. कालीमातेच्या मंदिरासमोर त्यांची माझी गांठ पडली. ते ह्मणाले, कीं, ' ईश्वर फार दयाळु आहे. ' मीं हंसत हंसत त्यांनां विचारिलें ' खरेंच कीं काय ?' त्यांनीं उत्तर दिलें ' कां, महाराज, ईश्वर आपल्या प्राण्यांची काळजी घेत नाहीं काय, व त्यांच्या सर्व गरजा भागवीत नाहीं काय ?' मीं ह्मटलें ' ईश्वर सर्वांचा पिता आहे. त्यानें सर्व प्राण्यांची—आपल्या मुलांची काळजी घेतलीच पाहिजे. त्यानें जर काळजी घेतली नाहीं तर दुसरा कोण घेणार ! खरोखर, येथील ईश्वराच्या लेंकरांनां पोसणें हें ' शहरांतील दुसऱ्या भागांतील ' लोकांचें कर्तव्यकर्म नव्हे. "

नरेंद्र ह्मणाला " तर मग ईश्वराला दयाळु ह्मणूं नये ? "

सद्गुरु ह्मणाले "तूं तसेंच ह्मणावें असा माझा आग्रह नाहीं. त्या नांवानें (नसें) त्याला हांक मारण्यास तुला पूर्ण मुभा आहे. माझ्या ह्मणण्याचा आशय एवढाच होता, कीं, **ईश्वर हा आमचा आहे.** "

पंडित ह्मणाले " किती बिनमोल शब्द हे ! "

श्रीरामकृष्ण एका शिष्याकडे वळून ह्मणाले " मघाशीं तूं गात होतास; पण आज तुझें गाणें मला ' अळणी ' वाटलें. मला त्यापासून आनंद झाला नाहीं. घरच्या यजमानाच्या शिफारशीनें एकादी नोकरी मिळावी ह्मणून प्रयत्न करणाऱ्या मनुष्यासारखी तुझी स्थिति होती. ह्मणून तुझें गाणें माझ्यानें ऐकवेना व लगेच मी तेथून निघालों. "

**ऐहिक विषयांचें गाणें.**

## अष्टम परिच्छेद–अध्याय पहिला.

शिष्याला शरम वाटली. यानंतर सद्गुरूंनीं ताज्या पाण्याचा प्याला मागितला.

**पवित्रता.** पूर्वीं दिलेला त्यांनीं स्वीकार केला नाहीं. ह्मणून तो बाजूस नेण्यांत आला. कोणा दुष्ट मनुष्याच्या स्पर्शानें तो दूषित झाल्यामुळें स्वतःमधील परमात्म्यास तो अर्पण करण्यास अयोग्य आहे, असें सद्गुरूंनां वाटलें असावें असें दिसतें.

पंडित हाजराला उद्देशून ह्मणाले "सद्गुरूंबरोबर नेहमीं असणारे तुह्मी सदोदित फार मौजेंत व आनंदांत असला पाहिजे !"

**निरोप.** सद्गुरु ह्मणाले "आज द्वितीयेचा चंद्र पाहण्यास मिळाला हें माझें मोठें भाग्य! द्वितीयेचा चंद्र असें मी मुद्दाम ह्मणतों. सीता रावणाला ह्मणाली 'तूं पौर्णिमेचा चंद्र आहेस आणि माझा रामचंद्र द्वितीयेचा चंद्र आहे.' याचा अर्थ समजून घेईपर्यंत रावणास मोठा आनंद झाला. सीतेचा अर्थ असा होता, कीं, रावण आपल्या वैभवाच्या शिखरास पोहोंचला होता आणि पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें त्याच्या वैभवाला उतरती कळा लागलीच पाहिजे. रामचंद्राचें वैभव त्याप्रमाणें नव्हे, त्याचें वैभव द्वितीयेच्या चंद्राचें. त्याची कळा उत्तरोत्तर वाढलीच पाहिजे. रामचंद्राचें वैभव वाढणार आणि रावणाचें कमीकमी होत जाणार, असा भावार्थ."

येथें सद्गुरु जाण्याकरितां उठले. पंडितांनीं आणि त्यांच्या मित्रांनीं त्यांनां प्रणाम केला. नंतर शिष्यांसमवेत सद्गुरु तेथून निघाले.

---

# नवम परिच्छेद.

## दक्षिणेश्वराच्या देवालयांत.

### १८८४.

## अध्याय पहिला.

### श्रीरामकृष्ण आणि योगतत्व.

[ **स्थळ**—दक्षिणेश्वर—ठाकुरवाडी—कलकत्ता—सद्गुरूंची खोली.
**वेळ**—ता. ३ आगष्ट, १८८४ दुपारी २ ते रात्रौ ९॥ वाजेपर्यंत.
हजर असलेली मंडळी—बळराम, महेन्द्र, राखाल, शिवपुरचे बौल नांवाचे भक्त लोक, भवानीपूरचे कांही गृहस्थ, हझरा, अधर, रामचतर्जी, इत्यादि. ]

नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें उत्तरेकडे तोंड करून सद्गुरु ओट्यावर बसले होते. खोलीच्या पश्चिम व उत्तर दरवाज्यामधून झुळझुळ वहाणारें पवित्र गंगाजल स्पष्ट दिसत होतें. खोलींत जमिनीवर पसरलेल्या चटईवर शिवपूरचे बौल बसले होते. ते अनेक वाद्यांच्या तालांवर पद्यें ह्मणत होते. या वाद्यांत एकतारीचें गोपीयंत्र नांवाचें—याला भांग-भोंगा-भॉग असेंहि ह्मणतात—एक वाद्य होतें. सद्गुरूंसमोर, ह्मणजे पश्चिमेकडे तोंड करून हे लोक बसले होते, व बाकी मंडळीपैकीं कांहीं दक्षिणाभिमुख आणि कांहीं सद्गुरूसमोर बसले होते.

त्यांनीं ह्मटलेल्या पद्यांतील एका पदांत योगमार्गांतील षड्चक्रांविषयीं उल्लेख होता. पदाचे शेवटीं सद्गुरु ह्मणाले " तांत्रिकाच्या योगमार्गांत सांगितलेलीं षड्चक्रें आणि वेदान्तांत सांगितलेल्या सप्तभूमिका यांचा मेळ जमतो. मन जेव्हां संसारांतच निमग्न असतें, तेव्हां प्रथम त्याचें स्थान गुद असतें; दुसरें स्थान लिंग, तिसरें नाभि व चवथ्या भूमिकेमध्यें मनाचें स्थान हृदय हें असतें. या भुमिकेमध्यें मनुष्याला दिव्य ज्योतीचा साक्षात्कार होतो, आणि तो असे उद्गार काढतो, कीं, 'हें सर्व आहे काय ? हें काय

**षड्चक्रें आणि सप्त भूमिका—सप्त मानसिक अवस्था.**

आहे !' पांचव्या भूमिकेंत मनाचें स्थान कंठ असतें. या भूमिकेमध्यें भक्त फक्त देवाच्याच गोष्टी बोलत असतो. संभाषणामध्यें दुसरा कांहीं विषय निघाला तर त्याला तें सहन होत नाहीं. सहाव्या भूमिकेंत मन हें भ्रूमध्यभागीं असतें. येथें भक्त जणूं देवासमोर येतो. फक्त एक कांचेसारखा पातळ पडदाच तेवढा देवाच्या आणि त्याच्यामध्यें असतो. कंदिलांतील दिवा किंवा कांचेच्या फ्रेमीपाठीमागचा फोटोग्राफ, याप्रमाणें देव त्याला दिसतो. तो देवाला भेटावयास जातो, पण तो त्याच्या हातीं लागत नाहीं. त्याला पूर्ण साक्षात्कार होत नाहीं. कारण, त्यामध्यें 'अहं' चा थोडासा भाग असतोच. शेवटच्या अगर सातव्या भूमिकेंत मन पूर्ण समाधींत असतें. या वेळीं सर्व इंद्रियांचें ज्ञान नाहींसें होऊन त्या जागीं इंद्रियातीत दिव्य ज्ञान प्राप्त होतें. या स्थितींत गेल्यावर साधु एकवीस दिवस जगतो, पुढें तो इहलोक सोडून जातो. या दिवसांमध्यें तो कांहीं अन्न घेत नाहीं. दूध जर त्याच्या तोंडांत ओतलें तर तें पोटांत न जातां तसेंच बाहेर पडतें."

**दिव्य ज्ञानाची अहंवृत्ति.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "या शेवटच्या उच्च ह्मणजे सप्तम भूमिकेवर जाऊन व पूर्ण समाधींत निमग्न होऊन कांहीं महात्मे लोकांवर उपकार करण्याकरितां तेथून परत येतात. ते ज्ञानाची—आत्मज्ञानाची अहंवृत्ति ठेवितात; पण ही अहंवृत्ति ह्मणजे नुसता भास, पाण्यावर ओढलेल्या रेषेप्रमाणें असते. हनुमानाला साकार, निराकार अशा उभयविध परमेश्वराचा साक्षात्कार झाला होता; पण ईश्वराचा दास (भक्त) ही वृत्ति त्यानें ठेविली. याचप्रमाणें नारद, सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार इत्यादि भक्तांची स्थिति होती ( व आहे )."

येथें "नारद इत्यादिकांनीं देवाची भक्ति द्वैतमताप्रमाणें केली, आणि त्यांनीं अव्यक्त ब्रह्माचा ( अद्वैतमताप्रमाणें ) साक्षात्कार घेतला नाहीं, काय ?" असा कोणीं आक्षेप घेतला.

त्यावर सद्गुरु ह्मणाले "नारद इत्यादि भक्तांना ब्रह्मज्ञान झालें होतें. प्रवाहाचें पाणी जसें खळखळ वहात असतें, त्याप्रमाणें हे परमेश्वराच्या गुणानुवादाचें कीर्तन करीत व गात राहिले. यावरून असें दिसतें, कीं, या भक्तांनीं ज्ञानाची —विद्येची अहंवृत्ति ठेविली होती. हे ज्ञानी होते, तसेच मोठे भक्तहि होते. दुसऱ्यांचें कल्याण करावें, या हेतूनें ते परमेश्वराचें भजन करीत राहिले. आगबोट आपल्या नेमलेल्या स्थळीं जाऊन पोहोंचते; एवढेंच नव्हे, तर

आपल्याबरोबर पुष्कळ लोकांनां ती त्या स्थळीं घेऊन जाते. नारदासारखे गुरु हे आगबोटीप्रमाणें होत."

सद्गुरु पुढें ह्मणाले "परमहंसांचे दोन वर्ग करितां येतील. पहिला वर्ग निराकारवादी. परमेश्वर निराकार आहे, असें हे ह्मणतात. त्रैलिंगस्वामी याच वर्गांतील होत. साधारणपणें या वर्गांतील साधूंनां आप्पलपोटे ह्मणतां येईल. कारण, ते आपल्या स्वतःच्या मुक्तीचीच काळजी वाहतात. दुसऱ्या वर्गांतील साधु, परमेश्वर साकार आणि निराकार आहे, आणि तो आपल्या भक्तांनां साकाररूपानें दर्शन देतो, असें ह्मणतात. नदींत जाऊन मिळणारा एकादा पाण्याचा प्रवाह ( ओढा ) तुह्मीं पाहिला आहे काय? ओढ्याच्या प्रवाहाचा कांहीं मागमूस दिसत नाहीं; कारण, तो नदीच्या प्रवाहाशीं मिळून गेलेला असतो; परंतु बारकाईनें पाहिलें, तर ओढ्याच्या प्रवाहांत खळखळ चाललेली दिसून येते व यावरून हा प्रवाह नदीप्रवाहाहून भिन्न आहे, असें ओळखितां येतें. दुसऱ्या वर्गांत मोडणाऱ्या गुरूंची गोष्ट अशीच आहे. यांचा आत्मा परमात्म्याशीं एकरूप होऊन जातो. तरीपण, परमात्म्याची व आपली भिन्नतादर्शक अशी थोडीशी विद्यायुक्त अहंवृत्ति त्यांनीं ठेवून घेतलेली असते. पुन्हां अशा गुरूला आकंठ पाण्यानें भरलेल्या घटाची उपमा देतां येईल. या घटांतील सर्व अथवा कांहीं भाग दुसऱ्या पात्रात देतां येतो. दुसरें पात्र ह्मणजे शिष्य. आकंठ भरलेला घट ब्रह्मज्ञानानें प्राप्त झालेली पूर्ण स्थिति याचा निदर्शक आहे. धर्माचीं तारकतत्वें लोकांनां शिकविण्याच्या हेतूनें विद्यायुक्त अहंवृत्ति ठेवण्यांत येते."

**परमहंसांविषयीं सद्गुरूंचें मत; साक्षात्कारानंतरची आत्मस्थिति.**

**स्वतःविषयीं एक सूचना.**

सद्गुरु पुढें ह्मणाले " पुन्हां, समजा एकानें विहीर खणली. त्याला तहान लागली ह्मणजे तो त्या विहिरीचें पाणी पितो. अशा मनुष्याजवळ विहीर खोदण्याचीं साधनें—कुदळ, पहार, खुरपें इत्यादि बाळगलेलीं असतात. दुसऱ्या कोणालाहि याच हेतूसाठीं ( तृषेसाठीं विहीर खोदविणें ) त्या साधनांचा उपयोग करितां येतो. तसेंच, दुसऱ्या वर्गांत मोडणारा गुरु शाश्वत जीवनाच्या पानानें आपली आध्यात्मिक तृषा भागवितो ( ब्रह्मज्ञान मिळवून पूर्ण होतो ), तरी तो लोकांनां मदत करण्यास उत्सुक असतो. या हेतूनें

# नवम परिच्छेद—अध्याय तिसरा.

**सद्गुरु पर्यायानें स्वतःचें वर्णन करितात. चैतन्य-देव, दिव्य ज्ञान व दिव्य भक्ति यांचे मालक.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "सरतेशेवटीं आणखी एक जोड प्रकाश—याला चंद्रसूर्य-प्रकाश असें नांव देतां येईल—आहे. चंद्राचा आणि सूर्याचा अशा दोन्ही प्रकाशांचा मिळून हा जोड प्रकाश झालेला असतो. उत्तम दिव्य ज्ञान, उत्तम दिव्य भक्ति, या लक्षणांनीं युक्त असलेल्या चैतन्यदेवासारख्या ईश्वरी अवताराच्या ज्ञानाला या जोडप्रकाशाची उपमा देतां येईल. हें ज्ञान, एकाच वेळीं नभोमंडळांत चंद्र व सूर्य यांचें दर्शन होण्याइतकें विलक्षण आहे."

**संसरी जीव आणि त्याच्या उद्धाराची आशा.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "संसारांत निमग्न झालेल्या मनुष्यास दिव्य ज्ञान प्राप्त होत नाहीं. तो परमेश्वराला पाहूं शकत नाहीं. गढूळ पाण्यामध्यें सूर्याचें अगर दुसऱ्या कोणत्याहि भोंवताल्च्या पदार्थांचें प्रतिबिंब पडतें काय? या वस्तुस्थितीवर कांहीं उपाय नाहीं काय? संसारी जीवाच्या उद्धाराची कांहीं आशा नाहीं काय? होय, आशा खचित आहे. गढूळ पाण्यामध्यें स्वच्छ करणारें औषध—उदाहरणार्थ तुरटीचा एक तुकडा,—टाकिलें असतां तें पाणी निवळूं लागतें, आणि पात्राच्या बुडास सर्व गाळ सांचतो. आत्मा (देव) आणि अनात्मा (दृश्य जग) याविषयीं **विवेक**, आणि जगाविषयीं **वैराग्य**, हीं दोन पावन करणारीं साधनें आहेत. या साधनांनींच जीव संसारबंधनांतून सुटतो आणि पवित्र होतो."

**परमेश्वरप्राप्तीच्या सहा पायऱ्या.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "पहिली पायरी—साधुसंतांचा सहवास अथवा सत्समागम. दुसरी पायरी—उच्च गोष्टीविषयीं श्रद्धा. तिसरी पायरी—आपल्या ध्येयाविषयीं—इष्ट देवतेविषयीं निष्ठा- ध्येय स्वतःचा गुरु असावें, किंवा निर्गुण निराकार ब्रह्महि ध्येय असावें. साकार सगुण देव किंवा त्याच्या अनंत अवतारांपैकीं एकादा, किंवा आपलें कुलदैवत यांनां ध्येय मानावें. विष्णूचे भक्त विष्णु किंवा श्रीकृष्ण या कुलदेवतेची भक्ति करितात. शाक्त अथवा शक्तिपूजक लोक यांची, शक्ति किंवा जिला काली, दुर्गा असेंहि ह्मणतात अशा जगन्मातेवर निष्ठा असते. चवथी पायरी—ईश्वरविषयक विचार मनांत येतांच वाचा बंद होणें (भाव). पांचवी पायरी—साक्षात्कारानंतर भक्तिभावाचा कल्लोट झाला ह्मणजे त्याला महाभाव ह्मणतात. या

स्थितींत भक्त वेड्याप्रमाणें केव्हां हंसतो, केव्हां रडतो. आपल्या देहावरील त्याचा ताबा नाहींसा होतो. **ज्या मानवांनां आपले क्षुद्र मनोविकार ताब्यांत ठेवितां येत नाहींत,** त्यांनां ही ( महाभावाची ) स्थिति प्राप्त होत नाहीं. मानवजातीच्या उद्धारार्थ अवतरलेल्या विभूतींनांच ही स्थिति प्राप्त होते. सहावी पायरी—महाभावाच्या जोडीचें **प्रेम** हें आहे. साक्षात्कारानंतर अत्युत्कट भक्ति हेंच **प्रेम** आणि आध्यात्मिक उन्नतीची ही सर्वांत उच्च पायरी होय. या स्थितीचीं दोन लक्षणें हीं आहेत. ( १ ) या जगाची विस्मृति; ( २ ) स्वतःचा ह्मणजे आपल्या देहाचा विसर. चैतन्यदेव या स्थितीप्रत पोहोंचले होते, आणि ईश्वरी प्रेमांत ते इतके मग्न झाले होते, कीं, ते स्वतःला आणि पूर्वी पाहिलेल्या स्थळांनां विसरले होते. एकदां आपल्यासमोर एक अरण्य पाहिल्यावर त्यांनां स्वतःची इतकी विस्मृति पडली, कीं, तें अरण्य वृंदावन आहे असें ते समजले. पुरी येथें असतांना समुद्राकडे पाहून ही यमुनाच आहे, असें ते समजले. या स्थितींत ते समुद्रांत उडी टाकीत असत, आणि एकदोनदां त्यांच्या मित्रांनीं आणि शिष्यांनीं त्यांची आशा देखील सोडून दिली होती. ही स्थिति भक्ताला ध्येयाशीं—परमेश्वरापाशीं नेऊन सोडते. भक्त देवाला पाहतो, आयुष्याचें इतिकर्तव्य साधितो आणि त्याला दिव्य साक्षात्कार होतो."

याप्रमाणें उपदेश करून सद्गुरु हजर असलेल्या मंडळीला ह्मणाले "जर कोणाला कांहीं प्रश्न विचारावयाचा असेल तर त्यानें खुशाल विचारावा."

परंतु प्रश्न विचारण्यास कोणी पुढें येईना. तेव्हां सद्गुरु पुन्हां बोलूं लागले

**आध्यात्मिक शिक्षणांत कालमानाचें महत्त्व.**

"ज्ञान सर्व एकदम देतां येत नाहीं. तें कांहीं कालानंतर प्राप्त होतें. समजा, एकाद्याच्या अंगांत कडक ताप भरला आहे, या स्थितींत डॉक्टर त्याला क्किनाईन देणार नाहीं. या उपायानें त्या रोग्याचें हित होणार नाहीं, हें त्याला पक्कें माहीत आहे. रोग्याचा ताप प्रथम गेला पाहिजे, आणि त्याला कांहीं कालाची अपेक्षा आहे. कांहीं कालानें त्याचा ताप जाईल आणि मग क्किनाईनचा उपयोग होईल. कित्येकदां क्किनाईन अगर दुसरें औषध दिल्याशिवाय ताप जाऊन रोगी बरा होतो. ज्ञान मिळवूं पाहणाराची स्थिति अशीच आहे. जोंपर्यंत तो संसारांत पूर्ण निमग्न आहे, तोंपर्यंत धार्मिक वचनें त्याच्या वांट्यास निरुपयोगी आहेत. ऐहिक

वस्तूंचा उपभोग घेण्यास त्याला कांहीं काळ द्या. नंतर त्याची संसाराविषयीं आसक्ति हळुहळू नाहींशी होईल. हें झाल्यावरच मग कोणतेंहि धार्मिक शिक्षण त्याला दिलें, तर तें फलद्रूप आणि यशस्वी होईल. य‍ाच्या आधीं त्याला धार्मिक शिक्षण देणें ह्मणजे तें नुसतें वाऱ्यावर फेंकून देण्यासारखें आहे. पुष्कळ लोक मजपाशीं येतात आणि त्यांपैकीं कांहींजण माझे शब्द ऐकण्यास उत्सुक असतात, हें मीं पाहिलें आहे. तसेंच त्यांपैकीं एकाददुसरा असाहि असतो, कीं, त्याला माझ्यासमोर चैन पडत नाहीं. तो एकसारखा तडफडत असतो आणि आपल्या मित्राला सावकाश हलक्या स्वरांत ह्मणतो, कीं, 'चल मित्रा, आपण जाऊंया. तुझ्या मनांत रहावयाचें असेल तर आह्मी पुढें होतों आणि होडींत तुझी वाट पहातों.' विटा, चुना यांनीं बांधिलेल्या पक्क्या भिंतींत खिळे ठोकणें फार कठिण आहे. अशा भिंतीवर त्याचा कांहीं परिणाम होण्याऐवजीं खिळ्यांचीं डोकीं आधीं मोडून जाणार. सुसरीच्या पाठीवर तलवारीनें मारणें निरुपयोगी आहे. तलवारीनें तेथें कांहीं घाय पडणार नाहीं. ह्मणून मी सांगतों, कीं, अशा सर्व बाबतींत कालमान हा महत्त्वाचा प्रश्न आहे. धार्मिक किंवा आध्यात्मिक जागृति हा विशेषेंकरून कालाचाच प्रश्न आहे. गुरु फक्त मदत करील." यानंतर मंडळी उठून गेली.

नंतर सद्गुरु मला उद्देशून ह्मणाले "खरें पहातां, ज्ञान किंवा मुक्ति यांविषयीं **कर्म.** इच्छा होणें हें आपल्या पूर्वजन्मीच्या कर्मावर अवलंबून आहे."

यावर एक शिष्य ह्मणाला "होय, महाराज, स्वतःस—आत्म्यास जाणणें हें किती तरी कठिण आहे. आह्मांला जसें दिसतें तसें आह्मी स्वतःस पहातों. यापूर्वी आमचे शेंकडों जन्म झाले असतील. आह्मी घरांतील जमिनीवर चालतों, पण ती जमीन कशाची केली आहे, आणि त्या जमिनीखालीं काय वस्तु आहेत, याचा आपण केव्हांहि विचार करीत नाहीं."

सद्गुरु या शिष्याकडे पाहून हंसले आणि आपल्या जाग्यावरून उठले. खोलीच्या पश्चिम दरवाज्याजवळ असलेल्या ओव्यावर येऊन कांहीं वेळ अस्तास जाणाऱ्या सूर्याकडे ते पहात राहिले. तशीच आपल्यासमोर असलेल्या पवित्र प्रवाहाकडे त्यांची दृष्टि लागली.

---

# अध्याय चवथा.

## गुरु आणि शिष्य.

### मूर्तिमंत देव—पंचवटीचा देखावा.

पवित्र गंगानदीच्या तटाकीं असलेल्या देवालयाच्या पक्क्या भिंताडावरून एक शिष्य हळुहळू चालत होता. बळराम आणि दुसरे कांहींजण कलकत्त्यास घरीं जाण्याकरितां होडीवर चढत होते, हें तो पहात होता. हे दिवस भर उन्हाळ्याचे असल्यामुळें नदीला बऱ्याच लाटा येत होत्या. संध्याकाळचे पांच वाजून गेले होते. आकाश मेघांनीं व्याप्त झालें होतें. मेघांमुळें नभोमंडळांत, विशेषतः उत्तरेच्या बाजूस सुरेख देखावा दिसत होता. या देखाव्याचा द्रष्टा—शिष्य त्याच्यासमोर होता. मोठमोठ्या मोळवृक्षांनीं अलंकृत व उजव्या बाजूस नदी वाहत आहे अशी पंचवटी होती. आणि याच्यामागें वर नीलवर्ण मेघांची पंक्ति, खालीं निळा ( नदीचा ) प्रवाह होता.

या रम्य देखाव्याकडे शिष्य पहात होता. मोठ्या वृक्षाच्या आणि पंचवटीच्या मार्गानें दक्षिणेकडून सद्गुरु महाराजांची स्वारी येत आहे असें पाहतांच त्या शिष्याचें लक्ष्य इकडे वळलें.

सद्गुरु पांच वर्षांच्या बालकाप्रमाणें हंसले आणि पुढें झाले. हा देखावा किती रम्य झाला हें सांगणें अशक्य आहे. एकापक्षीं, एकीकडे विश्व ( जग ) आहे; दुसरीकडे, जग ज्याचें प्रतिबिंब आहे आणि जो या जगाचें वस्तुतः सत्यपणें निरीक्षण करितो, असा एक आत्मा आहे. खरेंच, अशा प्रसंगीं आयुष्याचें कोडें सुटलें, असें त्या शिष्याला वाटत होतें. येथें यांच्या—सद्गुरूंच्या अस्तित्वानेंच देवदेवता यांच्या प्रतिमा, नरनारी, मुलेंबाळें, झाडेंझुडपें, पत्रपुष्पें—देवालयांतील सर्व जागा इत्यादि सर्व कांहीं चैतन्यानें आणि आनंदानें भरून जात होतें. आपल्या पायाखालील मातीपासून तों तहत सुपूजित मूर्तिपर्यंतचे सव पदार्थ, त्याचप्रमाणें जीवरूप आत्मारामाच्या मंदिरांत—अर्थात् देहांत अंतर्दृष्टीनें दिसणारे सर्व पदार्थ, किंबहुना तेथील सर्व मूर्तामूर्त चराचर पदार्थ, या सर्वांवर या महापुरुषानें एक विलक्षण मोहिनी टाकिली आहे, असें त्या शिष्यास वाटलें. सद्गुरूंसमोर तो शिष्य तर या मोहिनीनें पूर्ण भारून गेला होता.

# नवम परिच्छेद—अध्याय चवथा.

सद्गुरु शिष्याला ह्मणाले "पावसाची सर येईल असें तुला वाटतें काय? बरें माझ्याकरितां छत्री आण. आणशील ना?"

शिष्य सद्गुरूंच्या खोलीकडे धांवत गेला, आणि छत्री घेऊन परत आला. पंचवटीच्या पायथ्याशीं नंतर खालीं दिल्याप्रमाणें संभाषण झालें:—

सद्गुरु शिष्याला उद्देशून ह्मणाले "मी तुला एक काम सांगतों. जेव्हां 'रा' येथून निघून जाईल, तेव्हां 'आपण येथें अवश्य येऊन दोन दिवस रहावें' असें 'ब' ला जाऊन तूं सांग. नाहीं तर माझ्या मनाला चांगलें वाटणार नाहीं. 'ब' कोणत्या तऱ्हेचा मुलगा आहे असें तुला वाटतें?"

शिष्य ह्मणाला "तो फारच सौम्य आणि सभ्य आहे."

"तो सरळ आहे किंवा नाहीं?"

"दिसण्यांत तर तो पूर्ण सरळ आहे असें वाटत नाहीं. याची फोड अशी करितां येईल, कीं, सौम्य अथवा शांत स्वभावाचा मनुष्य आपले विचार व विकार दुसऱ्यापाशीं बोलून दाखवीत नाहीं."

इतक्यांत सद्गुरु आपल्या खोलीकडे गेले. खोलींत या वेळीं हाजरा बसला होता व त्याच्यासमोर एक कविराज (वैद्य) हि बसले होते. हे हरिताळ भस्म उत्तम तयार करीत असत. यांनां पाहून सद्गुरु ह्मणाले "यांचें औषध मला उत्तम लागू पडतें. हे योग्य आहेत."

यावर हाजरा ह्मणाला "होय महाराज, पण यांचेवर संसार लादला आहे. त्यावर यांची कांहीं मात्रा चालत नाहीं!"

**नबै चैतन्य आणि भगवा पोषाख.**

नंतर हाजरानें पूर्वकालीन नबै चैतन्यानें धारण केलेल्या भगव्या वस्त्रावर कडक टीका केली. तो ह्मणाला "गृहस्थानें भगवें धारण करावें! काय हा प्रमाद!"

सद्गुरु ह्मणाले "तुला काय उत्तर द्यावें, हें मला सुचत नाहीं. तरी मला एक समाधान आहे. मी सर्व मनुष्य, नव्हे सर्व प्राणी परमेश्वराचे अवतार आहेत असें मानतों. प्रत्येक वस्तूमध्यें—प्रत्येक पदार्थामध्यें—मनुष्यामध्यें—निसर्गामध्यें—सर्वांमध्यें ईश्वर व्यक्त झाला आहे, हें मी पहातों. या जगांत आमच्या नेत्रांनां दिसणारे सर्व आकार ईश्वरानेंच धारण केलेले आहेत असें मी पहातों."

हाजरा ह्मणाला "नरेंद्र पुन्हां एकदां दिवाणी कज्यांत सांपडला आहे."

सद्गुरु ह्मणाले " असेल. परंतु त्याचा शक्तीवर—साकार देवावर विश्वास नाहीं."
नरेंद्र.

हाजरा ह्मणाला " होय, तो ह्मणतो, कीं, मी जर शक्तीवर विश्वास ठेवीन, तर माझ्या अनुयायांनां वाईट उदाहरण घालून दिल्यासारखें होईल."

सद्गुरु ह्मणाले "बरें, त्याला येथून—माझ्याकडून किती व काय फायदा होतो असें तुला वाटतें ?"

हाजरा ह्मणाला " आपलें त्याच्यावर प्रेम आहे."

सद्गुरु मला उद्देशून ह्मणाले "अलीकडे त्याची (नरेंद्राची) व तुझी भेट झाली नाहीं काय ? त्याच्या घरीं जाऊन त्याला भेटशील काय ? त्याला तुझ्याबरोबर गाडींतून इकडे आण. आणशील ना ?"

नंतर हाजराकडे वळून सद्गुरु ह्मणाले " भवनाथ आणि त्याचा माझ्याविषयीं असलेला प्रेमभाव यांविषयीं तुला काय वाटतें ? पूर्वजन्मींच्या संस्कारामुळें हें असें होतें, असें नव्हे काय ?"

एच्. आणि लातू या दोघांविषयीं बोलतांना त्यांच्या नेहमींच्या ध्यानाच्या अभ्यासाला उद्देशून हाजराला सद्गुरु ह्मणाले " आहे तरी काय हें सर्व ! ध्यानाला अंतच नाहीं काय ? तुझें काय ह्मणणें ?"

हाजरा ह्मणला " खरेंच. ते जर आपल्या सेवेस लागले असते तर मात्र गोष्ट निराळी."

सद्गुरु त्यांच्यातर्फे ह्मणाले " त्यांचा शिक्षणाचा—अभ्यासाचा काल संपला ह्मणजे त्यांची जागा कोणी तरी दुसरा (कदाचित् हाजरा) घेईल. माझ्याविषयीं तुला काय वाटतें ? तूं पहात नाहींस काय, कीं, केव्हां केव्हां जगन्माताशक्तीची मी एकाग्र निष्ठा करितों, केव्हां केव्हां करीत नाहीं. तसेंच केव्हां केव्हां मी सर्व देवदेवतांची भक्ति करितों, आणि ती तशाच निष्ठेनें करितों. केव्हां केव्हां मी अखंड सच्चिदानंदाचें ध्यान करितों. केव्हां केव्हां पतिव्रता स्त्रियेच्या भावनेनें ईश्वराची उपासना करितों, केव्हां तशी करीत नाहीं. हा सर्व चमत्कार नाहीं काय ? दुसरे लोकहि आपापल्या स्वभावानुरूप भावनेनें प्रेरित होऊन देवाची भक्ति करितात. उदाहरणार्थ, कित्येकांनां कृष्णाची, कांहींजणांनां रामाची भक्ति, तर दुसऱ्या कांहींजणांनां अव्यक्त ब्रह्माचें ध्यान आवडतें." हाजरा स्तब्ध राहिला.

## नवम परिच्छेद—अध्याय चवथा.

संध्याकाळची वेळ. संध्यावंदनादि नित्यकर्में झाल्यानंतर वर सांगितलेल्या शिष्यांची व सद्गुरूंची पुन्हां गांठ पडली. त्या वेळीं पुढील संभाषण झालें. हिंदुलोकांमधील बाह्यतः परस्परविरुद्ध दिसणारीं धर्ममतें हा संभाषणाचा विषय होता.

**विरोध कीं एकमत ?**

एक शिष्य ह्मणाला " कांहीं हिंदु असें समजतात, कीं, श्रीकृष्ण आणि काली ( चिच्छक्ति ) हीं एकच आहेत. दुसरे असें मानतात, कीं, श्रीकृष्ण हा परमात्मा आहे, आणि राधा ही सृष्टीची उत्पत्ति, स्थिति आणि संहार करणारी विश्वनियामिका देवी आहे. हा विरोध आहे काय ? "

सद्गुरु ह्मणाले " कांहीं धर्मग्रंथांत ( देवीपुराणांत ) पहिलें मत सांगितलें आहे. असें असेल, पण यांत विरोध असण्याचें कांहीं कारण नाहीं. परमेश्वर अनंत आकारांत आपणास व्यक्त करितो, आणि परमेश्वराप्रत नेणारे मार्गहि पण तसेच अनंत आहेत. "

शिष्य ह्मणाला " हां, समजलों. घराच्या छपरावर कसें जावें हेंच मुख्य उद्दिष्ट. उपाय किंवा साधनें भिन्न असतील. महाराज, आपण नेहमीं सांगतां त्याप्रमाणें एक मोठी दोरी, एक वेळू, एक शिडी किंवा एक पक्का जिना इत्यादि साधनांपैकीं कोणतेंहि चालेल. "

सद्गुरु ह्मणाले " खरेंच, हें तुला समजलें ही **परमेश्वराची कृपाच** होय. त्याच्या कृपेवांचून संशयनिवृत्ति होत नाहीं. खरें पहातां, देवाविषयीं आमची वृत्ति मारुतिरायांसारखी असावी. ते रामचंद्रास ह्मणतात ' महाराज, मी तिथि, नक्षत्रें आणि मुहूर्तें यांविषयीं फिकीर करीत नाहीं. मला मुख्य काय पाहिजे आहे, तं हें, कीं—**माझ्या रामाचें ध्यान कसें करावें.**'

**एक अत्यावश्यक गोष्ट—भक्ति.**

समज, तूं आंबे खाण्याकरितां एका बागेंत जातोस. तेथें प्रथम शेंकडों अशा वृक्षांची, हजारों अशा वृक्षांच्या फांद्यांची, आणि लाखों अशा पानांची गणती करणें तुला जरूर आहे काय ? खचित नाहीं ! उलट **एकदम आंबे खाण्यास तूं सुरू करावेंस**. तसेंच, देवाविषयीं निरनिराळे वाद व कल्पना करीत बसणें व वेळेचा व शक्तीचा दुरुपयोग करणें, हें निरुपयोगी आहे. प्रत्येकानें व्यर्थ कालक्षेप करण्याचें सोडून देऊन आपलें पहिलें, मुख्य व महत्त्वाचें कर्तव्यकर्म—देवावर प्रेम करणें, प्रेम, भक्ति वाढविणें—करण्यास ताबडतोब लागावें "

शिष्य ह्मणाला " माझें या जगांतील काम सध्यां आहे त्यापेक्षां थोडें कमी व्हावें, अशी माझी फार इच्छा आहे. कामाच्या निकडी-मुळें देवाकडे मन लागत नाहीं, नव्हे काय ?"

**जगांतील काम.**

सद्गुरु ह्मणाले " होय, तसेंच. पण ज्ञान्यानें अनासक्त राहून काम करावें. असें केलें तर कामापासून कोणताहि उपसर्ग पोहोंचणार नाहीं. "

शिष्य ह्मणाला " पण अशी स्थिति होणें हें देवाच्या साक्षात्कारापासून प्राप्त झालेल्या वाढत्या इच्छाशक्तीवर अवलंबून आहे. प्रथम देवाचा साक्षात्कार, नंतर अनासक्तपणें कर्म. असेंच कीं नाहीं, महाराज ? "

सद्गुरु ह्मणाले " तुझें ह्मणणें बरोबर आहे, असें मला कबूल केलें पाहिजे; पण या सर्व गोष्टींविषयीं तूं पूर्वजन्मीं इच्छा केली असली पाहिजेस. आतां तुझें कर्तव्यकर्म—कर्मबंधन हळुहळू कमी होऊन नाहींसें व्हावें ह्मणून ईश्वराच्या भक्ती-विषयीं अविरत प्रार्थना करणें, हेंच आहे. "

शिष्य उसासा टाकून ह्मणाला " घोडा पळून गेल्यानंतर पागेला कुलूप घालण्यासारखेंच हें आहे, असें मला वाटतें. "

सद्गुरु ह्मणाले " ईश्वराची भक्ति ( प्रेम ), आनंद याचा कधीं तूं अनुभव घेतला आहेस काय ? "

सद्गुरु पुढें ह्मणाले " यदृच्छालाभाच्या तत्वाप्रमाणें—स्वतः काळजी अगर खटपट न करितां ज्या कांहीं वस्तु आपोआप प्राप्त होतात, त्यांचाच उपयोग करावा—या तत्वा-प्रमाणें आचरण ठेवण्याचा प्रयत्न करा. संकटकाला-करितां कांहीं तरतूद करून ठेवावी, असा विचारहि मनांत आणूं नका. "

**दैवी आनंद. उद्यांची काळजी बाळगूं नका !**

सद्गुरु पुढें ह्मणाले " मी जें कांहीं मोहक भाषण करितों, त्यामुळें लोक माझ्याकडे ओढिले जातात काय ? ते मजविषयीं काय ह्मणतात ? तूं जेव्हां माझ्याकडे पहातोस तेव्हां तुला काय वाटतें ? "

**माझ्याविषयीं तुझें काय मत आहे ?**

*शिष्य ह्मणाला* " येथें एकाच पुरुषांत ( आपल्या ठिकाणीं ) सर्वोत्कृष्ट दिव्य ज्ञान, अत्युत्कट भक्ति, अत्युत्तम वैराग्य आणि याशिवाय विलक्षण सहजावस्था हीं सर्व एकवटलेलीं आहेत. या सहजावस्थेमुळेंच लोक आपल्या-पासून दूर राहतात. अगदीं भोळ्या आणि साध्या अशा दिसणाऱ्या तुम्हांपासून

जनसमूह दूर राहतो; पण याच गुणामुळें कांहीं शेलकी मंडळी मात्र आपल्याकडे विशेष आकर्षिली जाते. त्यांना हें आश्चर्य वाटतें, कीं, मानवी बुद्धीला अतर्क्य असे आध्यात्मिक अनुभव संपादूनहि असा साधेपणा राखणें हें मनुष्याला शक्य कसें आहे ? ज्या नदीमधून मोठमोठीं लढाऊ जहाजें पार निघून गेलीं आहेत ती नदी एकाद्या लहान ओढ्याप्रमाणें दिसावी असा हा प्रकार आहे."

सद्गुरु हंसत ह्मणाले "घोषपारा येथें एक वैष्णवांचा पंथ आहे. त्या पंथाचे लोक असें ह्मणतात, कीं, आपण स्वतः साधे सरळ ( सहज ) झाल्यावांचून सहजाकडे ( देवाकडे ) आपल्याला जातां येत नाहीं."

सद्गुरूंनीं नंतर विचारिलें "मला अभिमान ( अहंकार ) आहे काय ?"

शिष्य ह्मणाला "होय, थोडासा आहे आणि तो पुढील कारणांकरितां बाळगिला आहे. ( १ ) देहाच्या संरक्षणाकरितां; ( २ ) भक्ति वाढविण्याकरितां; ( ३ ) भक्तांच्या समागमांत जाऊन मिळण्याकरितां; ( ४ ) दुसऱ्यांनां उपदेश देण्याकरितां. येथें हेंहि सांगितलें पाहिजे, कीं, पुष्कळ प्रार्थना करून हे उद्देश बाळगिले आहेत. तुमची—तुमच्या आत्म्याची सहजावस्था ह्मणजे समाधीच होय, अशी माझी कल्पना आहे. मी असें ह्मणतों, कीं, तुमचा अहंकार हें तुमच्या प्रार्थनेचें फल होय."

सद्गुरु ह्मणतात "होय, **पण मी हें ( हा अहंपणा ) ठेविलें नाहीं. तें माझ्या जगन्मातेचें काम.**"

शिष्य ह्मणाला "परवां आपण नारदाविषयीं आणि त्याच्या आत्म्याविषयीं पंडित शशधरपाशीं बोलत होतां. आपण ह्मटलें, कीं, सर्व कामना पूर्ण करणाऱ्या अशा कल्पतरूपाशीं जावें, आणि मग प्रार्थना करावी. ज्या तऱ्हेची प्रार्थना करावी त्या तऱ्हेचा वर मिळणार. देव हाच कल्पतरु !"

सद्गुरु ह्मणतात "होय. पण प्रार्थना ऐकून वर देणें हें माझ्या जगन्मातेच्या हातीं आहे."

सद्गुरु पुढें ह्मणाले "हें पहा, व ह्मणतो कीं हें जग किती भयंकर!"

**जग ( संसार ) भयानक आहे.**

शिष्य ह्मणाला "पण मला वाटतें, तो लोकांचें ऐकून असें ह्मणतो. तो वयानें लहान असल्यामुळें त्याला स्वतःचा अनुभव नाहीं."

सद्गुरु ह्मणाले " होय, होय, हेंच खरें. नरेंद्र किती निष्कपटी आहे !"

शिष्य ह्मणाला " त्याचा चेहराच मोहक आहे. त्याचे डोळे किती पाणीदार !"

सद्गुरु ह्मणाले " डोळेच नव्हे, तर त्याचें सर्वच तसें आहे. त्याचें लग्न करावें असा घाट जेव्हां त्याच्या घरच्या मंडळीनें घातला, तेव्हां तो त्यांनां ह्मणाला, कीं, ' तुह्मी मला कां बुडवून टाकितां ? एकदां माझें लग्न झालें, कीं, माझें सर्व आटपलेंच ! "

**सरलतेचा उपदेश लग्नापासून तोटे.**

नंतर सद्गुरु आणि शिष्य यांचें खालील संभाषण झालें. राखाल हजर होता.

सद्गुरु हंसत ह्मणाले "दिवसाचे काबाडकष्ट करून झाले, कीं, मग आपल्या पत्नीचा सहवास फारच सुखकर असतो, असें लोक ह्मणतात. "

सर्व हंसतात.

शिष्य ह्मणाला " पत्नी ह्मणजे मोठें सुखाचें स्थान, अशी ज्यांची कल्पना आहे त्यांनां तसें वाटत असेल. ( राखालकडे वळून, जनांतिक ) माझी उलट-तपासणी चाललेली आहे, आणि सद्गुरु सूचक प्रश्न विचारीत आहेत."

सद्गुरु हंसत ह्मणतात " आया नेहमीं ह्मणतात, कीं, माझ्या मुलाला एकाद्या झाडाचा आसरा मिळवून दिला—ज्या झाडाच्या सावलींत बसून या संसाराटवींत त्याला विश्रांति घेतां येईल—ह्मणजे मग आमचें काम झालें. झाडाचा आसरा ह्मणजे पत्नी !" अधिकच हंशा पिकतो.

शिष्य ह्मणाला " आईबाप पुष्कळ तऱ्हेचे असतात. संसारबंधनापासून मुक्त झालेले आईबाप आपल्या मुलांचें लग्न करून सोडण्याच्या भरांत पडणार नाहींत. तसें ते करितील तर ते खरेच मुक्त ह्मणावयाचे. "

सद्गुरु किंचित् हंसले. बाकीची मंडळी खोलींतून बाहेर गेली.

सद्गुरु शिष्याला ह्मणाले " माझ्या आवेशाच्या वेळीं काय घडतें, असें तुला वाटतें ? "

शिष्य ह्मणाला 'महाराज, त्या वेळीं आपला आत्मा वेदांत सांगितलेल्या सहाव्या भूमिकेंत असतो. आणि आपण बोलणें सुरू केलें, कीं, पांचव्या भूमिकेवर येतो. "

**आवेश—देवाचें दर्शन (साक्षात्कार)ज्या शांत आणि सुखकर स्थितींत होतें ती स्थिति.**

सद्गुरु ह्मणाले " मी त्याच्या हातांतील एक अत्यंत नम्र साधन आहें. तोच हें सर्व कांहीं करीत आहे. मला कांहीं माहीत नाहीं."

# नवम परिच्छेद—अध्याय चवथा.

शिष्य ह्मणाला "किती विलक्षण निरहंकारवृत्ति ही! महाराज, यामुळेंच लोक आपल्याकडे आकर्षिले जातात."

शिष्य पुढें ह्मणाला "आपण असें सांगितलें आहे, कीं, माया ह्मणजे नातलग व इष्ट मित्र यांवर आसक्ति, आणि दया ह्मणजे सर्व मनुष्यांवर—नव्हे ईश्वराच्या सर्व प्राण्यांवर सारखें प्रेम. मला याचा अर्थ नीट समजत नाहीं. दया ही प्रवृत्ति (जगाला किंवा संसाराला चिकटविणारी) नव्हे काय?"

**दया—सर्वांवर प्रेम.**

सद्गुरु ह्मणाले "दया ही कांहीं वाईट वृत्ति नव्हे. ती उच्च वृत्ति असून देवाप्रत नेणारी आहे."

शिष्य ह्मणाला "दयेचा प्रवृत्तिमार्गांत—ईश्वरापासून दूर नेणाऱ्या मार्गांत—अंतर्भाव होत नाहीं काय?

शिष्य आणखी ह्मणाला "महाराज, या विषयाकडे पूर्ण लक्ष्य लावावें असें माझ्या मनांत आहे. आणि याकरितां माझें संसारांतील काम कमी व्हावें अशी फार इच्छा आहे."

**शिष्याची पुन्हां विनवणी.**

सद्गुरु ह्मणाले "होय. ही इच्छा स्वाभाविकच आहे. देव तुला साहाय्य करील असें मी खात्रीनें सांगतों. तुझा विश्वास साकार किंवा निराकार परमेश्वरावर आहे?"

शिष्य ह्मणाला "मी गुणांपर्यंत जातों. ईश्वराला गुणधर्म आहेत. नामरूपाच्या, आकाराच्या साहाय्यावांचून निराकाराची कल्पना करणें अशक्य नाहीं काय? तें कसेंहि असो, आह्मांला आकाराची—प्रतिमेची मदत घेतलीच पाहिजे."

**निराकार कीं साकार.**

सद्गुरु ह्मणाले "भक्ति वाढविणाऱ्या साकार सगुण देवतेच्या ध्यानाला मी महत्त्व देतों, हें तुझ्या लक्ष्यांत आलें ना?"

शिष्य ह्मणाला "पूज्य महाराज, पंडित शशधर हे भक्तिमार्गांत आहेत काय? ते आपली भक्ति वाढवीत आहेत काय?"

सद्गुरु ह्मणाले "होय. पण त्याचा कल ज्ञानमार्गाकडे अधिक आहे. अशा लोकांचा एक निराळाच वर्ग असतो. हा ज्ञानमार्ग फार कठिण आहे, हें त्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं."

कांहीं वेळपर्यंत नंतर कोणीहि बोलले नाहींत. हंसतमुख आणि दिव्यानंदानें चकाकणाऱ्या सद्गुरूंच्या चेहऱ्याकडे, सद्गुरूंच्या कृपेनें सामर्थ्य मिळावें आणि

परमार्थाची वाट सांपडावी अशा आतुरदृष्टीनें (हेतूनें) पाहणाऱ्या, आणि सद्गुरूंच्या चरणकमलाकडे नम्रपणें बसणाऱ्या त्या शिष्याच्या आत्म्याचें निरीक्षण सद्गुरु इतका वेळ करीत होते काय?

सद्गुरु उत्तेजनपूर्वक स्वरानें ह्मणाले "मनानें जरी संसाराचा त्याग केला, तरी पुरे आहे."

संन्यास किंवा त्याग.

शिष्य ह्मणाला "अशक्ताकरितां हा उपदेश असावा असें मला वाटतें. श्रेष्ठ लोकांकरितां खरोखरीच त्याग पाहिजे. **त्यांनीं मनानेंच नव्हे, तर बाह्यतः सुद्धां संसाराचा त्याग केला पाहिजे.**"

सद्गुरु ह्मणाले "मीं वैराग्याविषयीं जें कांहीं सांगितलें, तें तूं सर्व ऐकिलें आहेस."

शिष्य ह्मणाला "होय. वैराग्याचा अर्थ, या जगाच्या वस्तूंविषयीं अप्रीति (अनासक्ति) एवढाच आहे, असें मी समजत नाहीं. अनासक्ति आणि दुसरें एक मिळून वैराग्य. **तें दुसरें ह्मणजे देवाविषयीं प्रेम (भक्ति) होय.** महाराज, देवाचा साक्षात्कार ह्मणजे काय?"

देवाला पाहणें ह्मणजे काय?

सद्गुरु ह्मणाले "देवाचा साक्षात्कार दुसऱ्यांनां चांगलासा सांगतां येत नाहीं. जी कांहीं स्थिति प्राप्त होते ती कांहीं अंशीं सांगतां येते. नाटक पहाण्याकरितां तूं थिएटरांत गेला असशीलच. खेळ सुरू होण्याच्या पूर्वीं राजकारण, घरगुती गोष्टी, कचेरींतील कामें, इत्यादि निरनिराळ्या गोष्टींविषयीं लोक परस्परांशीं बोलण्यांत गुंग झालेले असतात, हें तूं पाहिलें आहेस. परंतु पडदा उघडून खेळास प्रारंभ होतो न होतो, तोंच पर्वत, नद्या, झोंपड्या, मनुष्यें इत्यादि नवीन देखावे दृष्टीस पडतात. ताबडतोब सर्व दंगा, लोकांचें संभाषण एकदम बंद होतें, आणि प्रत्येक प्रेक्षक आपल्यासमोर दिसणाऱ्या देखाव्यांत पूर्ण लीन होऊन जातो. ईश्वरी साक्षात्कार झालेल्या मनुष्याची स्थिति बहुतेक अंशीं अशीच असते."

प्रेम आणि संसारी जीव.

शिष्य ह्मणाला "आपण मघाशीं सांगितलें आहेच, कीं, प्रेमरज्जूनें ईश्वराला बांधितां येतें. प्रेम पदरीं असेल तर ईश्वराला हांक मारतांच तो धांवून आलाच पाहिजे. पण प्रश्न असा आहे, कीं, गृहस्थाश्रम्याला असें प्रेम साध्य होईल काय?"

सद्गुरु कांहीं वेळ स्तब्ध राहिले.

## नवम परिच्छेद–अध्याय चवथा.

शिष्य ह्मणाला "हरिपाद हा पंडिताप्रमाणें पुराण सांगतो, उत्तम पुराणिका प्रमाणें त्याला प्रल्हादाची गोष्ट सांगतां येते."

सद्गुरु म्हणाले "खरेंच का? परवां त्याचे डोळे फारच (सुजलेले) त्रस्त असे दिसले. मग मीं त्याला पुसलें, कीं, तूं अतिशय ध्यान करितोस काय? त्यानें आपली मान खालीं घेतली. मीं ह्मटलें 'असें अति करूं नये' अति सर्वत्र वर्जयेत्."

हरिपाद.

रात्रीचे नऊ वाजले. इतक्यांत अधरलाल सेन हे आले. नंतर कांहीं वेळ चितागांगमधील चंद्रनाथ टेंकड्याजवळ असलेल्या सीताकुंडांतील तप्त पाण्याविषयीं भाषण चाललें. कुंडांत वरून आगीच्या ज्योति दिसतात, असें कोणीं सांगितलें.

सद्गुरु अधरला उद्देशून ह्मणाले "याबद्दल तुम्ही काय ह्मणतां?"

शिष्यांपैकीं एक अधरला ह्मणाला "पाण्यांत फास्फरस असतो त्यामुळें हें होतें, नव्हे काय?"

अधरलाल सद्गुरूंकडे वळून ह्मणाले "फास्परस जळतो, फास्परस पाण्यांत असतो."

सद्गुरु अधरला उद्देशून ह्मणाले "पहा, येथें राम चक्रवर्ति कितीतरी उपयोगी पडतो! तो नसता तर हरिपाद आणि दुसरा शिष्य यांनां जेवावयास बोलाविणारा दुसरा कोणी नाहीं. सर्व ध्यानांत इतके लीन होऊन जातात."

शिष्यांवर प्रेम.

अधर हा डेप्युटी मॅजिस्ट्रेट होता. त्याला राम चतर्जींचें (पुजाऱ्याचें) नांव सांगून ओळख करून देतांना सद्गुरूंनीं त्याचा गौरव केला. अधर अशा लोकांनां चांगली मदत करीत असे.

---

# दशम परिच्छेद.

## नरेंद्र आणि इतर शिष्य यांसह दक्षिणेश्वराच्या देवालयांत.

### १८८५.

### अध्याय पहिला.

### समाधि. सद्गुरु भक्तियोग सांगतात.

श्रीरामकृष्ण ओट्यावर बसले होते. त्यांची पूर्ण समाधि लागली होती. शिष्य आणि दुसरे भक्त जमिनीवर पसरलेल्या चटयांवर बसले होते. सर्वांची दृष्टि सद्गुरूंकडे लागलेली होती. या लोकांमध्यें महिमाचरण, राम (दत्त) मदनमोहन, नबे, मी आणि दुसरी कांहीं मंडळी होती. नरेंद्र कांहींसा उशीरां आला.

ह्या दिवस रविवार, १८८५ मार्चची १ ली तारीख, फाल्गुन शुद्ध १५ हा होता. या दिवशीं दौलतजत्रेचा उत्सव असतो.

सद्गुरूंची समाधि उतरत चालली, आणि वाचा पुन्हां त्यांनां प्राप्त होऊं लागली. अद्याप त्यांचें मन दैवी प्रदेशांत होतें.

सद्गुरु महिमाचरणकडे वळून ह्मणाले "महाराज, भक्तीच्या आवश्यकतेविषयीं कांहींतरी बोला. देवाची भक्ति हाच एक तरणोपाय कसा आहे हें मला सांगा."

महिमाचरण 'नारद पंचरात्र' ग्रंथांतले उतारे तोंडानें ह्मणून ह्मणाला "तप आचरूं इच्छिणाऱ्या नारदाला एका आकाशवाणीनें असें सांगितलें, कीं, '(१) भक्तींनें ईश्वराची पूजा केली तर जपतपाची काय जरूरी आहे? तशी जर ईश्वराची उपासना केली नाहीं, तर पुन्हां त्या जपतपाची काय आवश्यकता? अंतर्यामीं आणि बाहेर ईश्वराचा साक्षात्कार झाल्यावर जपतपाची काय जरूरी? तसा जर ईश्वराचा साक्षात्कार घेतला नाहीं, तर जपतपाचा थोडाच उपयोग होईल? (२) माझ्या बाबा, मुला, आतां अधिक जपतपाच्या उपास-तापासाच्या लचांडांत पडूं नको! दिव्य ज्ञानाचा सिंधु—शिव त्याकडे ताबड-तोब जा. त्याच्याकडून देवाची भक्ति कशी करावी हें शीक. कधींहि स्खलन न पावणारी अखंड अशी भक्ति विष्णुभक्तांनींच वर्णावी. आकडी असलेल्या

मोठ्या कोयत्याप्रमाणें ही भक्ती संसारबंधनें तोडून टाकते.' अरण्याच्या एकांतवासांत तपश्चर्या करीत असतांना नारदांनीं हे शब्द ऐकले."

सद्गुरु ह्मणाले "देवाची ही भक्ति दोन प्रकारची आहे. ( १ ) शास्त्रांत सांगितलेली भक्ति, एका विशिष्ट तऱ्हेनें पूजा करावी, किंवा परमेश्वराच्या नांवाचा अमुक वेळां जप करावा, इत्यादिकांचा या भक्तींत समावेश होतो. ही शास्त्रोक्त भक्ति होय. या भक्तीपासून ब्रह्मज्ञान ( समाधि ) प्राप्त होईल. या रीतीनें जीवात्म्याचा परमात्म्यांत लय होऊन तो पुन्हां कधीं परतणार नाहीं. साधारण भक्तांची ही स्थिति होते. ईश्वराचे अवतार अथवा विभूति—ईश्वराचे पुत्र, ईश्वराचेच जे आहेत, त्यांची स्थिति याहून निराळी. यांची भक्ति ह्मणजे नुसता एकादा जप, मंत्र अशी नसते. ती आंतून उद्भवते. तिचा उगम आत्मनिर्झरापासून—अंतरांतील झऱ्यापासून होतो. चैतन्यासारख्या ईश्वरी अवतारांनां आणि त्यांच्यासारख्या साधूंनां समाधींत पूर्ण ब्रह्मज्ञान तर होतेंच, पण त्याशिवाय ते त्या उच्चस्थलाहून परत येतात आणि आपली अहंवृत्ति ठेवून, पिता, माता या न्यायानें परमेश्वराची भक्ति करितात. 'नेति नेति' असें ह्मणत जिन्याच्या पायऱ्या एकामागून एक ओलांडीत ते छपरावर जातात. वर गेल्यावर 'हेंच तें' असें ते ह्मणतात. लवकरच त्यांनां विटा, चुना, रेती इत्यादि ज्या वस्तूंचा जिना केलेला आहे, त्याच वस्तूंचें छपरहि केलेलें आहे, असें समजून येतें. ह्मणून ते खालीं वर एकसारखे जात असतात. कांहीं वेळ ते छपरावर असतात, तर कांहीं वेळ जिन्याच्या पायऱ्यांवर रममाण होतात."

चैतन्य आणि रामकृष्ण.

सद्गुरु पुढें ह्मणाले "छप्पर ह्मणजे समाधींत ज्याचा साक्षात्कार घेतला, असें ब्रह्म होय. या स्थितींत इंद्रियजन्य ज्ञानाचा संपर्क नसतो. जिना ह्मणजे दृश्य जग—नामरूपाचें जग होय. छपरावर गेल्यावर जग ( जिना ) हें त्या अव्यक्ताचें—ब्रह्माचें एक व्यक्त स्वरूपच आहे, असा साक्षात्कार त्यांनां येतो. जींत जीवात्मा परमात्म्याशीं एकरूप होऊन जातो, अशी समाधि शुकदेवाला प्राप्त झालेली होती. परीक्षित राजाला भागवत धर्माचा उपदेश त्यानें करावा ह्मणून सांगण्यास परमेश्वरानें नारदास त्याच्याकडे पाठविलें. शुकदेवाची स्वारी एकाद्या वृक्षाच्या बुंधाप्रमाणें किंवा दगडाप्रमाणें स्वस्थ **'काय जगाचें माझें नातें—वृत्ति जगाला मेली ग !'** या चरणांत वर्णन केल्याप्रमाणें

बसली होती. नारदानें आपला वीणा सुरू करून चार श्लोकांत परमेश्वराची स्तुति केली. पहिल्या श्लोकानें शुकदेवाच्या अंगावर रोमांच उभे राहिले. दुसऱ्यानें त्याच्या डोळ्यांत अश्रु आले. नंतर त्याला आपल्या अंतर्यामीं परमेश्वराचें सगुण रूप दिसूं लागलें. नंतर तो आपली समाधि उतरवून खालीं आला व त्यानें नारदापाशीं बोलण्यास आरंभ केला. याप्रमाणें शुकदेवापाशीं दिव्य ज्ञान व परमेश्वराची भक्ति हीं दोन्हीं होतीं."

सद्गुरु पुढें ह्मणाले "हनुमानाला साकार आणि निराकार अशा परमेश्वराचा साक्षात्कार झाला होता, तरी त्यानें आपले पुढील दिवस चिद्घन आणि आनंद-घन अशा रामस्वरूपाचें ध्यान करण्यांत घालविलें. प्रल्हाद आणि नारद यांची बहुतेक अंशीं हीच स्थिति होती. त्यांनां अव्यक्त ब्रह्माचा साक्षात्कार झाला होता, तसाच साकार परमेश्वराचाहि त्यांनीं अनुभव घेतला होता. प्रल्हादानें 'अहं ब्रह्मास्मि' याचा, तसेंच 'मी तुझा सेवक तूं माझा धनी,' याचाहि साक्षात्कार घेतला होता. नारद परमेश्वराच्या भक्तींत रममाण होऊन आपले दिवस घालवीत असतो."

सद्गुरु पुढें म्हणाले "या भक्तीनेंच आयुष्याचें कोडें उलगडतें. जोंपर्यंत मी मी ह्मणणारा अहंकार आहे, तोंपर्यंत मीं कसें जगावें हा प्रश्न माझ्यापुढें आहे. इंद्रियें, जे विषय, जीं सुखें प्राप्त करून देतात त्यांचा उपभोग घेऊन मी तृप्त रहावें काय? छे, मी (अहंकार) परमेश्वराचा—जगाचा आणि त्यांतील काल्पनिक सुखांचा नव्हे—सेवक होऊंदे. हे देवा, तूं माझा यजमान, मी तुझा सेवक. जगाचा आणि जगाच्या सुखांचा उपभोग मला नको, तर शाश्वत, अखंड आनंद, परमेश्वराची अखंड भक्ति मला मिळो."

**दिव्य भक्तीचा अहंकार आणि आयुष्याचें कोडें.**

सद्गुरु पुढें ह्मणाले "मीपणा किंवा अहंकार परमेश्वरापासून दूर नेतो, पण ईश्वरी ज्ञानाचा—अर्भकाचा अहंकार—देवाप्रत नेतो. समाधी-नंतर लोकांनां उपदेश करण्याकरितां शंकराचार्यांनींहि या विद्येचा अहंकार ठेविला होता. अर्भकाचा अहंकार (मीपणा) या जगाच्या वस्तूंशीं आसक्त राहत नाहीं. मुलांनां केव्हां केव्हां राग येतो, पण नंतर त्याची छटा कांहीं राहत नाहीं. मूल कुड्यांकरतां एक घर तयार करतें. पण लगेच तें सर्व विसरून जातें. आपल्या संवगड्यावर तर त्याचें अतोनात प्रेम असतें. पण ते जर संवगडी कांहीं वेळ दृष्टिआड झाले, तर तें नवीन संवगडी मिळवितें

आणि जुन्याविषयीं सर्व कांहीं विसरून जातें. याप्रमाणें कोणत्याहि वस्तूंशीं मुलाची आसक्ति असत नाहीं. परमात्म्याशीं एकरूप होऊन जाणाऱ्या स्थितीनंतर —समाधीनंतर दिव्यभक्तियुक्त अहंवृत्ति ठेविल्यानें आयुष्याचें कोडें सुटतें."

सद्गुरु पुढें ह्मणाले " साधारणपणें सर्व मनुष्यांनीं ईश्वराची भक्ति वाढवावी, याचें दुसरें एक कारण असें आहे, कीं, अहंकार हा टाकून देतां येत नाहीं. बुद्धीनें, तर्कानें कांहीं वेळ त्याचें निराकारण करतां येईल; पण पुन्हां अहंकार वर येतोच. मी मी ह्मणणारा अहंकार तुह्मांला झाडून टाकतां येणार नाहीं. जीवात्मा हा पाण्याचा घट आहे, आणि परमात्मा हा, ज्यामध्यें हा पाण्याचा घट लय पावतो असा अमर्याद सिंधु आहे. अनंत अगर अव्यक्त असें ब्रह्म आंत बाहेर सर्व ठिकाणीं भरलेलें आहे, असें तर्कानें तुला सिद्ध करतां येईल; परंतु जोंपर्यंत तूं तर्क अगर वादविवाद करितोस तोंपर्यंत पाण्याचा घट हा रहणारच. तो टाकून देतां येणार नाहीं. जोंपर्यंत तूं तर्क करितोस, तोंपर्यंत अव्यक्त ब्रह्म तुला सापेक्ष आहे. हा टाकून न येण्याजोगा पाण्याचा घट दिव्य भक्तीचा अहंकार—अहंवृत्ति आहे. तोंपर्यंत मी तूं हे दोन्ही आहेत. ह्मणून तूं यजमान, आणि मी सेवक आहें. कितीहि उत्तम बुद्धिवाद केला, तरी अहंवृत्ति अगर मीपणा हा राहतोच. "

---

## अध्याय दुसरा.

## श्रीरामकृष्ण नरेंद्राला त्याग शिकवितात.

इतक्यांत नरेंद्रानें येऊन सद्गुरूंनां नमस्कार केला. सद्गुरु नरेंद्राशीं बोलूं लागले आणि ओट्यावरून खालीं येऊन जमिनीवर पसरलेल्या चटईवर बसले. खोलींत कलकत्त्याचे आणि दुसऱ्या ठिकाणचे भक्त आणि प्रेक्षक भरले होते.

सद्गुरु नरेंद्रास ह्मणाले " बेटा, आतां तूं बरा आहेस ना ? गिरीश घोसच्या घरीं तूं नेहमीं जात असतोस, हें खरें काय ? "

नरेंद्र ह्मणाला " होय महाराज, मी केव्हां केव्हां त्याला भेटण्यास जात असतों."

गिरीश हा नवीन शिष्य १८८४ आक्टोबरांत सद्गुरूंला शरण आला होता. गिरीशची श्रद्धा फार मोठी, दोन्ही बाहूंनीं कवळतां न येण्यासारखी आहे, असें सद्गुरु वारंवार ह्मणूं लागले. तशीच त्याची परमेश्वराची भक्तिहि उत्कट असून

घरीं तो नेहमीं ईश्वराचें ध्यान करितो, आणि ईश्वरापासूनच मिळणाऱ्या आनंदांत धुंद असतो. त्याच्या घरीं नरेंद्र, हरिपाद, नारायण, विनोद इत्यादि शिष्य मंडळी भेटण्यास जात असत. एकाच विषयावर—सद्गुरूंविषयीं—नेहमीं त्यांचें भाषण चाललेलें असे.

गिरीश गृहस्थाश्रमी होता; परंतु ईश्वराचें काम करण्याकरितां नरेंद्र संन्यास घेणार, हें सद्गुरु जाणत होते. नरेंद्र कनककांता यांचा त्याग करणार होता.

सद्गुरु ह्मणाले " गिरीशच्या घरीं तूं नेहमीं त्याला भेटण्यास जातोस, हें खरें आहे का? कांदे लसूणाचा प्याला पुष्कळदां धुतला तरी त्याची घाण जाणार नाहीं. ज्या मुलांनीं जगाचा अनुभव घेतला नाहीं आणि कनककांता यांनां स्पर्श केला नाहीं, तीं पवित्रपात्रें—कोणत्याहि तऱ्हेच्या दुर्गंधीपासून मुक्त अशीं पात्रें होत. ज्यांनीं जगाचा अनुभव बराच कालपर्यंत घेतला आहे, ते लसणीचा लेप दिलेल्या भांड्याप्रमाणें होत. कावळ्यांनीं टोंचून दूषित झालेल्या आंब्याप्रमाणें हे होत. ज्या तरुणांनीं जगाचा—कनककांता यांचा अनुभव घेतला नाहीं, स्पर्शसुद्धां केला नाहीं, ते, दूध ज्यांत सुरक्षित ठेवितां येईल अशा मृत्तिकापात्राप्रमाणें आहेत. उलटपक्षीं, संसारी मनुष्य ज्यांत एकदां दुधाचें दहीं बनलेलें होतें अशा मृत्तिकापात्राप्रमाणें होत. अशा भांड्यांत दूध ठेवणें बरें नव्हे. अशांत दूध विरजून जाण्याचाच संभव अधिक. पवित्र तरुण आत्म्यांनां शिकविलेलें ज्ञान किंवा भक्ति, नवीन भांड्यांत सुरक्षित ठेवण्याजोग्या दुधाप्रमाणें आहे. संसारी मनुष्यांस हें शिकविलें, तर एकदां विरजून दहीं झालेल्या भांड्यांत ठेविलेल्या दुधाप्रमाणें व्यर्थ ( टाकाऊ ) होईल."

**उत्तम गृहस्थ किंवा उत्तम संन्यासी.**

सद्गुरु पुढें ह्मणाले " माझ्या लाडक्या, ईश्वराची इच्छा करणारे असे गृहस्थाश्रमी भक्त खरोखर असतात. पण यांचा एक निराळाच वर्ग असतो. देवाकडे त्यांचें मन असतें ( योग ) तसेंच विषयोपभोगाकडेहि असतें (भोग). रामायणांत सांगितलें आहे, कीं, रावण याच वर्गांपैकीं होता. जगांतील सुंदरवस्तु त्याला हव्या होत्या, तसाच ईश्वरहि त्याला पाहिजे होता. देव, नाग, गंधर्व, असुर यांच्या सुंदर कन्यांशीं त्यानें लग्न केलें, आणि शेवटीं तो परमेश्वरांत ( रामांत ) मिळून गेला. पुराणांत सांगितलें आहे, कीं, असुरांचें ऐहिक सुखोपभोगाकडे लक्ष होतें. तसेंच शेवटीं त्यांनां ईश्वरप्राप्ति झाली."

**गृहस्थाश्रमी भक्तांच्या उणीवा.**

# दशम परिच्छेद—अध्याय दुसरा.

नरेंद्र ह्मणाला "गिरीश घोष अलीकडे वाईट लोकांची संगत टाळीत आहे."

सद्गुरु ह्मणाले "एका जागीं कांहीं संन्यासी बसले होते. इतक्यांत त्यांच्याजवळून एक तरुण स्त्री गेली. सर्वजण पूर्वीप्रमाणेंच ईश्वराचें ध्यान करूं लागले. एकानें मात्र तिरप्या डोळ्यांनीं तिच्याकडे पाहिलें. स्त्रीसौंदर्यानें मोहित झालेला हा इसम पूर्वी गृहस्थाश्रमी होता, आणि संन्यास घेतेवेळीं त्याला तीन मुलें होतीं."

सद्गुरु पुढें ह्मणाले "लसूण पाण्यांत चोळून त्याचें मिश्रण करून तें पुष्कळ वेळ प्याल्यांत ठेविलें, तर प्याल्याची घाण काढून टाकणें कठिण नाहीं काय ? कडू लिंबाला मधुर आंबे लागणें शक्य आहे काय ? हा चमत्कार करून दाखविणें सिद्धि मिळविलेल्या पुरुषासच शक्य आहे; पण प्रत्येकाला या सिद्धि मिळत नसतात ! होय, जगाचा—कनककांतेचा—ज्यांनीं अनुभव घेतला नाहीं, अशा तरुणांप्रमाणें पवित्र व शुचि होणें हें संसारी मनुष्यास शक्य आहे; तसेंच कडूलिंबाला मधुर आंबेहि लागणें शक्य आहे; पण हे चमत्कार करण्याची शक्ति सर्वशक्तिमान् प्रभूकडूनच आली पाहिजे. देवाला कांहीं अशक्य नाहीं. पण देवाकडून अशी देणगी—शक्ति किती क्वचित् मिळते ! मुख्य गोष्ट ही आहे, कीं, **तूं तुझें सर्व मन परमेश्वराकडे लाविलें पाहिजेस.**"

सद्गुरु पुढें ह्मणाले "संसारी मनुष्याला—गृहस्थाश्रम्याला किती तरी गोष्टींचा त्रास असतो ! देवाकडे लक्ष लावण्याला त्याला पुरेसा वेळ तरी मिळतो काय ? धर्मशास्त्रांत प्रवीण असलेल्या एका पंडिताची एका इसमास जरूरी होती. दररोज त्याच्याकडून धर्मग्रंथ ऐकावे, व अर्थ समजून घ्यावा, अशी त्याची इच्छा होती. त्याचा एक मित्र त्याला ह्मणाला 'हां ! मला असा एक पंडित माहीत आहे. आह्मांला पाहिजे तसाच तो आहे; पण त्यांत एक गोम आहे. त्याची कांहीं शेती आहे तिकडे त्याला पहावें लागतें. रोज त्याचे चार नांगर आणि आठ बैल नेहमीं काम करीत असतात, ह्मणून त्याला वेळ मिळत नाहीं.' पंडिताची जरूरी असणारा इसम ह्मणाला 'मित्रा, आतां तूं सांगितलास असा—शेती, नांगर, गुरें यांची रोज काळजी वाहणारा, आणि ज्याला फुरसत अगदीं मिळत नाहीं, असा पंडित मी शोधीत आहें काय ? छे, छे, ज्यापासून **ईश्वराचे गुणानुवाद** ऐकावयास मिळतील असा पंडित मला पाहिजे!' एक राजा एका विद्वान् पंडिताकडून रोज धर्मग्रंथ ऐकत असे. रोजचें श्रवण

आटोपल्यावर पंडित राजाला विचारी, कीं, ' हे राजा, मीं जें तुला वाचून दाखविलें, तें सर्व तुला समजलें काय ?' या प्रश्नाला राजा एवढेंच उत्तर देई, कीं, ' महाराज, या पवित्र धर्मग्रंथाचा अर्थ प्रथम आपण समजून घेतला पाहिजे !' घरीं गेल्यानंतर राजाच्या या शब्दांचा विचार रोज पंडित करीत असे. दररोज राजा मला तूं अर्थ प्रथम समजून घे असें कां ह्मणतो, याचा तो मनांत विचार करूं लागला. तो ब्राह्मण बराच धार्मिक असल्यामुळें कांहीं दिवसांनंतर त्याची जागृति होऊं लागली. जगाचा आणि ऐहिक सुखांचा वीट येऊन त्यानें जगाचा त्याग केला. एकांतवासांत जाण्याकरितां घर सोडून निघण्याच्या दिवशीं त्यानें राजाला निरोप पाठविला, कीं, ' हे राजा, सरतेशेवटीं मला धर्मग्रंथाचा अर्थ समजला. तो हाच, कीं, परमेश्वराकरितां सर्व कांहीं टाकून द्यावयाचें, सर्वांचा त्याग करावयाचा ! "

सद्गुरु पुढें ह्मणाले " संसारी गृहस्थाविषयीं माझी अशी कल्पना असल्यामुळें मी त्यांनां कमी लेखतों, असें तूं मानतोस काय ? छे, कधींहि नाहीं. माझें अद्वैतज्ञान मला असें सांगतें, कीं, प्रत्येक वस्तु—जिचें मला इंद्रियांकडून ज्ञान होतें—त्या अनंत परमात्म्याचें व्यक्त स्वरूप आहे. ह्मणून सर्व स्त्रिया माझ्या जगन्मातेचीं रूपें आहेत, असें मी पाहतों. याकरितां मी सर्व स्त्रियांनां सारखा मान देतों. मग ती एकादी नीच जातींतील स्त्री असो अगर एकादी उत्तम पतिव्रता असो ! "

सद्गुरु पुढें ह्मणाले " अरेरे, चिवड्यापेक्षां उत्तम जिन्नस ज्यांनां पाहिजे आहेत, अशा गिऱ्हाइकांनां व्यर्थ मी शोधीत ग्हहें ! प्रत्येक जण कनक आणि कांता यांच्यामागें लागलेला आहे. उच्च ध्येयाविषयीं अतिशय थोड्यांनां काळजी आहे. बहुतेक, स्त्रियांचें लावण्य, पैसा, मान, पदव्या, यांनींच मोहून जा तात. त्यांनां माहीत नाहीं, कीं, ईश्वराचा दिव्य साक्षात्कार—दैवी सौंदर्य याचा प्रभाव असा आहे, कीं, त्याच्यायोगें सर्वांत मोठें स्थळ ह्मणजे इंद्रपदहि मिळविण्याकरितां खटपट करणें योग्य नाहीं, असें वाटूं लागेल. "

सद्गुरु पुढें ह्मणाले " एक मनुष्य रावणास ह्मणाला ' सीतेचा प्राणनाथ राम, याचें रूप धारण करून तूं सीतेपाशीं कां जात नाहींस ?' रावणानें उत्तर दिलें 'हे मित्रा, माझ्या अंतर्यामीं मीं जर रामाला पाहिलें, जर मीं त्या दिव्य स्वरूपाचें ध्यान केलें, तर तिलोत्तमादि अप्सरा मला स्मशानांतील रक्षेप्रमाणें दिसूं लागतील. अप्सरा आणि त्यांचें लावण्य यांची तर गोष्ट राहोच. पण मी नंतर

ब्रह्मदेवाची पदवीहि तुच्छ लेखीन !' खरोखर, हे सर्व लोक—प्रत्येक गिऱ्हाईक चिवडाच मागत आहेत. ज्यांनीं जगाचा—कनककांतेचा अनुभव घेतला नाहीं, अशा पवित्र जीवांनांच, ईश्वरावर प्रेम करणें—हें एकच ध्येय असणें, ईश्वरावर सर्व मन असणें हें साधतें."

मनमोहन नांवाच्या गृहस्थाश्रमी शिष्याला उद्देशून सद्गुरु पुढें ह्मणाले "तुला जरा वाईट वाटेल, पण मला आतां सांगितलेंच पाहिजे. मीं राखालला असें ह्मटलें, कीं, माझ्या लाडक्या, पैसा किंवा दुसरी ऐहिक वस्तू याकरितां तूं कोणाचाहि नीच नोकर झालास, असें ऐकण्यापेक्षां तूं गंगेंत उडी घातलीस आणि बुडून मेलास असें मीं ऐकिलें, तर मला फार बरें वाटेल."

**जगाची किंवा संसारी लोकांची नोकरी.**

राखाल हा एक तरुण शिष्य हल्लीं सद्गुरूंपाशींच राहत असे. मनमोहनच्या भगिनीशीं यानें लग्न केलें होतें.

नरेंद्राकडे वळून सद्गुरु पुढें ह्मणतात "क्यापृन विश्वनाथबरोबर एकदा एक नेपाळी तरुण स्त्री येथें आली होती. 'एशराज' नांवाचें वाद्य तिनें चांगलें वाजविलें, व त्याबरोबर पद्यें ह्मणून ईश्वराची स्तुति केली. तिचा कंठ इतका मधुर व सुस्वर होता, कीं, खोली लोकांनीं गच्च भरून गेली. तिचें लग्न झालें आहे किंवा नाहीं, असें कोणीं एकानें विचारतांच तिनें ताबडतोब असा रोकडा जबाब दिला, कीं, 'मी ईश्वराची दासी आहें; तो माझा यजमान आणि पति आहे; त्याचीच मी सेवा करितें; कोणाहि प्राण्याची अथवा मनुष्याची सेवा मी करीत नाहीं.' कनक आणि कांता यांनीं तुला घेरून टाकिलें असतां देवाचा साक्षात्कार होणें कसें शक्य होईल? त्यांच्यामध्यें अनासक्त राहणें फारच कठिण आहे. संसारी मनुष्याची स्थिति फार कठिण आहे. प्रथम तो आपल्या स्त्रीचा गुलाम असतो; तसाच तो पैशाचाहि गुलाम असतो. आणखी आपल्या उपजीविकेसाठीं ज्याची तो नोकरी करितो त्याचाहि तो गुलाम असतो."

सद्गुरु पुढें ह्मणाले "अकबर बादशहाच्या वेळीं दिल्लीनजीक एका अरण्यांत एका झोंपडींत एक फकीर रहात असे. पुष्कळ लोक या साधूपाशीं जात असत, पण त्या सर्वांचें आदरातिथ्य करण्याला त्या बिचाऱ्याजवळ कांहींहि नव्हतें. त्याला या कामाकरितां पैसा हवा होता. ह्मणून साधुसंतांवर खैरात करण्याविषयीं प्रसिद्धि असलेल्या अकबर बादशहापाशीं तो गेला. अकबर आपल्या

**अकबर आणि फकीर.**

खोलींत नमाज पढत होता. फकीर तेथेंच बसला. नमाज पढतांना अकबरानें असें ह्मटलें, कीं, 'हे परमेश्वरा, अधिक संपत्ति, अधिक सत्ता आणि अधिक प्रांत मला दे.' हें ऐकतांच फकीर एकदम उठला आणि खोलीच्या बाहेर हळूच जाणार, तोंच बादशहानें पुन्हां बसण्यास त्याला खूण केली. नमाज संपल्यावर अकबर फकीरास ह्मणाला 'तूं मला भेटण्यास आला होतास; माझ्याशीं कांहींएक न बोलतां तूं परत जाण्यास कां निघालास?' फकीर ह्मणाला 'खाविंद बादशहास भेटण्याचा माझा उद्देश—पण मी हें सांगून आपणास त्रास देऊं इच्छीत नाहीं.' अकबरानें त्याला सर्व सांगण्याचा विशेष आग्रह केल्यामुळें फकीर शेवटीं ह्मणाला 'पुष्कळ लोक उपदेश घेण्यास मजकडे येतात; पण पैशाच्या अभावीं त्यांची सोय पहाणें माझ्यानें होत नाहीं, ह्मणून मदतीकरितां खाविंदापाशीं यावें, असें मला वाटलें.' नंतर भेटीचा उद्देश सांगितल्याशिवाय आपण निघण्याची तयारी कां केली, असें त्याला अकबरानें विचारिलें. त्यावर फकीरानें उत्तर दिलें 'परमेश्वरापाशीं संपत्ति, सत्ता व देश यांची आपण याचना केलेली मीं ऐकिली. तुह्मी स्वतःच भिकारी आहां. तेव्हां मीं मनांत असा विचार केला, कीं, भिकाऱ्यापाशीं मीं भीक कां मागावी? याचनेशिवाय मला गत्यंतरच नाहीं, तर मग मी परमेश्वरापाशींच कां याचना करूं नये!' "

"द्रव्य मिळावें याकरितां—कां भलत्यांनां आर्जवितां।
ईश रमेचा तो भगवान—काय नव्हे हो तो धनवान॥"

नरेंद्र ह्मणाला "अलीकडे गिरीश घोष अशा गोष्टींचा एकटाच विचार करीत असतो."

सद्गुरु ह्मणाले "हें बरोबर आहे, आणि असेंच झालें पाहिजे. पण उगीच तो दुसऱ्यांनां कां नांवें ठेवितो? माझ्या प्रस्तुतच्या स्वभावाला असला उद्धटपणा खपत नाही. मेघगर्जना झाली, कीं, स्थूल वस्तूंवर त्याचा कांहीं परिणाम होत नाहीं; पण कांचेचीं तावदानें इकडे तिकडे हालतात, आणि शब्द करितात. हल्लीं माझा स्वभाव सत्वमय झाला आहे. तेव्हां त्याला दंगा आणि गडगडाट कांहीं खपत नाहीं. ह्मणूनच अलीकडे माझ्याशीं जरा बेपर्वाईनें वागत असलेल्या हृदयाला माझ्या जगन्मातेनें दूर पाठवून दिलें."

## दशम परिच्छेद–अध्याय दुसरा.

कांहीं वेळानें नरेंद्राकडे वळून सद्गुरु हंसत ह्मणतात "गिरीश घोष जें कांहीं ईश्वर स्वतः अव- ( ईश्वर मनुष्यांत अवतार घेतो इत्यादि ) ह्मणतो त्याचें तार घेतो काय? तूं समर्थन करतोस काय?"

नरेंद्र ह्मणाला "तो ह्मणतो, कीं, त्याचा खरोखर ईश्वरी अवतारावर विश्वास आहे. त्याची श्रद्धा बरीच खोल असल्यानें परवां कांहींएक उत्तर न देणें हेंच मला बरें वाटलें!"

सद्गुरु ह्मणाले "त्याची श्रद्धा कितीतरी मोठी आहे. तुला नाहीं तसें वाटत?"

भूमीवर परलेल्या चटईवर सद्गुरु बसले होते. जवळच मी होतों. नरेंद्र सद्गुरूंसमोर आणि दुसरे शिष्य व कलकत्त्याचे प्रेक्षक सभोंवार बसले होते. सर्वांची दृष्टि सद्गुरूंकडे लागलेली होती.

अवर्णनीय प्रेमानें नरेंद्राकडे पाहत सद्गुरु कांहीं वेळ स्वस्थ बसले. नंतर त्याला ह्मणाले "माझ्या तान्ह्या! कनक आणि कांता यांचा त्याग केल्याशिवाय तुझ्या जन्माची सार्थकता होणार नाहीं."

हें ह्मणत असतांच सद्गुरु दैवी भावानें भरित होत्साते पुन्हां प्रेमार्द्र दृष्टीनें नरेंद्राकडे पाहत गाऊं लागले.

कथा बल्ते डराइ, ना बल्लेओ डराइ ।
मने सन्ध हय पाछे तोमाधने हाराइ हाराइ ॥
आमरा जानि ये मन्तोर, दिब तोके सेइ मन्तोर ।
एखन मन तोर, आमरा ये मन्त्रे विपदे तरि तराई ॥

नरेंद्र आपला होणार नाहीं, आपल्या हातांतून त्याला कोणीतरी घेऊन जाईल, अशी सद्गुरूंस शंका आली असावीसें वाटतें. सद्गुरूंचें गाणें ऐकत असतांना नरेंद्राच्या डोळ्यांत अश्रु आले.

सद्गुरूंस भेटण्याकरितां प्रथमच आलेला एक प्रेक्षक जवळच बसला होता, तो हें सर्व पाहत होता. तो सद्गुरूंस ह्मणाला "महाराज, कनक आणि कांता यांचा त्याग करावा, तर कुटुंबी–संसारी माणसानें हें कोडें कसें उलगडावें?"

सद्गुरु ह्मणाले "महाराज, मुलें, पत्नी यांच्याबरोबर राहून गृहस्थाश्रमाचें कर्तव्य बजावण्यास तुह्माला पूर्ण मुभा आहे. आमच्यांमध्यें जें कांहीं संभाषण झालें, त्याचा तुमच्याशीं कांहीं संबंध नाहीं."

संसारी महिमाचरण हे सर्व ऐकून स्वस्थ बसला.

सद्गुरु हंसत महिमला ह्मणतात "पुढें चाल, वाटेवर थांबूं नको, अरण्याच्या आंत जा, तुला चंदनाचीं लांकडें मिळतील; आणखी अधिक पुढें जाशील, तर रुप्याची खाण मिळेल; पण तेथेंच थांबूं नको, तर पुढें चाल; आणखी थोडेंसें पुढें गेल्यास, कीं, सोनें, हिरे, माणिक, रत्नें यांच्या खाणी सांपडूं लागतील, ह्मणून तूं एकसारखा पुढें जा !"

गृहस्थाश्रम्यानें आयुष्याचें कोडें कसें सोडवावें.

महिम म्हणाला "खरेंच, आह्मी पुढें गेलें पाहिजे; पण काय करावें? कोणीतरी आह्मांला ओढून धरितें आणि आम्हांला पुढें जाऊं देत नाहींत. एक अज्ञात शक्ति लगाम धरून आह्मांला मागें ओढते."

सद्गुरु हंसत ह्मणतात "त्यांत काय आहे? ईश्वराचें पवित्र नाम हेंच त्या अज्ञातशक्तीचा नाश करणारें खड्ग. त्यानें लगामाच्या दोऱ्या तोडून टाकाव्या. जगन्मातेच्या—कालीदेवीच्या नामांत मृत्यूचीं बंधनें तोडून टाकण्याचें सामर्थ्य आहे."

नरेंद्राचे वडील हें जग सोडून गेल्यावर नरेंद्राला बराच त्रास भोगावा लागला. पुष्कळ दुःखें आणि संकटें त्याला सोसावीं लागलीं. सद्गुरु पुन्हां पुन्हां नरेंद्राकडे पाहूं लागले. त्याच्याकडे प्रेमानें आणि दयेनें पाहत सद्गुरु हंसत ह्मणाले "पुष्कळ वर्षांचा अनुभविक जुना असा चिकित्सक तूं झाला आहेस काय?"

सद्गुरूंनीं एक ह्मण सांगितली. 'शतमारी भवेद्वैद्यः सहस्रमारी चिकित्सकः शंभर रोग्यांनां ज्यानें मारिलें तो वैद्य. कमींत कमी हजारों रोग्यांनां ज्यानें यमसदनीं पाठविलें तो चिकित्सक.'

नरेंद्राला बरींच दुःखें भोगावीं लागलीं. त्या संबंधीं हें सद्गुरूंचें बोलणें असावें काय?

नरेंद्र हंसला आणि स्वस्थ राहिला.

---

## अध्याय तिसरा.

## सद्गुरु आणि शिष्य.

दुपारची वेळ. शिष्य आणि भक्त लोक देवालयांतील बागेंत फिरत होते. सद्गुरु माझ्याबरोबर नवीन शिष्यांविषयीं बोलूं लागले. सद्गुरु ह्मणाले "पल्टु-शिवाय दरेकजण ह्मणतो, आपलें ध्यान (अभ्यास) ठीक चाललें आहे. पल्टुला तसें कां करतां येत नाहीं आणि देवावर मन लावितां येत नाहीं?"

मीं ह्मटलें " परीक्षेसाठीं त्याला कितीतरी गोष्टी वाचल्या पाहिजेत. यामुळें त्याच्या ध्यानाला विघ्न येत असावें."

सद्गुरु ह्मणाले " नरेंद्राविषयीं तुझें काय मत आहे ? त्याच्यामध्यें कांहीं कपट नाहीं, हें खरें ना ?"

मीं ह्मटलें "होय, खरें महाराज."

सद्गुरु ह्मणाले " परंतु अलीकडे त्याला जगाचे बरेच आघात बसले आहेत. "

मी ह्मणालों " त्याच्या पित्याच्या मृत्यूमुळें त्याचें कुटुंब बहुतेक अनाथ झालें आहे. "

सद्गुरु ह्मणाले " आपल्या कुटुंबाविषयीं आतां त्याला बरीच काळजी करावी लागत आहे. ह्मणजे त्याचा प्रकाश जगाच्या अभ्रांखालीं थोडासा आच्छादित झाला आहे. ही स्थिति पण फार वेळ टिकणार नाहीं. "

जगाचीं अभ्रें आणि नरेंद्र.

बाजूस गॅलेरींत एका वेदान्त्याबरोबर नरेंद्र बोलत होता, तेथें सद्गुरु मधून मधून जात व त्याचें भाषण ऐकत.

शिष्यमंडळी खोलींत आली. सद्गुरूंनीं धर्मग्रंथांतलें एक संस्कृत स्तोत्र ह्मणण्यास महिमाचरणास सांगितलें.

महिमनें महानिर्वाणतंत्रांतील तिसऱ्या उल्लासांतील

हृदयकमलमध्ये निर्विशेषं निरीहं
हरिहरविधिवेद्यं योगिभिर्ध्यानगम्यम् ।
जननमरणभीतिभ्रंशि सच्चित्स्वरूपं
सकलभुवनबीजं ब्रह्मचैतन्यमीडे ॥

हें स्तोत्र ह्मटलें. त्याचा अर्थ—"हरिहर आणि विधि हे ज्याला जाणूं इच्छितात आणि ज्याचें, योगी साक्षात्कार व्हावा ह्मणून निरंतर ध्यान करतात, अशा त्या अव्यक्त परमात्म्याचें मी ध्यान करितों. तो परमात्मा जन्ममृत्यूचें भय नाहींसें करतो. तो सच्चिदानंद आहे. त्याच्यामध्येंच अनंत विश्वें बीजरूपानें आहेत."

हें आणि दुसरीं अशाच प्रकारचीं स्तोत्रें महिम ह्मणत असतां सद्गुरूंला गहिंवर आला. नंतर महिमनें शंकराचार्यकृत पुढील शिवस्तोत्र ह्मटलें. त्या स्तोत्रांत, संसारसागरांत बुडणाऱ्या भक्ताला तारण्याविषयीं प्रार्थना केली आहे.

तसेंच हें जग ह्मणजे एक दुःखांचें स्थान, जेथें रस्ता चुकतो व कोणतीहि वाट मिळत नाहीं असें जंगल आहे, इत्यादि सारांश आहे.

हे चंद्रचूड मदनांतक शूलपाणे
स्थाणो गिरीश गिरिजेश महेश शंभो ।
भूतेश भीतिभयसूदन मामनाथं
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ॥
हे पार्वतीहृदयवल्लभ चंद्रमौले
भूताधिप प्रमथनाथ गिरीशजाप ।
हे वामदेव भवरुद्र पिनाकपाणे
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ॥
हे विश्वनाथ शिव शंकर देवदेव
गंगाधर प्रमथनायक नंदिकेश ।
बाणेश्वरांधकरिपो हर लोकनाथ
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ॥
वाराणसीपुरपते मणिकर्णिकेश
वीरेश दक्षमखकाल विभो गणेश ।
सर्वज्ञ सर्वहृदयैकनिवास नाथ
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ॥
श्रीमन्महेश्वर कृपामय हे दयालो
हे व्योमकेश शितिकंठ गणाधिनाथ ।
भस्मांगरागनृकपालकलापमाळ
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ॥
कैलासशैलविनिवास वृषाकपे हे
मृत्युंजय त्रिनयन त्रिजगन्निवास ।
नारायणप्रिय मदापह शक्तिनाथ
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ॥
विश्वेश विश्वभवनाशितविश्वरूप
विश्वात्मक त्रिभुवनैकगुणाभिवेश ।

# दशम परिच्छेद—अध्याय तिसरा.

**हे विश्ववंद्य करुणामय दीनबंधो**
**संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ॥**
**गौरीविलासभुवनाय महेश्वराय**
**पंचाननाय शरणागतकल्पकाय ।**
**शर्वाय सर्वजगतामधिपाय तस्मै**
**दारिद्र्यदुःखदहनाय नमः शिवाय ॥**

**संसारी (गृहस्थाश्रमी) जीवांनां त्यांच्या उद्धाराविषयीं सद्गुरूचा आशायुक्त संदेश.**

महिमाचरण हा संसारी असून गृहस्थाश्रमी होता. श्रीरामकृष्ण महिमला ह्मणतात "जग ह्मणजे ज्यांत मनुष्यें बुडून मरतात असा सागर आहे, किंवा ज्यांत मनुष्य आपला रस्ता चुकतोच असें दाट अरण्य आहे असें तूं कां ह्मणतोस? जग दुःखमय आहे, दुसरें कांहीं नाहीं, असें कां ह्मणतोस? हीं विशेषणें नवशिक्याच्या दृष्टीनें बरोबर आहेत; पण **खरोखर जो कोणी सुखाच्या व दुःखाच्या वेळीं परमेश्वरावर सर्व भार ठेवितो** त्याच्या तोंडीं असलीं विशेषणें अयोग्य आहेत. **परमेश्वरच जर तुमचे पाय हलवीत आहे, तर मग भीति कां! भीति बाळगण्याचें कारणच नाहीं.** दुसऱ्या एका गृहस्थाश्रमी भक्तासारखें तूंहि असें ह्मणावेंस, कीं, 'खरोखर जग हें सुखाचें मंदिर आहे; खाणें, पिणें, मजा यांत मला दिवस काढूंद्या.. राजर्षि जनकाचें सामर्थ्य किती मोठें होतें! ऐहिक आणि पारमार्थिक अशा कोणत्या गोष्टींमध्यें तो कमी होता? ते, त्यानें आपलें मन परमेश्वरावर लावलें आणि आपल्या नशिबीं असलेल्या ऐश्वर्याचा (दुधाचा) अनुभवहि घेतला."

सद्गुरु पुढें ह्मणाले "भीति कसली! परमेश्वर तुझा मित्र आहे, त्याला घट्ट मिठी मार, ह्मणजे तो तुझा हात धरून नेईल. कांटेरी झाडें आणि जंगल यांनीं भरलेलें रान असलें, तरी त्याची पर्वा करूं नकोस. पायांत जोडा घाल ह्मणजे कांटे बोंचणार नाहींत व तुझ्या पायांतून रक्त येणार नाहीं. भीति पार झुगारून दे. या लपंडावाच्या डावामध्यें जिनें अनासक्तपणें हा डाव चालविला आहे, त्या आजीबाईच्या—जगन्मातेच्या अंगाला स्पर्श कर. एकदां तूं तिच्या अंगास शिवलास, कीं, या संताप करणाऱ्या डावामध्यें पुन्हां सामील होण्याची तुला जरूरी नाहीं. खरेंच, त्या डावांतील चोराप्रमाणें इकडून तिकडे पळून हेलपाटे

खाण्याची तुला याउपर आवश्यकता नाहीं. राजर्षि जनकापाशीं दोन तलवारी होत्या. एक खऱ्या ज्ञानाची व दुसरी कर्मांची तरवार. या तरवारी वापरण्यांत जो वाकबगार आहे त्याला कशाचीहि भीति नाहीं."

सद्गुरु ओट्यावरील एका खाटेवर बसले. खालीं जवळच जमिनीवर मी बसलों.

सद्गुरु मला एकांतीं ह्मणाले " महिम्नें अव्यक्त परमात्म्याविषयीं जें प्रथम स्तोत्र ह्मटलें त्यानें माझें मन क्षुद्र विषयांवरून उडून गेलें."

यानंतर सर्व मंडळी देवाचें नांव घेऊन भजन करूं लागली आणि आनंदानें नाचूं लागली. सद्गुरुहि त्या मंडळांत येऊन मिळाले. सद्गुरु भक्तिभावानें पूर्ण होऊन भोंवतालच्या शिष्यांसह आनंदानें गाऊं नाचूं लागले.

भजन संपल्यावर सद्गुरु शिष्यांनां ह्मणाले "भक्तीनें देवाच्या नांवाचा गजर करणें हीच कायती मुख्य आवश्यकता आहे. बाकी सर्व कांहीं इतकें महत्त्वाचें नाहीं. भक्ति कायती एकच खरी आहे, बाकी सर्व मायिक आहे!"

**सत्य आणि साक्षात्कार.**

मंडळी जमिनीवर बोलत बसली. नरेंद्र आणि राम (दत्त) हे परस्परांशीं एका विषयावर मोठमोठ्यानें वादविवाद करीत होते. रामदत्त हा आजारांतून बरा झाल्यामुळें सद्गुरूंस भेटण्यास आला होता. त्यांनां परस्परांशीं बोलतांना व वाद करतांना सद्गुरूंनीं पाहिलें.

सद्गुरु मला एकांतीं ह्मणाले "माझ्या स्वतःविषयीं ह्मणशील तर मला असले वादविवाद आवडत नाहींत."

सद्गुरु नंतर रामदत्ताला उद्देशून ह्मणाले " बंद कर, तुझी प्रकृति अद्याप पूर्ण बरी झाली नाहीं. बरें, हळू चालूंदे!"

नंतर सद्गुरु मजशीं एकांतीं ह्मणाले "हें सर्व मला आवडत नाहीं. मी माझ्या जगन्मातेची अशी रडून प्रार्थना करीत असें, कीं, हे माते, एकजण ह्मणतो 'हें असें आहे,' 'हें असें आहे', आणि दुसरा ह्मणतो 'छे! दुसरेंच कांहीं आहे.' हे सन्माते, याजकरितां **सत्य** काय आहे तें मला दाखीव."

---

# एकादश परिच्छेद.

## बलरामाच्या घरीं.

### मार्च १८८५.

### अध्याय पहिला.

**नरेंद्र, गिरीश, बलराम, चुनीलाल, लाटु, महेंद्र, नारायण आणि दुसरे शिष्य यांसहित.**

बुधवार, ता. ११ मार्च १८८५, फाल्गुन वद्य १० मी. या दिवशीं बलराम बसू नामक एका शिष्याच्या घरीं श्रीरामकृष्ण आले होते. दक्षिणेश्वराहून ते येथें सकाळीं दहा वाजतां आले आणि त्यांचें भोजन येथेंच झालें.

बलराम! ईश्वर तुझें कल्याण करो! आज तुझें घर सद्गुरूंनीं आपलें क्रीडावन करून सोडिलें आहे. दिव्य प्रेमबंधनानें या ठिकाणींच त्यांनीं सर्व शिष्यांनां बांधून टाकिलें आहे. येथेंच सर्व शिष्यांसहित कितीतरी वेळां त्यांनीं नाचून परमेश्वराचें नाम गाइलें आहे. श्रीबास शिष्याच्या घरीं जणूं काय दुसरे गौरंगच अवतरले आहेत, आणि त्यांनीं दिव्य प्रेम 'देण्याघेण्याचें' दुकानच मांडलें आहे.

आपल्या शिष्यांवर सद्गुरूचें किती मोठें प्रेम असे! कालीमातेच्या देवालयांत एकाद्या मुलाप्रमाणें ते एकटेच रडत असत. शिष्यांनां भेटण्याची त्यांनां किती उत्कट इच्छा असे! रात्रौ जागरण करून ते कालीमातेला ह्मणत असत "हे माते, त्याला तुझ्या कळपांत घेण्याची कृपा कर. त्या बिचाऱ्या मुलाची तुझ्यावर कितीतरी निष्ठा आहे. मीं त्याला भेटावें असें मला वाटतें. माते, त्याला येथें आण, नाहींतर तो जेथें असेल तेथें मला घेऊन जा."

सद्गुरूंचें बलरामच्या घरीं नेहमीं येण्याचें गुह्य हेंच असेल काय? प्रत्येकापाशीं ते असें ह्मणत असत, कीं, "बलराम खरा भक्त आहे, तो दररोज आपल्या कुलदेवतेची—जगन्नाथाची पूजा करितो. याकरितां त्याच्या घरचा प्रसाद नेहमीं घ्यावा."

पण बलरामाच्या घरीं आले ह्मणजे सद्गुरु त्याला ह्मणत असत, कीं, "जा, आणि माझा नरेंद्र, भवनाथ, राखाल, पूरण, दुसरा लहान नरेंद्र, नारायण इत्यादि शिष्यांनां आमंत्रण देऊन घेऊन ये. यांनां नैवेद्य देणें ह्मणजे ईश्वरालाच देण्यासारखें होय. साधारण मनुष्यांप्रमाणें हे नव्हत. ( मानवी स्वरूपांत ) व्यक्त असलेल्या ईश्वराचे हे अंश होत."

रथयात्रेच्या वेळीं याच बलरामाच्या घरीं नाचगाणें वगैरे किती कडाक्याचें झालें. ईश्वराच्या 'प्रेमदरबारांत' पुष्कळ वेळां शिष्य येथें एकत्र जमलेले होते.

जवळच एका इंग्रजी शाळेंत मी शिक्षक होतों. श्रीरामकृष्ण बलरामाच्या घरीं येणार, असें मीं ऐकिलें. शाळेंत त्या दिवशीं विशेषसें काम नसल्यामुळें सद्गुरूंस भेटण्यासाठीं दुपारीं मी आलों, व नमस्कार करून सद्गुरूंचे चरण धरिले.

दुपारचें जेवण झाल्यानंतर सद्गुरु विश्रांतीसाठीं दिवाणखान्यांत आले. त्यांच्या भोंवतीं तरुण शिष्यमंडळी बसली. सद्गुरु वरचेवर एका पिशवींतून मसालेदार 'कबाबचिनी' ( तपकीर ) काढीत होते.

सद्गुरु प्रेमानें मला ह्मणाले "तूं येथें आहेस, आज शाळा नाहीं काय?"

मी ह्मणालों "मी येथें थेट शाळेंतूनच आलों. आतां शाळेंत मला कांहीं महत्वाचें काम नव्हतें."

एक भक्त ह्मणाला "तसें नव्हे! हा एकाद्या उनाड मुलाप्रमाणें शाळा चुकवून आला आहे!" सर्व हंसूं लागले.

मी आपल्याशींच ह्मणालों "खरोखर, जणूं काय एका अदृश्य शक्तीनेंच मला या जागीं ओढून आणिलें!"

नंतर कांहीं वेळ सद्गुरु विचारांत मग्न झाले. तदनंतर मला जवळ बसण्यास सांगून त्यांनीं पुष्कळ विषयांवर बोलणें सुरू केलें. सद्गुरु मला ह्मणाले "हा ओला टॉवेल (पंचा) माझ्यासाठीं पिळून ठेव. ठेवशील ना? आणि तो कोट उन्हांत वाळत घाल. आणि माझे पाय व पोटऱ्या दुखत आहेत त्या थोड्याशा हळू चोळशील काय?"

शिष्यानें सद्गुरूंची सेवा कशी करावी हें मला माहीत नसल्यामुळें दयाळु सद्गुरूंनीं मला तें शिकविलें. सद्गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें मी सेवा करूं लागलों आणि ते शिकवीत असतांना त्यांचे पवित्र पाय हळुहळू रगडूं लागलों.

## एकादश परिच्छेद—अध्याय पहिला.

श्रीरामकृष्ण ह्मणाले "हें पहा, महेंद्र, तुला काय वाटतें? कांहीं दिवस माझी स्थिति चमत्कारिक झालेली आहे. आतां कोणत्याहि धातूला स्पर्श करणें मला अशक्य झालेलें आहे. एकदां मीं एका धातूच्या प्याल्याला हात लाविला—याचा परिणाम काय झाला हें तुला माहीत आहे काय? विंचवानें नांगी मारिली असतां जशा वेदना होतात, त्याप्रमाणें माझ्या हाडामासांत वेदना सुरू झाल्या. वेदना फार तीव्र होत्या. तांब्याशिवाय भागत नाहीं, हें तुला माहीत आहे. तांब्या एका मोळझाडाच्या खालीं नेऊन ठेवावा असें माझ्या मनांत आलें. मीं तो तांब्या माझ्या टावेलांत गुंडाळून वर घेण्याचा प्रयत्न केला. मी त्याला स्पर्श करितों न करितों, तोंच त्या असह्य वेदना परत सुरू झाल्या. तें दुःख फार भयंकर होतें. सरतेशेवटीं मला जगन्मातेची अशी प्रार्थना करावी लागली, कीं, 'हे माते, आतां या खेपेस मला क्षमा कर, मी पुन्हां असें करणार नाहीं.' सर्व प्रकारच्या भोगापासून मी अगदीं अलिप्त रहावें अशी मातेची सूचना आहे असें तुला वाटत नाहीं काय?"

**त्याग अथवा खरा संन्यासी.**

मी ह्मणालों "महाराज, आपण ह्मणतां तेंच खरें असावें अशी माझी खात्री आहे."

श्रीरामकृष्ण मला ह्मणाले "लहानगा ना० हा मला भेटण्यास येतो, याबद्दल त्याची मंडळी त्याला बोलणार नाहींत काय? अहा, तो खरोखरीच चांगला मुलगा आहे. किती तरी पवित्र! विषयासक्तीपासून तो अगदीं अलिप्त आहे हें खरें."

**वैराग्य आणि देवाविषयीं आतुरता.**

मीं ह्मटलें "होय महाराज. तो असाधारण बुद्धिमत्तेचा तरुण आहे."

श्रीरामकृष्ण ह्मणतात "होय, तें खरें. आणखी त्याचें असें ह्मणणें आहे, कीं, 'जर धार्मिक उपदेश माझ्या कानावर आला, तर त्याचा माझ्या मनावर चांगला ठसा उठतो.' तसेंच 'लहानपणीं मी देवाकरितां रडत असें. देवाचें दर्शन मला होत नाहीं ह्मणून माझें हृदय तिळतिळ तुटत असे.'"

याप्रमाणें या तरुण शिष्याविषयीं सद्गुरूचें संभाषण चाललें आहे, तोंच एक शिष्य ओरडून ह्मणाला "महेंद्र महाशय, आपण शाळेंत केव्हां परत जाणार?"

श्रीरामकृष्णांनीं विचारिलें "किती वाजले?"

एक शिष्य ह्मणाला "एक वाजायला दहा मिनिटें कमी आहेत."

श्रीरामकृष्ण मला ह्मणाले "तूं परत जावें हें चांगलें. आतां उशीर झालेलाच आहे. तूं कामावर आहेस. ( लाटूला ) बरें, राखाल कुठें आहे ?"

लाटू ह्मणाला "तो घरीं गेला आहे."

श्रीरामकृष्ण ह्मणतात "खरें काय ? येथून जातांना तो मला भेटला नाहीं कसा ?"

---

## अध्याय दुसरा.
## दुपारीं शिष्यांबरोबर.

शाळा सुटल्यानंतर मी पुन्हां आलों. सद्गुरु बलरामाच्या दिवाणखान्यांत शिष्यांमध्यें बसलेले आहेत हें पाहून मला आनंद झाला. सद्गुरूंचा चेहरा हंसतमुख आणि प्रसन्न असा दिसत होता. त्याची छटा सर्व शिष्यांच्या तोंडावर झळकत होती. मी सद्गुरूंच्या पायां पडलों. सद्गुरूंनीं मला जवळ बसण्यास खूण केली. गिरीश घोष, सुरेश मित्र, बलराम, लाटू, चुनीलाल आणि इतर शिष्यमंडळी हजर होती. श्रीरामकृष्ण गिरीशला उद्देशून ह्मणाले "तूं नरेन्द्राबरोबर त्या मुद्यावर वादविवाद कर पाहूं. त्याचें काय ह्मणणें आहे तें पहा."

गिरीश ह्मणाला "नरेंद्र ह्मणतो, कीं, 'ईश्वर अनंत, अमर्याद आहे. आह्मी जें कांहीं सर्व पहातों किंवा ऐकितों—मग ती एकादी व्यक्ति असो अगर वस्तु असो—तें सर्व ईश्वराचा अंश आहे असें आह्मांला ह्मणतां येणार नाहीं; ईश्वरच आहे असें तर केव्हांच ह्मणतां येणार नाहीं.'"

**दैवी अवताराविषयीं मत.**

सद्गुरु ह्मणतात "ईश्वर खरोखर अनंत आहे; पण तो सर्वशक्तिमान् आहे. त्याला असें घडवितां येईल, कीं, त्याचें ईश्वरत्व प्रेमस्वरूपानें हाडामासांत ( साकार, सगुणरूपांत ) व्यक्त व्हावें, आणि आह्मां मानवांमध्यें त्यानें दैवी अवतार घेऊन रहावें. दैवी अवतार ही खरीखुरी गोष्ट आहे; पण हें शब्दांनीं चांगलेंसें व्यक्त करितां येत नाहीं. ही गोष्ट आध्यात्मिक ( दिव्य ) दृष्टीनें पाहून तिचा अनुभव घेतला पाहिजे. या गोष्टीची खात्री होण्याला प्रत्यक्ष देवाचें दर्शन घेतलें पाहिजे. दृष्टान्तानें ही गोष्ट थोडीशी समजेल. उदाहरणार्थ, एकादा गाईच्या शिंगाला, अथवा पायाला, अगर शेंपटाला किंवा तिच्या ओटीला स्पर्श करितो. याचा अर्थ, त्यानें गाईला स्पर्श केला असें होत नाहीं काय ? आह्मां

मानवांला गाईविषयीं मुख्य महत्त्वाची गोष्ट ह्मटली, ह्मणजे तिच्या ओटींतून येणारें दूध होय. तसेंच दिव्य प्रेमरूप दूध अवतारापासून आह्मांला प्राप्त होतें."

गिरीश ह्मणाला "नरेंद्र ह्मणतो, कीं, 'ईश्वराला जाणणें, आमच्या यःकश्चित् लहानशा मेंदूंत देवाच्या स्वरूपाचा समावेश करणें, हें शक्य आहे काय? ईश्वर अनंत आहे!' "

**अनंताचें ज्ञान.**

सद्गुरु गिरीशला ह्मणाले "तें अगदीं खरें आहे. ईश्वराला कोण जाणूं शकेल? आह्मीं त्याला पूर्णपणें जाणणें शक्य नाहीं, आणि तसें जाणण्याची जरूरीहि पण नाहीं; आह्मीं त्याला पाहिलें, तोच एक सत्य आहे असें अनुभविलें, ह्मणजे बस्स झालें. ईश्वरी अवताराला जरी आह्मीं पाहिलें, तरी पुरे आहे. उदाहरणार्थ, एक मनुष्य पवित्र गंगानदीला जातो आणि पाण्याला स्पर्श करितो. तो त्यानंतर असें ह्मणेल, कीं, मला त्या पवित्र नदीचा स्पर्श आणि साक्षात्कार झालेला आहे. गंगानदीच्या उगमापासून तों मुखापर्यंत अथवा हरिद्वारपासून तों सागरापर्यंत सर्व नदीला स्पर्श करण्याची त्याला खचित आवश्यकता नाहीं. जर एकाद्यानें तुझ्या पायाला स्पर्श केला, तर तें तुला स्पर्श केल्याप्रमाणेंच झालें. सर्व वस्तूंमध्यें अग्नि गुप्त असतोच. तरीपण लांकडांमध्यें तो अधिक अंशानें असतो. एकादा मनुष्य समुद्रापर्यंत चालत जातो आणि पाण्याला स्पर्श करितो. त्यानें खरोखर समुद्राला स्पर्श केल्याप्रमाणेंच झालें."

गिरीश हंसत ह्मणाला "माझ्या स्वतःविषयीं ह्मणाल, तर मी त्या अग्नीच्या शोधांत आहें. ह्मणून तो अग्नि ज्या ठिकाणीं मला मिळेल तेंच ठिकाण मी लक्ष्यपूर्वक पहात आहें."

सद्गुरु हंसत ह्मणतात "बरें, देवानें केलेल्या लांकडांत ती वस्तु (अग्नि) बाकी इतर पदार्थांपेक्षां अधिक आहे. देवाच्या शोधांत तूं आहेस काय? तर मग तो तुला मनुष्यांत आढळेल. दुसऱ्या कोणत्याहि पदार्थांपेक्षां मनुष्यांतच त्याचें दिव्यस्वरूप अधिक व्यक्त आहे. देवाविषयीं भक्तीनें जो पूर्ण भरून गेला आहे–देवाकरितां जो एकसारखा तळमळत आहे–दैवी प्रेमानें जो धुंद होऊन गेला आहे, अशा मनुष्याचा तूं शोध घे. अशा मनुष्यामध्येंच ईश्वरानें अवतार घेतलेला आहे, असें समज."

सद्गुरु मला उद्देशून ह्मणाले " ईश्वर सर्व पदार्थांमध्यें आहे; पण त्याची शक्ति त्या पदार्थांमध्यें कमीअधिक प्रमाणांत व्यक्त असते. ईश्वरी अवतार ह्मणजे मनुष्यांमध्यें अधिक असलेली परमात्मशक्ति होय."

गिरीश ह्मणाला " नरेन्द्र ह्मणतो, कीं, ईश्वराला जाणणें हें शब्दांच्या, विचारांच्या, इंद्रियांच्या सामर्थ्याबाहेरचें आहे."

सद्गुरु ह्मणाले " हें सर्वांशीं खरें नाहीं. अशुद्ध, मर्यादित मनाला ईश्वराचा साक्षात्कार होत नाहीं, हें खरें; पण शुद्ध मनाला–शुद्ध बुद्धीला–शुद्ध आत्म्याला त्याचा साक्षात्कार होतो. विषयोपभोगाकडे कल असलेल्या, 'कनककांता' यांविषयीं आसक्त असलेल्या, मर्यादित, अशुद्ध मनाला, ईश्वराला जाणतां येत नाहीं. मनानें विषयाकडचा ओढा सोडला, विद्येनें जर तें पावन झालें, आणि ऐहिक वासना, इच्छा आणि आसक्ति यांपासून जर तें का मुक्त झालें, तर तें परमात्म्याशीं एकरूप होऊन जाईल. याप्रमाणेंच पूर्वकालीन साधूंनीं ईश्वराचें दर्शन घेतलें नाहीं काय ? विषयांवरील आपला स्वाभाविक ओढा नाहींसा केलेल्या शुद्ध मनानेंच–ह्मणजे शुद्ध आत्म्यानें त्यांनीं अमर्याद अशा परमात्मस्वरूपाचें दर्शन घेतलें."

गिरीश हंसत ह्मणाला " नरेंद्राला मीं ( वादांत ) चीत केलें आहे."

श्रीरामकृष्ण ह्मणाले " हं हं, तसें नव्हे. उलट तो असें ह्मणतो, कीं, गिरीशचा अवतारावर विश्वास आहे. खडकाप्रमाणें त्याची श्रद्धा अचल आहे. अशा श्रद्धेंत बिघाड उत्पन्न करणें हें कांहीं आपणास योग्य नव्हे."

गिरीश हंसत ह्मणाला " आह्मी सर्व बोलबोलतों, आमचा वाक्प्रवाह पाण्याप्रमाणें चाललेला आहे, पण आपला हा महेंद्र आपलें तोंड उघडीत नाहीं ! या जगांतील कोणत्या वस्तुविषयीं त्याचा इतका विचार चाललेला आहे ? या गोष्टीचा आपण खुलासा करून आमच्यावर कृपा करावी." एकच हंशा पिकतो.

सद्गुरु हंसत ह्मणाले " पांच जणांविषयीं फार सावध असावें:–(१) पाण्याप्रमाणें ज्याचा वाक्प्रवाह चालतो; (२) ज्याचें हृदयद्वार तुह्मांला बंद आहे (३) कानांत तुळशीपत्र घालून आपल्या भक्तीचें जगांत प्रदर्शन करणारा भक्त; (४) लांब बुरखा घेणारी स्त्री; आणि (५) शेवाळानें आच्छादित, आरोग्यविघातक थंड पाण्यानें भरलेलें सरोवर." सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणाले " आमचा महेन्द्र या पाचहि कोटींत येत नाहीं, हें मी सांगतों. तर मग असेंच खरें, कीं, महेन्द्र हा इतका खोलबुद्धीचा गंभीर आहे, कीं, त्याची वाचाच वर उमटत नाहीं."

# एकादश परिच्छेद—अध्याय दुसरा.

गिरीश म्हणाला " महाराज, आपण ती म्हण ( पांच कोटींविषयीं ) पुन्हां कृपा करून म्हणाल तर बरें. "

चूनीलाल म्हणाला " हेडमास्तर या नात्यानें महेन्द्राच्या वर्तनाबद्दल मुलांचे पालक टीका करीत आहेत. आमचा लहानसा 'ना,' हा त्याचा शिष्य आहे. त्याचप्रमाणें बाबुराम, नारायण, पल्तु, पूरण, तेजचंद्र हेहि आहेत. पालक म्हणतात, कीं, सद्गुरूंकडे या मुलांनां महेन्द्रच आणितो आणि त्यामुळें मुलें अभ्यासाकडे दुर्लक्ष्य करितात. या सर्वांबद्दल महेन्द्रालाच ते जबाबदार धरितात."

सद्गुरु म्हणाले " माझ्या लाडक्या ! त्याच्याविरुद्ध जें जें कांहीं ते म्हणतात तें सर्व कोण खरें मानणार ? "

इतक्यांत नारायण आला आणि सद्गुरूंच्या पायां पडला. नारायण हा गौरवर्णाचा होता. त्याचें वय १७।१८ वर्षांचें असेल. हा विद्यार्थी असून श्रीरामकृष्णांचा एक प्रेमळ शिष्य होता. सद्गुरूंचें तर त्याच्यावर इतकें प्रेम असे, कीं, त्याचें दर्शन व्हावें म्हणून जगन्मातेकडे—कालीमातेकडे सद्गुरु केव्हां केव्हां रडत असत. हा मुलगा म्हणजे साक्षात् नारायण ( ईश्वर ) आहे, असें सद्गुरु समजत.

गिरीश नारायणाला पाहून म्हणाला "अरे, सद्गुरु येथें आहेत असें तुला कोणीं कळविलें ? मला असें वाटतें, कीं, महेंद्रच प्रत्येकास सांगत आहे."

श्रीरामकृष्ण हंसत म्हणाले "गप्प रहा, तुझें मत तुझ्यापाशींच ठेव. लोक त्याच्याविषयीं ( महेंद्राविषयीं ) आधींच प्रतिकूल टीका करूं लागले आहेत."

नंतर नरेंद्राविषयीं बोलणें सुरू झालें. एक शिष्य म्हणाला "पूर्वीप्रमाणें नरेंद्र हल्लीं इकडे वारंवार येत नाहीं."

सद्गुरु म्हणाले "तो इकडे येत नाहीं हें कांहीं आश्चर्य नाहीं. भाजीभाकरीचा —पोटापाण्याचा प्रश्न तसाच चमत्कारिक आहे ! या प्रश्नाच्या विचारानें कालीदासासारख्या कविश्रेष्ठाचीहि मति गुंग झाली !"

बलराम म्हणाला "सुप्रसिद्ध शिबु गुह यांचा नातु अन्नदा गुह याचा तो मोठा मित्र आहे. तो त्याच्याबरोबर नेहमीं फिरत असतो."

सद्गुरु म्हणाले "सरकारीं नोकरींत असलेल्या त्यांच्या एका मित्राच्या घरीं ते नेहमीं येत असतात. तेथें ते ब्राह्मसमाजाच्या मताप्रमाणें प्रार्थना करीत असतात."

बलराम हंसत ह्मणाला "आनंद गुह फार गर्विष्ठ आहे असें ब्राह्मण ह्मणतात." श्रीरामकृष्ण ह्मणाले "ब्राह्मण काय ह्मणतात याकडे लक्ष्य देऊं नको. त्यांची रीत तुला माहीत आहे. जो कोणी त्यांनां उत्तम दक्षणा देतो तो सज्जन. बाकी सर्व मनुष्य वाईट !" सर्व हंसतात.

**प्रतिग्रह आणि स्वातंत्र्याचा नाश.**

---

## अध्याय तिसरा.

### शिष्यांसहित ईश्वराच्या नामाचा गजर.

श्रीरामकृष्णांनीं स्तोत्रें ( पदें ) ऐकण्याची इच्छा प्रदर्शित केली. बलरामचा दिवाणखाना प्रेक्षकांनीं भरून गेलेला होता. सद्गुरूंच्या मुखांतून काय बाहेर येतें व ते पुढें काय करणार, याकडे प्रत्येकाचें लक्ष्य लागलेलें होतें. तारापदला गाण्यास सांगितलें. त्यानें ( मनुष्यांच्या ) गोपालाचें लीलावर्णनात्मक एक गाणें ह्मटलें.

केशव कुरु करुणा दीने, कुंजकाननचारी !
माधव मनोमोहन मोहनमुरलीधारी ॥
( हरि बोल, हरि बोल, हरि बोल, मन आमार । )
व्रजकिशोर कालीयहर कातरभयभंजन ।
नयन बाँका बाँका शिखिपाखा, राधिकाहृदिरंजन ॥
गोवर्धनधारण वनकुसुमभूषण ।
दामोदर कंसदर्पहारी, श्याम रासरसविहारी ॥
( हरि बोल, हरि बोल, हरि बोल मन आमार ॥ )

श्रीरामकृष्ण गिरीशला ह्मणतात "किती मोहक गाणें ! तूं हें पद रचिलें आहेस काय ?"

एक शिष्य ह्मणाला "होय महाराज. चैतन्यलीला नाटकांतील सर्व पदें यानेंच रचिलीं आहेत."

सद्गुरु गिरीशला ह्मणतात "खरोखर, हें गाणें फारच उत्तम आहे. (गाणाराला) चैतन्याचा बंधु **नित्य** याच्याविषयीं तुला गाणें ह्मणतां येत नाहीं काय ?"

गाणारानें चैतन्यानें उपदेशलेल्या भक्तीचें वर्णन **नित्य** करीत आहे असें गाणें ह्मटलें.

किशोरीर प्रेम निबि आय,
प्रेमेर जुयार बये जाय।
बइछे रे प्रेम शतधारे जे जत चाय तत पाय ॥
प्रेमेर किशोरी, प्रेम बिलाय साध करि,
राधार प्रेमे बल रे हरि;
प्रेमे प्राण मत्त करे, प्रेमतरङ्गे प्राण नाचाय।
राधार प्रेमे हरि बलि आय आय आय आय ॥

पुढचें गाणें चैतन्याविषयींच होतें:—

कार भावे गौरवेशे जुडाले हे प्राण।
प्रेमसागरे उठलो तुफान, थाकबेना आर कूलमान
(मन मजाले गौर हे)
व्रजमाझे राखाल साजे चराले गोधन,
धरले करे मोहन बाँशी, मजलो गोपीर मन;
धरे गोवर्धन, राखले वृन्दावन,
मानेर दाय, धरे गोपीर पाय,
भेसे गेल चाँदबयान!
(मन मजाले गौर हे)

प्रत्येकजण मला गाणें ह्मणण्याचा आग्रह करूं लागला. मी फार भिडस्त असल्यामुळें "माफी करा," असें हळूच उत्तर दिलें.

गिरीश हंसत सद्गुरूला ह्मणाला "महाराज, आह्मीं शक्य तेवढी खटपट केली, तरी याजकडून एक गाणं ह्मणवून घेतां येत नाहीं!" सर्व हंसतात.

सद्गुरु त्रासल्यासारखें करून ह्मणाले "तो शाळेंत मात्र आपले दांत दाखवील. देवाचें नाम गातांना त्याच्या भिडस्तपणाला ऊत येतो, हा एक चमत्कार आहे."

मी कांहीं वेळ शून्य, गोंधळल्यासारखा व वेडा असा झालों.

सद्गुरूंपासून थोड्या अंतरावर सुरेश मित्र नांवाचा एक शिष्य बसला होता. त्याच्याकडे पाहून सद्गुरु प्रेमानें हंसूं लागले आणि गिरीशकडे बोट दाखवूं लागले.

सद्गुरु सुरेशला ह्मणाले "तूं मागें कांहीं दिवस स्वैरवृत्तीनें घालविलेस, त्याविषयीं तुझें कांहीं ह्मणणें आहे काय? येथें एक तुलासुद्धां भारी असा इसम आहे."

सुरेश हंसत ह्मणाला "होय महाराज, तें अगदीं खरें. तो माझा या बाबतींत दादा आहे !" सर्व हंसतात.

गिरीश सद्गुरूंला ह्मणाला "लहानपणीं अभ्यासाकडे मीं मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. असें असूनहि मला लोक विद्वान् कां ह्मणतात हें आपण सांगावें, महाराज."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "महिम चक्रवर्तीनें बरेच धर्मग्रंथ वाचले आहेत. ( मला ) नव्हे काय महेन्द्र ?"

मीं ह्मटलें "होय महाराज."

गिरीश ह्मणाला "आपण काय विचारतां महाराज ? पांडित्याविषयीं बोलतां काय ? तसें असेल तर माफ करा, मी त्यापुढें घाबरून जाऊन अदबीनें उभा राहणारा इसम नव्हे !"

सद्गुरु हंसत ह्मणाले "मला पांडित्याविषयीं काय वाटतें हें तुला माहीत आहे काय ? ग्रंथ, धर्मग्रंथ हे सर्व ईश्वराचा—ईश्वराकडे जाण्याचा मार्ग दाखवितात. एकदां का मार्ग समजला, कीं, नंतर पुस्तकाचा काय उपयोग ? मार्ग समजल्यावर अशी एक वेळ येते, कीं, त्या वेळीं आह्मीं एकांतवासांत परमेश्वराचें ध्यान करून आत्मोन्नति करून घेतली पाहिजे. एका गृहस्थास एक पत्र आलें. त्यांत त्याच्या आप्तांस कांहीं जिन्नस पाठवावे असें लिहिलें होतें. तो ते जिन्नस खरेदी करणार होता; पण काय घोंटाळा झाला पहा ! तें पत्रच हरवलें. त्यानें पुष्कळ वेळ त्याचा शोध केला. त्याच्या लोकांनींहि त्याला मदत केली. सरते शेवटीं तें पत्र एकदांचें त्याला मिळालें, आणि त्याचा हर्ष गगनांत मावेना. मोठ्या उत्सुकतेनें त्यानें तें पत्र उचललें आणि समग्र वाचलें. त्यांत लिहिलें होतें, कीं, 'पांच शेर मिठाई आणि कापडाचा एक तुकडा पाठवावा.' पत्राचा मजकूर समजल्यावर त्यानें तें पत्र एका बाजूस फेंकिलें आणि इष्ट असलेल्या वस्तु आणण्यास तो निघाला. अशा पत्राची कोणी झालें तरी किती वेळ काळजी घेणार ? त्यांतील मजकूर समजला नाहीं तोंपर्यंतच. नंतर पत्रांत लिहिलेल्या वस्तु जमविण्याची खटपट तो करणार. याप्रमाणें धर्मग्रंथ ईश्वराकडे नेणारे मार्ग—ईश्वराच्या साक्षात्काराचीं साधनें—याविषयीं सांगतात. एकदां मार्ग समजला ह्मणजे तदनंतर त्या मार्गानें आपल्या ध्येयाकडे जाणें ही दुसरी पायरी होय. ईश्वरी साक्षात्कार हें ध्येय होय. नुसत्या पांडित्याचा काय उपयोग ? पंडितांना पुष्कळ धर्मवचनें आणि पदें मुखोद्गत असतील; पण हीं तोंडपाठ झाल्यानें काय फायदा आहे

धर्मग्रंथांत जें कांहीं सांगितलें आहे, त्याचा सर्व अनुभव—आत्मसाक्षात्कार घेतला पाहिजे. जोंपर्यंत जगाची आसक्ति आपणास आहे, आणि जोंपर्यंत कनक आणि कांता यांवर आपलें प्रेम आहे, तोंपर्यंत धर्मग्रंथांच्या वाचनानें—पांडित्यानें आह्माला ज्ञान किंवा मुक्ति मिळणार नाहीं. पंचांगामध्यें अमुक इंच पाऊस पडेल असें लिहिलेलें असतें. पंचांग पिळून पहा, पावसाचा एक थेंबहि पडणार नाहीं; तुह्मांला मग त्याची अतिशय जरूरी कां असेना!"

गिरीश हंसत ह्मणतो "महाराज, आपण पंचांगाविषयीं काय ह्मटलेंत? त्यांतून एकहि थेंब येणार नाहीं?"

सद्गुरु हंसत ह्मणाले "हो, पंडित मोठमोठ्या गोष्टी सांगेल, पण सर्वकाळ त्याचें मन वरून (या उच्च स्थानावरून) कनककांता—विषयोपभोग आणि सर्वशक्तिमान् पैसा—यांकडेच पहात असणार. गिधाड आकाशांत फार उंच उडतें, पण त्याची सर्व दृष्टि मृत प्राण्यांच्या शवांनीं भरलेल्या खांचाखळग्यांकडे लागलेली असते! होय, खरोखर आकाशांत वर उंच उडणाऱ्या गिधाडांचें शवें आणि स्मशानें यांकडेच पूर्ण लक्ष्य असतें."

सद्गुरु गिरीशला ह्मणाले "नरेंद्र हा फार उच्च दर्जाचा तरुण आहे. गाणें बजाविणें, तसेंच अनेक तऱ्हेच्या विद्यांचा व्यासंग, अशा प्रत्येक गोष्टींत तो तयार आहे. त्याच्या अंगीं आत्मसंयमन, मितपणा, सत्यशीलता इत्यादि गुण आहेत. आणि विशेष हा, कीं, ईश्वर सत्य आहे, जगांतील वस्तु अनित्य आहेत, आपण त्यांवर आसक्त होऊं नये, असें त्याला कळूं लागलें आहे. त्याच्या अंगीं पुष्कळ सद्गुण आहेत."

नरेंद्र.

मला उद्देशून सद्गुरु ह्मणाले "खरेंच, तो फार चांगला आहे असें तुला वाटत नाहीं काय?"

मीं ह्मटलें "होय महाराज, आपण वर्णन केल्याप्रमाणेंच तो आहे."

श्रीरामकृष्ण मजशीं जनांतिक ह्मणाले "गिरीशची ईश्वराची भक्ति आणि ईश्वरावर खडकाप्रमाणें अचल श्रद्धा कशी आहे पहा!"

मी आश्चर्यानें गिरीशकडे पाहूं लागलों. गेले कांहीं दिवसमात्र गिरीश सद्गुरूंबरोबर फिरत होता; पण मला असें वाटतें, कीं, हा गिरीश सद्गुरूंचा एक निकट परिचयाचा मित्र आणि बंधु, प्रत्यक्ष मूर्तिमंत सद्गुरूच—एकाच सूत्रानें गोंविलेल्या माळेंतील एक चकाकणारा मणिच आहे!

नारायण ह्मणाला "महाराज, आपल्या गाण्यानें आपण आह्मांला कृतार्थ करणार नाहीं काय ?"

यानंतर सद्गुरूंनीं जगन्मातेचें एक पद उत्तम स्वरांत ह्मटलें. तें ऐकून तेथें हजर असलेल्या प्रत्येकाचें अंतःकरण आनंदानें मोहून गेलें.

जतने हृदये रेखो आदरिणी श्यामा माके ।
माके तुमि देखो आर आमि देखि, आर जेन केउ नाहि देखे ॥
कामादिरे दिये फाँकि, आय मन विरले देखि,
रसनारे सङ्गे राखि, से जेन मा बले डाके ॥ ( माझे माझे )
कुरुचि कुमन्त्री जत, निकट हते दिओनाको,
ज्ञाननयने प्रहरी रेखो, से जेन सावधाने थाके ॥

नंतर आपण एक संसारांतील त्रस्त व दुःखी जीव आहों, आणि जगांतील दुःखांनीं व संकटांनीं आपण अगदीं नमून गेलों आहों, अशी कल्पना करून सद्गुरूंनीं आणखी एक पद ह्मटलें.

गो आनन्दमयी हये मा आमाय निरानन्द कोरो ना ।
( ओमा ) ओ दुटी चरण बिने आमार मन, अन्य किछु आर जाने ना ।
तपनतनय आमाय मन्द कय, कि बलिब ताय बलना ।
भवानी बलिये भवे जाब चले, मने छिल एइ वासना,
अकूल पाथारे डुबाबि आमारे ( ओमा ) स्वपनेओ तातो जानिना ।
आमि अहर्निशि, दुर्गानामे भासि, तबु दुखराशि गेल ना,
एबार जदि मरि ओ हरसुन्दरी, तोर दुर्गानाम केउ आर लबे ना

नंतर सद्गुरूंनीं आदिमाया—मूळ प्रकृति—जगन्माता इच्यापासून मिळणाऱ्या आनंदाविषयीं एक गाणें ह्मटलें. निर्गुणाचें ध्यान करून, सृष्टि स्थिति आणि संहार करणाऱ्या सगुण देवतेच्या—जगन्मातेच्या साक्षात्कारापासून होणारा आनंद, सद्गुरु आपल्या दिव्य आध्यात्मिक दृष्टीनें पाहूं लागले.

शिवसङ्गे सदा रङ्गे आनन्दे मगना,
सुधापाने ढल ढल ढले किन्तु पडे ना ( मा ) ।
विपरीत रतातुरा पदभरे कांपे धरा
उभये पागलेर पारा, लज्जा भय आर माने ना ( मा ) ।

## एकादश परिच्छेद—अध्याय चवथा.

पूर्ण शांततेनें सर्व शिष्य हीं गाणीं ऐकत होते. सद्गुरूंच्या बदललेल्या स्थितीकडे त्या सर्वांचें लक्ष्य गेलें. सद्गुरु दैवी अमर्याद आनंदानें धुंद होऊन गेले होते.

गाणें संपल्यानंतर कांहीं वेळानें सद्गुरु ह्मणाले "मला थंडी झालेली आहे. यामुळें मला आज चांगलें गातां येत नाहीं ह्मणून वाईट वाटतें."

---

## अध्याय चवथा.

### सायंकाळीं.

संध्याकाळची वेळ. समुद्रावर, दाट जंगलावर आणि गगनचुंबित अशा पर्वत-शिखरावर निशादेवीची छाया ( The Shadows of Eternity ) पडलेली आहे. आजूबाजूच्या विस्तीर्ण मैदानावर आणि निरंतर झुळझुळ अशा शब्द करणाऱ्या नदीच्या निर्जन तीरावर या छायेमुळें एक प्रकारची उदासीनता दिसूं लागली. हा पवित्र गंभीर देखावा पाहून क्षुद्र मानवी प्राण्याच्या मनाची स्थिति बदलल्याशिवाय राहणार नाहीं. कांहीं मिनिटांपूर्वी चराचर विश्वाला सूर्य प्रकाश देत होता; तो आतां कोठें गेला ? जगांत नवीन आलेला प्राणी—लहान मूल या प्रश्नानें गोंधळून जातें. लहान मुलाप्रमाणेंच ज्याचा आत्मा ( मन ) आहे, अशा पवित्र मनुष्याचीहि हीच स्थिति होते. पवित्र मनुष्याला जगन्मातेच्या देखरेखीखालीं आणि नजरेखालीं आपण सदैव आहों, असें वाटत असतें. संध्याकाळचा काय हा अपूर्व देखावा आणि चमत्कार ! आणि तोहि विलक्षण सत्तेनें—परमेश्वरानें घडवून आणलेला ! पक्षी परत येऊन वृक्षाच्या फांदीवर गान करीत होते. ज्यांमध्यें आत्मजागृति झालेली आहे, असे मानवी प्राणी तेंच करीत होते. ते ईश्वराचें नाम गात होते.

संध्याकाळची वेळ. शिष्य आपापल्या जागेवरून हालले नाहींत. डोकें वर करून आणि कान उत्सुकतेनें पुढें करून सद्गुरूंनीं गाईलेलें ईश्वराचें गोड नाम ते ऐकत होते. पूर्वी याहून गोड नाम त्यांनीं कोणाकडूनहि ऐकिलेलें नव्हतें. आपल्या मातेस 'मा मा' ह्मणून इतक्या प्रेमानें हांक मारीत असलेलें मूल त्यांनीं केव्हांहि पाहिलें नाहीं. सद्गुरूंच्या मुखापासून जणूं काय अमृत—बिंदूंचा वर्षाव चाललेला आहे, असें दिसलें. अनंत आकाश, गगनचुंबित पर्वत,

काळाभोर समुद्र, विस्तीर्ण मैदान या सर्वांमध्यें विश्वाचा मायबाप शोधीत बसण्याचा काय उपयोग आहे ? गाईचीं शिंगें, तिचे पाय, किंवा तिचे दुसरे अवयव यांकडे आतां लक्ष्य देण्यांत काय फायदा ? ज्यापासून दिव्य प्रेमरूपी दूध आह्मीं काढावें अशा गाईच्या ओटीविषयीं सद्गुरूंनीं आजच सांगितलें आहे ! या खोलीमध्यें प्रत्यक्ष मूर्तिमंत ईश्वर पाहण्याचें भाग्य माझ्या नशीबीं आहे काय ? त्रस्त आणि दुःखी अशा शिष्यांच्या अंतःकरणांत ईश्वरी प्रेम आणि शाश्वत अनिर्वचनीय शांति यांचा प्रादुर्भाव दुसऱ्या कशानें झाला ? दुःखरूप दरी आनंदानें भरून गेली हें दुसऱ्या कशानें झालें ? माझ्यासमोर असलेली व्यक्ति मूर्तिमंत ईश्वर असणें शक्य आहे काय ? तो तसा असो वा नसो, माझें मन, हृदय आणि आत्मा हीं सर्व त्याचींच आहेत. तो त्यांची पाहिजे तशी व्यवस्था लावो. तो या आयुष्यरूपी चक्रव्यूहाचा ध्रुव-केंद्र होय. आतां या महात्म्यामध्यें आदिकारण परमात्मा कसा प्रतिबिंबित झाला आहे, हें पाहणें हेंच काय तें माझें काम आहे.

याप्रमाणें कांहीं शिष्यांच्या मनांत विचार आले. सद्गुरूंनीं हरीचें—सर्व दुःखें, संकटें, पाप, दोष हरण करणाऱ्या दैवी मायबापाचें—नाम गातांना जेव्हां शिष्यांनीं ऐकिलें तेव्हां त्यांनां आज आपण धन्य झालों असें वाटलें.

ईश्वराचें नामसंकीर्तन आटोपल्यावर सद्गुरूंनीं **माते**ची प्रार्थना सुरू केली.

**प्रार्थना कशी करावी हें सद्गुरु शिकवितात.**

प्रार्थना कशी करावी हें मनुष्याला शिकवावें ह्मणून प्रेमस्वरूपी ईश्वरानें जणूं मानवी देह धारण केला आहे, असें दिसलें. सद्गुरु ह्मणाले "मा! ( हे माते! ) मी तुला शरण आलों आहें. तुझ्यापासून दूर नेणाऱ्या प्रत्येक गोष्टीपासून तुझें चरणकमल माझें रक्षण करो. हे सन्माते ! मला इंद्रियांचीं सुखें नकोत, मला कीर्तीची पर्वा नाहीं, किंवा चमत्कार करून दाखविणाऱ्या सिद्धींची मला आकांक्षा नाहीं. हे सन्माते ! मी जें कांहीं मागतों, तें तुझ्याविषयीं शुद्ध भक्ति—वासनांनीं दूषित न झालेलें तुझ्याविषयीं प्रेम—शुद्ध निर्भेळ प्रेम—या जगांतील वस्तूंची इच्छा न करणारें प्रेम—अमर अशा अंतरात्म्यापासून अप्रार्थित—अयाचित उद्भवणारें तुझ्याविषयीं प्रेम—हेंच आहे. हे माते ! मायेच्या मोहानें भुळून मीं तुला विसरून जाऊं नये,—कनककांतारूपी मोहक संसारजालांत गुंतून जाऊन मीं तुला विसरूं नये, असें तूं कर. हे सन्माते !

तुझ्यावांचून यां जगांत तुझ्या मुलाला दुसरें कोणी नाहीं, हें तूं पहात नाहींस काय ? अरेरे, तुझें नाम कसें गावें हेंसुद्धां मला माहीत नाहीं. हे अत्यंत दयाळु माते ! खोल भक्ति, तुझ्याप्रत नेणारें ज्ञान, खरी भक्ति याविरहित मी आहें. असें प्रेम व भक्ति तूं मला देऊन माझ्यावर कृपा कर."

ही सायंकाळची प्रार्थना झाली. पण या दैवी मनुष्याला—अहोरात्र देवाचें नामस्मरण करणाराला—ज्याच्या पवित्र मुखांतून परमात्म्याकडे प्रार्थनेची संतत-धार एकसारखी वहात आहे अशाला, या प्रार्थनेची जरूरी आहे काय ? जगांत कसें रहावें, प्रार्थना कशी करावी हें मनुष्याला शिकवावें या हेतूनें सद्गुरु हे सर्व विधि पाळतात काय ?

गिरीशनें श्रीरामकृष्णांस आपल्या घरीं त्या रात्रींच आमंत्रण केलें.

सद्गुरु ह्मणाले "फार उशीर होईल असें तुला वाटत नाहीं ?"

गिरीश ह्मणाला "नाहीं महाराज. आपणास वाटेल तेव्हां आपण परत यावें. मला *थिएटराकडे जावें लागेल. तेथें कांहीं जणांचें भांडण झालें आहे, तें मला मिटवावें लागेल."

वरच्या मजल्यावरून सद्गुरु खालीं जातात, तोंच त्यांची स्थिति बदलली. देवाच्या विचारांतच मग्न झाले आहेत, धुंद झाले आहेत असे ते दिसले. नारायण आणि मी त्यांच्या मागोमाग गेलों; त्यानंतर राम, चूनीलाल आणि दुसरे आले.

होय, खरोखरीच त्यांची स्थिति पालटली. त्यांचें देहभान नाहींसें होत चाललेंसें दिसूं लागलें. पाय घसरेल या भीतीनें हात धरण्याला नारायण पुढें झाला. सद्गुरु त्रासलेसे दिसले.

कांहीं वेळानें मोठ्या ममतेनें ते नारायणास ह्मणतात "तूं जर माझा हात धरलास तर मी मद्यपी आहें असें लोक ह्मणतील. मला कोणाच्याहि मदती-शिवाय चालूं दे."

गिरीशच्या घरापासून कांहीं अंतरावर असलेल्या बोसपाराचें वळण सद्गुरु ओलांडून गेले. आतां ते इतक्या जलद कां चालूं लागले ? शिष्य तर मागें राहिले. आतां कोणता दैवी विचार त्यांच्या डोक्यांत शिरला आहे, हें देवास माहीत. वेड्याप्रमाणें चालण्याचें काय कारण असावें ? शब्द, विचार यांनां अगोचर असा वेदान्तांत सांगितलेला जो परमेश्वर, त्याविषयीं त्यांचा विचार चाललेला

---

* गिरीश हा स्टार थिएटरचा मॅनेजर होता.

आहे काय? कांहीं वेळापूर्वी त्यांनीं बलरामच्या घरीं असें सांगितलें, कीं, शुद्ध व अतींद्रिय मनाला परमेश्वर अगोचर नाहीं. शुद्ध मनाला ह्मणजे शुद्ध बुद्धीला —ह्मणजे शुद्ध आत्म्याला **त्याचा** खरोखर साक्षात्कार होतो. अथवा आपल्या-समोर परमेश्वराला या वेळीं खरोखर ते पहात असतील. **'सर्वं खल्विदं ब्रह्म'** याचा साक्षात्कार हाच काय?

हा पहा, नरेंद्र येथें येत आहे. किती तरी दिवस सद्गुरु एकसारखे 'नरेंद्र नरेंद्र' ह्मणून वेड्यासारखे बरळत होते. पण नरेंद्र आतां त्यांच्यासमोर येथें आला आहे, तरी त्याच्याशीं ते कांहीं बोलत नाहींत! गौरंग प्रभूंना नेहमीं प्राप्त होत असलेली 'भाव' नांवाची स्थिति हीच काय? भावाचें—समाधीचें कोडें सोडणारा येथें कोण आहे?

सद्गुरु गिरीशच्या घराला जाणाऱ्या बोळाच्या रस्त्याच्या शेवटीं आले. सर्व शिष्य त्यांच्यामागून चालूं लागले. आतां ते नरेंद्राशीं बोलूं लागले. ते ह्मणाले "माझ्या लाडक्या, तुझें कुशल आहे ना? आतांपर्यंत तुझ्याशीं बोलण्याची शक्ति मला नव्हती." त्यांच्या मुखांतून येणारा प्रत्येक शब्द प्रेमानें भरून येत होता.

घरच्या दरवाज्यापर्यंत अद्याप ते आले नाहींत, तोंच ते एकदम थांबले, आणि नरेंद्राकडे पाहून ह्मणाले "एक शब्द—दोहोंपैकीं हा एक शब्द **'जीवात्मा'** आहे आणि हा दुसरा शब्द **'विश्व'** आहे."

खरोखर ते आत्म्याकडे आणि विश्वाकडे पहात होते काय? असतील तर कोणत्या दृष्टीनें? अगदीं स्तब्ध राहून ते समोर पहात होते. त्यांच्या पवित्र ओंठांतून एकदोन शब्द बाहेर पडले. हे शब्द ह्मणजे वेदतुल्य दैवी वचनेंच होत.

एकाद्या इसमानें अमर्याद सागराच्या किनाऱ्यास जावें आणि अमर्याद पसरलेला पाण्याचा विस्तार पाहून आश्चर्यचकित होऊन स्तब्ध रहावें, आणि अनंत ( सनातन ) अशा खोलींतून येणाऱ्या शाश्वत वाणीचे एकदोन प्रतिध्वनि ऐकावे, असा तरी हा प्रकार असावा काय?

---

## अध्याय पांचवा.

### अवताराविषयीं.

दरवाज्यापाशीं गिरीश उभा होता. सद्गुरूंचें स्वागत करण्यास तो पुढें आला. सद्गुरु पुढें गेले. शिष्य मागोमाग चालले. सद्गुरूंच्या पायांवर गिरीशनें

दंडवत प्रणाम केला. हा खरोखरीच फार रम्य देखावा होता, आणि तो सर्व शिष्यांनीं पूज्यबुद्धीनें आणि प्रेमानें पाहिला.

सद्गुरूंनीं सांगितल्यावर गिरीश उठला. सद्गुरूंच्या पवित्र चरणांची धूळ त्यानें आपल्या मस्तकावर व अंगावर घेतली. त्यानें सर्वांना दिवाणखान्यांत नेलें. तेथें सद्गुरु आणि सर्व शिष्य आपापल्या जागेवर बसले. अमर करून सोडणाऱ्या उपदेशामृतबिंदूंचें पान करण्यास सर्व उत्सुक झाले होते.

**वर्तमानपत्रें आणि श्रीरामकृष्ण.**

सद्गुरु आपल्या जागेवर नीट बसतात न बसतात, तोंच जवळच एक वर्तमानपत्र पडलेलें त्यांच्या दृष्टीस पडलें. वर्तमानपत्रांत ऐहिक गोष्टी, संसारी लोकच्या गप्पा, निंदा, इत्यादि गोष्टीच असावयाच्या. याकरितां वर्तमानपत्रें सद्गुरूंच्या दृष्टीनें अपवित्र वस्तु होत. त्यांनीं खूण केल्यावर तें वर्तमान पत्र दूर ठेविण्यांत आलें. नंतर सद्गुरु आपल्या जागेवर बसले.

सद्गुरु नित्याला ह्मणाले "बरें, मग पुढें ?"

नित्य ह्मणाला "होय महाराज. मला दक्षिणेश्वराला येणें झालें नाहीं, माझी स्थिति चांगली नव्हती. सर्व शरीर दुखत होतें."

सद्गुरु ह्मणाले "आतां तुझी प्रकृति चांगली आहे ना ?"

नित्य ह्मणाला "विशेष चांगली नाहीं असें कष्टानें ह्मणावें लागतें."

सद्गुरु ह्मणाले "निषादापर्यंत तूं एकदम मजल मारूं नको. पंचम किंवा धैवतापर्यंत रहावें, हेंच बरें."

नित्य ह्मणाला "मंडळीचें व माझें जुळत नाहीं. माझ्याविषयीं ते नाहीं नाहीं तें बोलतात. त्यामुळें मला भीति वाटते. केव्हां केव्हां मी निर्भय असतों आणि अंतरात्म्याचा जोर ( सामर्थ्य ) मला आहे असें वाटतें."

सद्गुरु ह्मणाले "असें होणें स्वाभाविक आहे. तुझा नेहमींचा मित्र कोण ?"

नित्य ह्मणाला "तारक. केव्हांकेव्हां त्याचेंहि माझ्या मनाच्या स्थितीशीं जुळत नाहीं."

सद्गुरु ह्मणाले "न्यांग्टा* सांगत असे, कीं, कांहीं सिद्धि प्राप्त करून घेतलेला असा एक तपस्वी त्याच्या मठांत रहात असे. तो नेहमीं आकाशाकडे दृष्टि

* एक वर्षभर ज्या संन्याशानें श्रीरामकृष्णांला वेदान्त शिकविला तो. त्याचें नांव तोतापुरी; श्रीरामकृष्ण त्याला न्यांग्टा असें म्हणत.

लावून चालत असे. त्याच्या गणेश गर्जी मित्रानें जेव्हां त्याला सोडून दिलें, तेव्हां त्याला फार वाईट वाटलें."

सद्गुरूंची स्थिति इतक्यांत बदलली. कांहीं वेळ ते अगदीं स्तब्ध राहिले. पुन्हां देहभानावर येऊन ते ह्मणाले—"तूं आलास होय, बरें मीहि येथेंच आहें."

हें गुह्य आपणास उकललें आहे असें कोण ह्मणेल ? ही देवाची वाणी आहे काय ? या वेळीं सद्गुरूंच्या चरणांजवळ नरेंद्र, गिरीश, राम, हरिपाद, चूनी, बलराम, महेंद्र आणि दुसरे बरेच शिष्य बसले होते.

नरेंद्राचा अवतारावर भरंवसा नव्हता. उलट, या आमच्या जगामध्यें ईश्वर वेळोवेळीं अवतार घेतो, असा गिरीशचा दृढ विश्वास असे. दोघांनीं या विषयावर बोलावें, अशी सद्गुरूंची इच्छा दिसली.

श्रीरामकृष्ण गिरीशला ह्मणाले "तुह्मां दोघांनां या विषयावर इंग्रजींत वादविवाद करतांना मीं ऐकावें असें मला वाटतें."

ते दोघेहि बोलले—इंग्रजींत नाहीं, पण बंगालींत. मधून मधून एकदोन इंग्रजी शब्द मात्र ते वापरीत असत. नरेंद्र ह्मणाला "ईश्वर अनंत, अमर्याद आहे. आमच्या क्षुद्र बुद्धीनें त्याचें आकलन करणें हें आमच्या सामर्थ्याबाहेरचें आहे. ईश्वर प्रत्येक मानवी प्राण्यांत आहे. तो एकाच विशिष्ट व्यक्तींत व्यक्त होतो असें कांहीं नाहीं."

सद्गुरु प्रेमानें ह्मणाले "माझेंहि मत तसेंच आहे. ईश्वर प्रत्येक वस्तूंत, प्रत्येक मानवी प्राण्यांत आहे. फक्त या वस्तूमधील दैवी शक्तीच्या (ईश्वरत्वाच्या) प्रादुर्भावामध्यें—व्यक्त होण्यामध्यें काय तो फरक आहे. कांहीं वस्तूंमध्यें व्यक्त असलेली दैवी शक्ति केव्हांकेव्हां आह्मांला ईश्वरापासून दूर नेते. तेव्हां तिला अविद्या असें ह्मणतात. जेव्हां ती ईश्वराप्रत नेते तेव्हां तिला विद्या ह्मणतात. पुन्हां ती व्यक्त शक्ति कांहीं 'पात्रां'मध्यें अधिक असते आणि कांहीं-मध्यें कमी असते. सर्व मनुष्यें सारखीं नाहींत याचें कारण तरी हेंच आहे."

राम ह्मणाला "या सर्व शुष्क वादाचा काय उपयोग आहे ?"

सद्गुरु जोरानें ह्मणाले "छे, या सर्व वादामध्यें पुष्कळ अर्थ आहे."

गिरीश नरेंद्रास ह्मणाला "ईश्वर मानवी शरीर धारण करून अवतार घेत नाहीं असें तूं कशावरून ह्मणतोस ?"

## एकादश परिच्छेद—अध्याय पांचवा.

नरेंद्र ह्मणाला "शब्दांनीं किंवा मनानें ईश्वराला जाणतां येत नाहीं."

सद्गुरु ह्मणाले "खरें. अशुद्ध, क्षुद्र मनानें त्याला जाणतां येत नाहीं; पण अभ्यासानें ज्याचा विषयांवरील आढा कमी झालेला आहे, अशा शुद्ध मनानें ईश्वराचा साक्षात्कार होतो. हें शुद्ध मन ह्मणजे शुद्ध बुद्धि अथवा आत्माच होय. याच रीतीनें परमात्म्याचा साक्षात्कार ऋषींनीं घेतला होता."

गिरीश नरेंद्रास ह्मणाला "ईश्वरानें जर अवतार घेतला नाहीं, तर या सर्व गोष्टी स्पष्टपणें सांगण्याला आणि हीं सर्व कोडीं सोडविण्याला दुसरा कोणीहि नाहीं हें तुझ्या लक्ष्यांत येत नाहीं काय? खरें ज्ञान, खरी भक्ति, ईश्वरी प्रेम ह्मणजे काय हें शिकविण्याला ईश्वर मानवी शरीर धारण करून अवतार घेतो. दुसरा शिक्षक कोण आहे?"

नरेंद्र ह्मणतो "कां? ईश्वर माझ्या अंतःकरणांत प्रेरणा करून मला शिकवील!"

सद्गुरु प्रेमानें ह्मणाले "हें अगदीं खरें. अंतर्यामीं परमात्मा याप्रमाणें शिकवील."

वादविवाद जोरांत आला. मानवी बुद्धीला अतर्क्य अशा विषयाकडे तो वळला. 'अमर्याद अनंत' त्याचे भाग कसे होतील? मानवी ज्ञानाच्या मर्यादे-विषयीं हामिल्टन काय ह्मणतो? हर्बर्ट स्पेन्सर, टिंडाल आणि हक्सले काय ह्मणतात? इत्यादि बोलणें चाललें.

सद्गुरु एकांतीं मला ह्मणतात "मला अशा गोष्टी आवडत नाहींत. ईश्वर मानवी तर्काला अगोचर आहे; याहून कांहीं विशेष आहे. **जें जें कांहीं आहे तें सर्व ईश्वर आहे असें मी पाहतों.** मग त्याच्याविषयीं वादविवाद आणि तर्क करून काय फायदा? '**सर्वं खल्विदं ब्रह्म**' असें मी प्रत्यक्ष पाहतों."

सद्गुरु ह्मणाले "ईश्वरच या सर्व वस्तु नटला आहे. तोच ही वस्तु आहे, आणि हिच्या विरुद्ध वस्तुहि तोच आहे. अशी एक अवस्था किंवा पायरी आहे, कीं, तेथें मन आणि बुद्धि हीं **अव्यक्तांत** (—अव्यक्त हें निरनिराळ्या भागांचें मिळून झालेलें आहे अशी कल्पनाच करितां येत नाहीं—) लीन होऊन जातात. नरेंद्राला पाहतांच माझें मन अव्यक्तांत लीन होतें. यावर तुझें काय ह्मणणें आहे?"

गिरीश हंसत ह्मणाला "आह्मांला सर्व कांहीं समजतें असें आपणास वाटतें काय?" सर्व हंसतात.

सद्गुरु ह्मणाले "समाधि उतरल्यानंतर एकादा शब्द बोलावा झटलें ह्मणजे मला त्या उच्च स्थितींतून निदान दोन पायऱ्या तरी खालीं आलें पाहिजे.

शंकराचार्यांनीं वेदान्ताचा अर्थ केला आहे; विशिष्टाद्वैतवादी रामानुजाचार्यांनींहि दुसऱ्या दृष्टीनें त्याचा अर्थ केला आहे."

नरेंद्र सद्गुरूंला ह्मणाला "विशिष्टाद्वैतवाद ह्मणजे काय ?"

**रामानुजाचार्य आणि विशिष्टाद्वैतवाद.**

सद्गुरु नरेंद्राला ह्मणाले "रामानुजाच्या मताला विशिष्टाद्वैतवाद असें ह्मणतात. थोडक्यांत तें मत असें आहे, कीं, ब्रह्माला जग आणि आत्मा यांहून वेगळें असें पाहूं नये. **तीन्ही एकांत** आहेत, आणि **एक तीन्हींत** आहे. आह्मीं एक बेलफळ घेऊंया. वरचें कवच, बीं आणि मगज हीं तीन्ही निरनिराळीं ठेवूं. फळाचें वजन किती आहे हें समजण्याची एकाला इच्छा आहे असें समजा. तर नुसत्या मगजाचेंच वजन करून चालणार नाहीं. फळाचें खरें वजन काय आहे हें समजण्याकरितां, कवच, बीं आणि मगज या तीन्हींचें वजन केलें पाहिजे. फळाचा मुख्य भाग ह्मणजे आंतील मगज होय. बीं अथवा कवच नव्हे, असें आह्मीं प्रथम ह्मणतों हें खरें. नंतर ज्या वस्तूचें मगज आहे त्याच वस्तूचें बीं आणि कवचहि आहे, असा आह्मी विचार करितों. प्रथम आह्मी ह्मणतों—'नेति नेति ( तें हें नव्हे ) ह्मणजे ब्रह्म जीवात्मा नव्हे किंवा जगहि नव्हे. ब्रह्म काय तें एक सत्य आहे, बाकी सर्व मिथ्या आहे. नंतर आह्मी थोडेसे पुढें जातों. मगज ज्या वस्तूचें आहे त्याचेंच बीं आणि कवचहि आहे, असें आह्मी पहातों. ज्या वस्तूपासून ब्रह्माची नकारार्थी ( नेति नेति ) कल्पना आह्मांला येते, त्याच वस्तूपासून आह्मांला जीवात्म्याची आणि दृश्य जगाची कल्पना येते. ज्या वस्तूपासून—परमात्म्यापासून नित्याची कल्पना होते, त्याचपासून अनित्याची ( लीला ) हि कल्पना होते. ह्मणून रामानुज ह्मणतात त्याप्रमाणें ब्रह्म हें जीवात्मा आणि दृश्य जग यांनीं विशिष्ट आहे. ( मर्यादित ) विशिष्टाद्वैतवाद तो हाच.

---

## अध्याय सहावा.

## परमात्म्याचें दर्शन.

सद्गुरु एकांतीं मला ह्मणतात "मी माझ्या डोळ्यांसमोर परमात्म्याला खरोखर पहातों ! मग मी व्यर्थ वादविवाद कां करूं ? आमच्या भोंवतालच्या सर्व कांहीं वस्तु परमेश्वरच नटला आहे, तोच जीवात्मा आणि दृश्य जग झाला

आहे, असें मला प्रत्यक्ष दिसतें आहे. अशी **सद्वस्तु** पाहण्याला खरोखरीच आंत आत्मजागृति झाली पाहिजे. 'नेति नेति' ह्मणून वादविवाद किंवा तर्क मनुष्यानें कुठपर्यंत करावा ? सद्वस्तु पाहण्याचें सामर्थ्य अंगीं आलें नाहीं तोंपर्यंत. निःसंशय परमात्माच हें सर्व कांहीं झाला आहे अ तें मला दिसतें. असें नुसतें एकाद्यानें म्हटलें तर भागणार नाहीं. नुसतें ह्मणणें पुरे होत नाहीं. ईश्वराच्या दयेनें आत्मजागृति झाली पाहिजे. आत्मजागृतीनंतर समाधि येते. या स्थितींत देहाचा विसर पडतो, जगावरील—कनककांता यांवरील सर्व आसक्ति नाहींशीं होते, देवाखेरीज दुसरें कोणतेंहि भाषण आवडत नाहीं, ऐहिक विषय ऐकावयाला लाविलेंच तर फार त्रास होतो. एकदां आंत आत्म-जागृति झाली, ह्मणजे परमात्म्याचा—विश्वास, साक्षात्कार ही त्यापुढील पायरी होय, आत्म्यानेंच आत्म्याचा साक्षात्कार घेतला पाहिजे."

**अवतार आणि साक्षात्कार.**

वादविवाद संपल्यानंतर सद्गुरु मला ह्मणतात " अरे, नुसत्या विचारानें (विवेकानें) देव (देवाची कल्पना) समजून घेणें आणि एकान्तीं ध्यानानें देवाचा साक्षात्कार करून घेणें, यांत फार अंतर आहे, हें मला कळून चुकलें. आणि तसेंच एकापक्षीं या दोन गोष्टी व दुसऱ्या पक्षीं ईश्वराच्या कृपेनें त्यांचा साक्षात्कार यांतहि तसेंच अंतर आहे. त्या दयाघन प्रभूनेंच जर दैवी अवतार ह्मणजे काय याचा उलगडा आह्मांला करून दिला, तर सर्व वादविवाद निरुपयोगी होईल. अवतार ह्मणजे काय हें समजून सांगण्याची कोणालाहि आवश्यकता उरणार नाहीं. हेंच अधिक स्पष्ट करून सांगतोंः—अशी कल्पना कर, कीं, एक मनुष्य अंधेऱ्या खोलींत आहे. तो आगपेटीच्या बाजूस काड्या पेटवीत आहे, आणि एकदम काडी पेटून चक्क उजेड पडतो. देवानें जर आमच्याकरितां दिवा पेटविण्याची आणि अज्ञानरूपी अंधकार नाहींसा करण्याची मेहरबानगी केली, तर सर्व संशय एकदम आपलें ठाणें कायमचें उठवतील. अशा तऱ्हेच्या वादविवादानें कांहीं कार्य होणार नाहीं. (समजणार नाहीं.)"

यानंतर सद्गुरूंनीं नरेंद्राला आपल्याजवळ बसण्यास सांगितलें. त्यांनीं त्याच्याविषयीं बरेच ममतेचे प्रश्न केले व त्याला गोंजारिलें.

नरेंद्र सद्गुरूंस ह्मणाला " महाराज, मीं एकांतीं एकसारखें तीनचार दिवस कालीमातेचें ध्यान केलें, पण त्यापासून कांहींच निष्पन्न झालें नाहीं ! "

सद्गुरु ह्मणाले " सर्व कांहीं योग्य वेळ आली ह्मणजे होईल. असा उतावी होऊं नकोस ! कालीमाता परमात्म्याहून भिन्न नाहीं. कालीमाता ही परम त्म्याची—ब्रह्माची सगुण बाजू होय. त्याच्या कार्यांचा विचार न करितां फ परमात्म्याचाच विचार केला, तर त्याला **निर्गुण, अव्य** ब्रह्म असें ह्मणतात; पण तेंच परमात्मा, सृष्टि स्थिति आ संहार—त्यानें केलेल्या वस्तूंचा ( कार्यांचा )—करितो अ जेव्हां आपण विचार करितों, तेव्हां त्याला **सगुणब्रह्म-जगन्माता** असें ह्मणतात. वेदान्तामध्यें ज्या परमात्म्याला तुह्मी ' ब्रह हें नांव देतां, त्याला मी ' माता ' असें ह्मणतों. अग्नि आणि दाहकर्श हीं जशीं एकच आहेत, तसें निर्गुण ब्रह्म आणि सगुण ब्रह्म एकच आहेत. एक शिवाय दुसऱ्याची कल्पनाच करितां येणार नाहीं. सगुण घेतलें, कीं, निर्गु आलेंच; निर्गुणाविषयीं बोलूं लागलां, कीं, सगुण तुह्मीं गृहीत घेतलेंच अ समजावें."

**निर्गुण आणि सगुण ब्रह्म.**

बराच उशीर झाला. गिरीशला थिएटरकडे गेलें पाहिजे होतें. तो हरिपाद ह्मणाला " भाई, एक गाडी आणीव, मला थिएटराला गेलें पाहिजे. "

सद्गुरु हरिपादकडे वळून हंसत ह्मणाले " लक्ष्यांत ठेव, एक गाडी तु आणलीच पाहिजे. विसरूं नको."

हरिपाद हंसत ह्मणतो " नाहीं विसरणार महाराज. मी त्याच कामाकरि जात नाहीं काय ?"

गिरीश सद्गुरूंस ह्मणाला " मला आतां आपणास सोडून माझ्या धंद्याच ठिकाणीं—थिएटरांत गेलें पाहिजे. महाराज, मी किती अभागी आहें !"

सद्गुरु ह्मणाले " छे, तसें नाहीं. तूं दोन्हीं ठिकाणचें काम केलें पाहिजे जगाशीं अनासक्त राहून जनकानें परमेश्वराची सेवा केली. इह आणि पर अ दोन्ही लोक त्यानें साधले. त्यानें दुधाचा प्याला ( सुख ) सेवन केला, आत्म्याला तो विसरला नाहीं "

गिरीश ह्मणतो " थिएटर सोडून द्यावें आणि तेथील सर्व व्यवस्था त मंडळीच्या हातीं द्यावी, असा मी विचार करीत आहें."

सद्गुरु ह्मणाले " छे छे, आहे तें सर्व ठीक आहे. असा विचार तूं कां मनांत आणूं नकोस. तूं पुष्कळांचें कल्याण करीत आहेस. "

## एकादश परिच्छेद—अध्याय सातवा.

" सखि ! से वन कत दूर !
जे वने आमार श्यामसुंदर !
ऐ ये कृष्णगंध पाओया जाय !
आमि चलिते जे नारि ! "

आतां मात्र त्यांचें जगाचें सर्व भान गेलें. या स्थितींत आपल्यापुढें कोण बसलें आहे, किंवा कोणती वस्तु आहे, याचा कांहीं एक विचार त्यांच्या मनांत नाहीं. नरेंद्र त्यांच्यासमोर बसलेला आहे, पण त्याच्याकडेसुद्धां ते पहात नाहींत. देशकालाचें कांहीं भान त्यांनां नाहीं. मन, अंतःकरण आणि आत्मा सर्व कांहीं परमात्म्यामध्यें लीन होऊन गेलें आहे.

पहा, पुन्हां ते उभे राहिले आणि "ईश्वरी प्रेमरूप वारुणीचें यथेच्छ प्राशन करून, ईश्वरी प्रेमानें पूरित होऊन" इत्यादि कांहीं ह्मणून आपल्या जागीं बसले.

पुन्हां ते ह्मणाले "येथें पलीकडून एक प्रकाश येत आहे, पण तो कोठून येतो हें मला आतां सांगतां येत नाहीं. " आतां नरेंद्रानें एक गाणें ह्मटलें:—

सब दुख दूर करिले दरशन दिये—
मोहिले प्राण ।
सप्त लोक भुले शोक, तोमारे पाइये—
कोथाय आमि अति दीनहीन ॥

हें गाणें ऐकतांच पुन्हां सद्गुरूंचें जगाचें भान गेलें. त्यांचे डोळे मिटलेले होते. त्यांचें शरीर आणि अवयव अगदीं स्तब्ध होते. त्यांची पूर्ण समाधि लागलेली होती.

समाधि उतरल्यावर सद्गुरु ह्मणाले " मला कोण घेऊन जाईल ? "

मुलाला बरोबर सोबत पाहिजे. एकटेंच मूल असलें तर त्याला सभोंवतीं अंधाराशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं। याप्रमाणेंच सद्गुरु वरील वाक्य बोलले.

फार उशीर झाला. फाल्गुन वद्य १० ची रात्र. सद्गुरु देवालयांत जाण्यास निघाले. ते तेथें जाण्यास गाडींत बसले. त्यांनां पोहोंचविण्यास गाडीच्या दोन्ही बाजूंस शिष्य उभे राहिले. अद्याप ते ईश्वरी आनंदांत निमग्न होते.

गाडी निघून गेली. शिष्य कांहीं वेळ तिकडे पहात राहिले आणि नंतर निरनिराळ्या वाटांनीं आपआपल्या घरीं निघून गेले.

---

# द्वादशपरिच्छेद.

## १८८५

## शिष्य, ईशान मुखोपाध्याय, डॉक्टर सरकार आणि दुसरी मंडळी यांसहित श्यामपुकुर ( कलकत्ता ) येथें

## अध्याय पहिला.

### ईश्वर साकार आहे किंवा निराकार आहे ?

गुरुवार, ता. २२ आक्टोबर १८८५, आश्विन शु. १४ स ( दुर्गापूजा ह्मणजे नवरात्र संपल्यानंतर ) सद्गुरु कलकत्त्यांतील श्यामपुकुर भागांत असून डॉ. सरकार आणि दुसरे वैद्य यांचें औषध घेत होते. या दिवशीं डॉ. सरकार-शिवाय गिरीश घोष, ईशान मुखोपाध्याय, मी आणि दुसरे शिष्य व भक्त हजर होते. श्रीरामकृष्ण प्रत्येकाशीं हंसत बोलत होते. ईशान, गिरीश आणि डॉक्टर हे संभाषणांत सामील झाले.

डॉक्टर ह्मणाले "ज्ञानानें ( देवाच्या कृत्यांच्या—कर्मांच्या ज्ञानानें ) मनुष्य मुग्ध होऊन जातो, नेत्र झांकले जातात आणि त्यांतून अश्रु येऊं लागतात; असें झालें ह्मणजे देवाची भक्ति सुरू झाली."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "देवाची भक्ति ही कुलीन स्त्री आहे आणि तिला झनानखान्यांत प्रवेश करण्याची मुभा असते. विवेकानें प्राप्त झालेल्या ज्ञानाला, पुरुषांकरितां राखून ठेविलेल्या दिवाणखान्यापर्यंतच जातां येईल; पण आंतल्या खोलींत—अंतःपुरांत—पवित्र जागेंत जातां येणार नाहीं."

डॉक्टर ह्मणाले "हें अगदीं खरें, पण ज्यांचें शील चांगलें नाहीं अशा स्त्रियांना—उदाहरणार्थ शहरांतील बायांना—झनान्यांत जाऊं देऊं नये. याकरितां ज्ञानाची जरूरी आहे. मी ईश्वराची भक्ति करितों असें प्रत्येक वेडगळ मनुष्य ह्मणतो ह्मणून त्याला आंत जाऊं देऊं नये."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "जर एकाद्या मनुष्याला खरी कळकळ आहे आणि देवाचीच जर तो इच्छा करितो, तर शेवटीं त्याला देव मिळणारच. मग त्याला

ज्ञान होवो अथवा न होवो. देवाच्या शोधार्थ असतांना जर तो चुकीच्या मार्गानें गेला, तर देवाविषयीं खरी जिज्ञासा असल्यास देव त्याला त्याच्या ध्येयाकडे नेईल. एक भक्त पुरीच्या यात्रेला निघाला, परंतु रस्ता माहीत नसल्या-मुळें दक्षिणेस जाण्याऐवजीं तो थेट पश्चिमेकडे निघाला. पुरी येथील देवाचें दर्शन घेण्याच्या उत्सुकतेनें त्यानें आपण कोणत्या रस्त्यानें जावें असें लोकांनां विचारलें. त्यांनीं पुरीस जाणारा खरा रस्ता तूं चुकला आहेस, तूं दक्षिण दिशेनें जा, असें त्यास सांगितलें."

डॉक्टर ह्मणाले "होय, तो मनुष्य अज्ञानानें आपला रस्ता चुकला."

सद्गुरु ह्मणाले "लोक चुका आणि धर्मभोळेपणा यांविषयीं पुष्कळ बोलतात व आपलें पांडित्य मिरवितात; पण प्रेमस्वरूपी ईश्वर आपणास मदत करण्यास नेहमीं तयार असतो असें खऱ्या भक्तास आढळून येतें. कांहीं वेळ खरा भक्त चुकीच्या मार्गानें जात होता याचें कांहीं महत्व नाहीं. आह्मांला काय पाहिजे हें ईश्वर जाणतो, आणि शेवटीं तो आमच्या अंतःकरणांतील इच्छा पुरवितो."

नंतर 'ईश्वर साकार आहे का निराकार आहे' असा कोणीं प्रश्न केला. त्यावर

**ईश्वर साकार कीं निराकार?**

श्रीरामकृष्ण ह्मणाले "ईश्वर साकार आहे तसाच निराकारहि आहे. एक संन्यासी पुरी येथील जगन्नाथाच्या देवालयांत गेला. ईश्वर साकार आहे किंवा निराकार आहे याची त्याला शंका होती. देवाची पवित्र प्रतिमा पाहिल्यावर ती तपासावी असें त्याच्या मनांत आलें. आपला दंड मूर्तीला स्पर्श करितो किंवा नाहीं हें पहावें ह्मणून त्यानें तो डावीकडून उजवीकडे नेला. कांहीं वेळ त्याला कांहींच दिसेना आणि त्याचा दंड कशासहि लागेना. तेव्हां देव निराकार आहे असें त्याला वाटलें. आतां तो आपला दंड उजवीकडून डावीकडे नेणार इतक्यांत त्या दंडाला मूर्तीचा स्पर्श झाला; तेव्हां त्या संन्याशाची देव साकार आणि निराकार आहे अशी खात्री झाली. पण याचा प्रत्यय येणें—साक्षात्कार होणें फार कठिण आहे. जो निराकार आहे तो साकार कसा होईल? असा प्रश्न सहजच मनांत येतो."

डॉक्टर ह्मणाले "देवानें रूपें (आकार) केलीं आहेत, ह्मणून तो साकार आहे, व त्यानें आकार नसलेलें मनहि केलें आहे ह्मणून तो सृष्टिकर्ता निराकार आहे. या रीतीनें देव साकार आणि निराकार दोन्हीहि असूं शकेल."

सद्गुरु ह्मणाले "देवाला पाहिल्याशिवाय या सर्वांचा प्रत्यय कोणालाहि येत नाहीं. ईश्वर आपल्या भक्तासाठीं अनेक रीतींनीं आणि रूपांनीं व्यक्त होतो. एक रंगारी एका विशेष रीतीनें कपडे रंगवीत असे. 'कोणत्या रंगानें आपला कपडा रंगवून देऊं,' असें तो गिऱ्हाइकास विचारी. 'तांबड्या रंगानें' असें गिऱ्हाइकानें सांगितलें, कीं, तो रंगारी कपडा आपल्या पिंपांत बुडवी आणि वर काढून ह्मणे 'हा घे तुझा तांबडा कपडा.' दुसऱ्या गिऱ्हाइकाला आपला कपडा पिवळ्या रंगानें रंगवून पाहिजे असतो. रंगारी त्याच पिंपांत त्याचा कपडा बुडवितो आणि वर काढतो तों कपडा पिवळा रंगलेला आहे! त्याचप्रमाणें दुसरा एकादा रंग निळा, नारिंगी, हिरवा, गुलाबी–पाहिजे असल्यास त्याच पिंपांत कपडा बुडवून तो रंग रंगवून देतो. ही सर्व क्रिया नीट पाहणारा एक गिऱ्हाईक रंगाऱ्यापाशीं आला आणि ह्मणाला 'मला कोणताहि रंग विशेष आवडत नाहीं. तुझ्या पसंतीस येईल त्याप्रमाणें माझा कपडा रंगवून दे. तूं स्वतःला ज्या रंगानें रंगवून घेतलें आहेस तो रंग मला पाहिजे.'" सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणाले "आपल्या भक्ताच्या विशिष्ट गरजेप्रमाणें ईश्वर साकार किंवा निराकार असा व्यक्त होतो. ईश्वराचें व्यक्त झालेलें स्वरूप एका पक्षीं अल्पबुद्धि आणि मर्यादित प्राण्याच्या दृष्टीनें, तसेंच दुसऱ्या पक्षीं ज्याच्या भोंवतालीं अनेक पदार्थ आहेत अशा प्राण्याच्या दृष्टीनें, सापेक्षत्वानें खरें आहे. दैवी रंगाऱ्यानें स्वतःला कोणत्या रंगांत रंगवून घेतलें आहे हें त्याचें त्यालाच माहीत. खरोखर तो नाम, रूप (आकार) किंवा त्यांचा अभाव इत्यादि कोणत्याच उपाधीनें मर्यादित नाहीं. एक मनुष्य आपल्या मित्रास ह्मणाला 'मित्रा, मी त्या झाडाखाली गेलों आणि तेथें एक तांबड्या रंगाचा सरडा पाहिला.' त्याचा मित्र ह्मणाला 'अरे मींहि पाहिला; पण तो तसा नाहीं, तो हिरवा आहे.' तिसरा एक इसम ह्मणाला 'छे, छे, मींहि पाहिला; पण तो पिवळा आहे.' दुसऱ्या कित्येकांनीं खात्रीनें सांगितलें, कीं, त्याचा रंग नारिंगी, निळा इत्यादि आहे. याप्रमाणें ते वाद करतां करतां हातघाईवर आले. इतक्यांत एक तिऱ्हाईत इसम तेथें आला. त्यानें सर्व प्रकार ऐकिला आणि सर्वजणांस शांत होण्यास सांगून ह्मटलें 'पहा, मी त्या झाडाखालींच राहतों, आणि त्या प्राण्याची मला पूर्ण माहिती आहे. तुमच्यापैकीं प्रत्येकाचें ह्मणणें बरोबर आहे. कारण, सरडा हा क्षणोक्षणीं आपला रंग बदलणारा प्राणी आहे. आतां तो तांबडा आहे तर

कांहीं वेळानें तो हिरवा होईल; दुसऱ्या क्षणीं पिवळा किंवा निळा होईल. तुह्मांला आश्चर्य वाटेल, पण मीं कित्येक वेळीं त्याला वर्णरहित असतांनाहि पाहिलें आहे. ”

सद्गुरु पुढें ह्मणाले “ज्यानें ईश्वराकरतां सर्व कांहीं टाकून दिलें आहे, जो जीवनवृक्षाखालीं राहून निरीक्षण करतो, त्यालाच ईश्वर कसा आहे हें समजतें. आपल्या भक्ताला अनेक रूपांनीं ईश्वर भेटतो असें तो जाणतो. सरडा आतां तांबडा, आतां हिरवा, आतां नारिंगी अथवा पिवळा आणि आतां त्याला कोणताच रंग नाहीं असा आहे. सृष्टि, स्थिति आणि संहार करणारा तो सर्वशक्तिमान् प्रभु आहे. त्याच्या गुणांचें चिंतन करूं गेल्यास आह्मी मुग्ध होऊन जातों. गुणविशिष्ट असा तो मानवांनां व्यक्त होतो. पण वर्णरहित सरड्याप्रमाणें तो निर्गुण अव्यक्तहि आहे. होय, तूं ह्मणतोस त्याप्रमाणें तो साकार आणि निराकार आहे. अमर्यादित समुद्र मनांत आण. अतिशय थंडी पडली ह्मणजे किनाऱ्याकडचें पाणी गोठून त्याचें बर्फ बनतें, आणि बर्फाचा आकार निरनिराळ्या जागीं निरनिराळा होतो. पण सूर्य उगवून त्याचा प्रकाश बर्फावर पडला ह्मणजे बर्फ वितळून जातें.”

सद्गुरु पुढें ह्मणाले “वेलारहित ( अमर्याद ) समुद्र ह्मणजे ईश्वर; अतिशय थंडी ह्मणजे गार करून टाकणारी ईश्वराची भक्ति होय; निरनिराळ्या आकाराचें बर्फ ह्मणजे गार करून सोडणाऱ्या उत्कट भक्तीमुळें आपल्या भक्तांनां अनेक रूपांनीं भेटणारा ईश्वर होय; सूर्यकिरणांनीं निरनिराळ्या आकाराचें बर्फ वितळून जाणें ह्मणजे समाधीमध्यें दिव्य ज्ञानसूर्याच्या प्रखर किरणांनीं भक्तांनां भेटण्याकरितां धारण केलेलीं दिव्य स्वरूपें नाहींशीं होणें हें होय.”

डॉक्टर ह्मणाले “सूर्य वर आला ह्मणजे बर्फ खरोखर वितळतें; इतकेंच नव्हे, तर पाण्याचीहि अदृश्य अशी वाफ होते. आधुनिक शास्त्रानें हें सिद्ध केलें आहे. ही गोष्ट आपल्या दृष्टांतास पूर्णपणें लागू पडेल असें आपणास वाटत नाहीं काय ?”

सद्गुरु ह्मणाले “ त्या दृष्टांतापासून एवढाच बोध घ्यावयाचा, कीं, आह्मी आत्मानात्मविवेक करूं लागलों, कीं, आत्मा ( ब्रह्म ) सत्य आहे, अनात्मा ( दृश्य जगत् ) मिथ्या आहे, असा निष्कर्ष निघतो. नामरूपें असलेल्या सर्ववस्तु– मग त्या आधिभौतिक अथवा पारमार्थिक असोत–दृश्य जगतांत येतात. वेदा-

डॉक्टर ह्मणाले "मुलाचा हात धरणें हें बापाला योग्य नाहीं. तसें केलें तर तो त्याच्या स्वावलंबनाच्या आड येईल."

सद्गुरु ह्मणाले "ज्यांनीं ईश्वर पाहिला आहे, त्यांचा क्षुद्र अहंकार नष्ट होतो. नंतर ते देवाशीं तादात्म्य पावलेल्या उच्च अहंकारानें वागूं लागतात. आपण स्वतःला कांहीं मदत करीत नाहीं, तर जगन्माता आपणाला मदत करिते असें त्यांनां वाटते. त्यांची सर्व शक्ति परमेश्वरापासून त्यांनां मिळालेली असते. जगन्मातेवांचून ते असून नसल्यासारखेच. **माता** हजर असली ह्मणजेच मुलांनां अधिक जोर येतो."

डॉक्टर ह्मणाले "डोळे कुणीं तरी झांकल्याशिवाय घोडे एक पाऊलहि पुढें उचलणार नाहींत. आपले सर्व मनोविकार ताब्यांत ठेवल्याशिवाय देवाचा साक्षात्कार होणें शक्य आहे काय?"

**भक्तिमार्ग; ज्ञानमार्ग.**

सद्गुरु ह्मणाले "तूं ज्ञानमार्गाविषयीं बोलतोस होय? त्या मार्गानेंसुद्धां देवाकडे जातां येतें. ज्ञानी ह्मणतो, ईश्वराला पहाण्याची इच्छा आहे तर प्रथम आह्मीं पवित्र असलें पाहिजे. प्रथम आपले मनोविकार ताब्यांत ठेवले पाहिजेत. प्रथम आत्मसंयमन आणि नंतर देवदर्शन. दुसरा एक मार्ग–भक्तिमार्ग ईश्वराप्रत नेतो. एकदां का ईश्वराविषयीं भक्तीनें आपल्या अंतरात्म्यांत–अंतःकरणांत ठाणें दिलें,–त्याच्या पवित्र नामाच्या गजरानें भक्त आनंदभरित झाला, ह्मणजे मग मनोविकार ताब्यांत ठेवण्याविषयीं कांहीं खटपट नको. मनोविकारांचा ताबा मग सहज येतो. दुःखानें गांजलेला मनुष्य तंटे काढावयास, मेजवानी झोडावयास अगर विषयसुखांत मन घालावयास तयार असतो काय? पावसाळ्यांत दिसणाऱ्या पतंगानें एकदां का दिवा पाहिला कीं मग तो अंधाराच्या शोधार्थ जातो काय?"

डॉक्टर हंसत ह्मणाले "खरेंच तो जात नाहीं. तो दिव्याच्या ज्योतीवर घालून घेण्यास आणि मरण्यासहि तयार असतो!"

सद्गुरु ह्मणाले "पण येथें तसा प्रकार नाहीं. देवाच्या खऱ्या भक्ताला पतंगाप्रमाणें मरण येत नाहीं. ज्या सचेतन प्रकाशाकडे भक्त ओढिला जातो, तो प्रकाश जाळीत नाहीं व मारीत नाहीं. त्याचा प्रकाश रत्नप्रभेप्रमाणें चकाकणारा पण कोमल, थंड आणि शांत असा आहे. तो जाळीत नाहीं, पण शांति आणि

तर अनेक सबबी सांगून मला येतां येत नाहीं असेंच तो खात्रीनें सांगेल. त्याला ‘ आपण मोठे आहोंत, अशा मनुष्याला कां भेटावें, ’ असें वाटतें. गर्व अज्ञानामुळें येतो. ”

सद्गुरु पुढें ह्मणाले “ गर्व, लोभ, कामवासना, राग आणि दुसरे मनोविकार यांनां ताब्यांत कसें ठेवावें, हा प्रश्न आहे. पाथुरेघाटचा ( कलकत्त्यांतील एकभाग ) गिरींद्र घोष ह्मणाला ‘ सर्व मनोविकार अगदीं नाहींसे करणें हें कांहीं शक्य नाहीं. याकरितां आपण त्यांनां निराळेंच वळण देऊं या. वैषयिक सुखाऐवजीं ईश्वराविषयींच आमची इच्छा असावी. दैवी आनंदाचा अतिरेक आह्मीं अनुभवावा. आह्मी देवाचे पुत्र आहों, सर्वश्रेष्ठाचे दास आहों, असा आह्मांला गर्व असावा. ईश्वराच्या नामावर श्रद्धा ठेवण्यांत आह्मांला अभिमान वाटावा. ईश्वरभजनीं काम असावा. आणि आह्मीं असें ह्मणावें, कीं, ईश्वराचें पवित्र नाम मीं गायिलें आहे, आणि मी पापापासून–बंधनापासून मुक्त आहें. मला मुक्तीविषयीं काळजी नाहीं, इत्यादि. या संसारांतील–जगांतील वस्तु संपत्ति, मान, घरदार इत्यादि–खरोखर माझ्या नव्हत, पण ईश्वर माझा आहे आणि त्याचे भक्त माझे आहेत. मला संपत्तीचा आणि पदव्यांचा लोभ आहे काय ? छे, मला ईश्वरदर्शनाचा मोठा लोभ आहे आणि त्याचीच मला अतिशय उत्कंठा आहे. अशा रीतीनें सहाहि रिपु–आपले मनोविकार ईश्वराकडे वळवावे. ”

डॉक्टर ह्मणाले “ मनोविकार ताब्यांत ठेवणें कठिण आहे. ते तुफान घोड्याप्रमाणें आहेत. त्यांचे डोळे पडद्यानें–पट्टयानें बांधले पाहिजेत. अडखळूं नये किंवा भलत्याच मार्गानें जाऊं नये, ह्मणून कित्येक घोड्यांचे डोळे बाह्यजनांपासून अगदीं झांकून ठेविले पाहिजेत. ”

सद्गुरु ह्मणाले “ ईश्वरदर्शनाचा लाभ जर एकाद्याला दैवयोगानें झाला, तर त्याचे मनोविकार कांहीं अहित करूं शकत नाहींत. नारद, प्रल्हाद यांच्यासारख्या सिद्धांनां डोळ्यांवरून पट्टया बांधण्याची गरज नाहीं. बापाचा हात धरून बांधावरून चालणारें मूल, बापाचा हात सुटून कदाचित् खड्डयांत पडण्याचा संभव असतो. पण बापानेंच ज्या मुलाचा हात धरिला, त्याची गोष्ट अगदीं निराळी. त्याला खड्डयांत पडण्याचें कांहींच भय नाहीं ”

डॉक्टर ह्मणाले "मुलाचा हात धरणें हें बापाला योग्य नाहीं. तसें केलें तर तो त्याच्या स्वावलंबनाच्या आड येईल."

सद्गुरु ह्मणाले "ज्यांनीं ईश्वर पाहिला आहे, त्यांचा क्षुद्र अहंकार नष्ट होतो. नंतर ते देवाशीं तादात्म्य पावलेल्या उच्च अहंकारानें वागूं लागतात. आपण स्वतःला कांहीं मदत करीत नाहीं, तर जगन्माता आपणाला मदत करिते असें त्यांनां वाटते. त्यांची सर्व शक्ति परमेश्वरापासून त्यांनां मिळालेली असते. जगन्मातेवांचून ते असून नसल्यासारखेच. **माता** हजर असली ह्मणजेच मुलांनां अधिक जोर येतो."

डॉक्टर ह्मणाले "डोळे कुणीं तरी झांकल्याशिवाय घोडे एक पाऊलहि पुढें उचलणार नाहींत. आपले सर्व मनोविकार ताब्यांत ठेवल्याशिवाय देवाचा साक्षात्कार होणें शक्य आहे काय?"

**भक्तिमार्ग; ज्ञानमार्ग.**

सद्गुरु ह्मणाले "तूं ज्ञानमार्गाविषयीं बोलतोस होय? त्या मार्गानेंसुद्धां देवाकडे जातां येतें. ज्ञानी ह्मणतो, ईश्वराला पहाण्याची इच्छा आहे तर प्रथम आह्मीं पवित्र असलें पाहिजे. प्रथम आपले मनोविकार ताब्यांत ठेवले पाहिजेत. प्रथम आत्मसंयमन आणि नंतर देवदर्शन. दुसरा एक मार्ग–भक्तिमार्ग ईश्वराप्रत नेतो. एकदां का ईश्वराविषयीं भक्तीनें आपल्या अंतरात्म्यांत–अंतःकरणांत ठाणें दिलें,–त्याच्या पवित्र नामाच्या गजरानें भक्त आनंदभरित झाला, ह्मणजे मग मनोविकार ताब्यांत ठेवण्याविषयीं कांहीं खटपट नको. मनोविकारांचा ताबा मग सहज येतो. दुःखानें गांजलेला मनुष्य तंटे काढावयास, मेजवानी झोडावयास अगर विषयसुखांत मन घालावयास तयार असतो काय? पावसाळयांत दिसणाऱ्या पतंगानें एकदां का दिवा पाहिला कीं मग तो अंधाराच्या शोधार्थ जातो काय?"

डॉक्टर हंसत ह्मणाले "खरेंच तो जात नाहीं. तो दिव्याच्या ज्योतीवर घालून घेण्यास आणि मरण्यासहि तयार असतो!"

सद्गुरु ह्मणाले "पण येथें तसा प्रकार नाहीं. देवाच्या खऱ्या भक्ताला पतंगाप्रमाणें मरण येत नाहीं. ज्या सचेतन प्रकाशाकडे भक्त ओढिला जातो, तो प्रकाश जाळीत नाहीं व मारीत नाहीं. त्याचा प्रकाश रत्नप्रभेप्रमाणें चकाकणारा पण कोमल, थंड आणि शांत असा आहे. तो जाळीत नाहीं, पण शांति आणि

आनंद देतो. ज्ञानमार्ग ईश्वराप्रत नेतो खरा, पण तो फार कठिण आहे.

**ज्ञानमार्गाचें काठिन्य.**

ज्ञान्याप्रमाणें ' मी देह नाहीं, मन नाहीं, बुद्धि नाहीं. रोग, दुःख किंवा तळमळ हीं मला बाधूं शकत नाहींत. सुख-दुःखाच्या पलीकडे मी आहें, इंद्रियांचा मी गुलाम नाहीं, माझा आत्मा सच्चिदानंद आहे,' असें बोलणें फार सोपें आहे; पण याचा साक्षात्कार–प्रत्यय घेणें फार कठिण आहे. कांट्यांनीं हात फाटला आहे आणि त्यांतून रक्त गळत आहे, अशा वेळीं 'माझा हात फाटलाच नाहीं, त्यांतून रक्त गळत नाहीं, सर्व कांहीं माझें ठीक आहे,' असें कोणी ह्मणणार नाहीं. देवापासून दूर नेणारा व मनुष्यांनां होत असलेलीं सर्व दुःखें उत्पन्न करणारा अज्ञानरूपी कंटक ज्ञानज्योतींत जाळून टाकिला पाहिजे. ''

**पुस्तकी ज्ञान आणि दिव्य ज्ञान.**

सद्गुरु पुढें ह्मणाले ''देवाचें ज्ञान ग्रंथाच्या अध्ययनाशिवाय प्राप्त होत नाहीं, असें पुष्कळ समजतात; पण वाचनापेक्षां श्रवण श्रेष्ठ आहे, श्रवणापेक्षां प्रत्यक्ष दर्शन अथवा साक्षात्कार श्रेष्ठ आहे. नुसत्या वाचनापेक्षां गुरुमुखांतून श्रवणानें मनावर चांगला ठसा उमटतो. प्रत्यक्ष दर्शनानें तर मनांत कोणतीहि गोष्ट उत्तम बिंबते. काशीक्षेत्राविषयीं वाचण्यापेक्षां प्रत्यक्ष पाहिलेल्याकडून त्याविषयीं माहिती ऐकणें हें फार चांगलें. आणि आपल्या डोळ्यांनीं तें क्षेत्र पाहणें हें तर सर्वांत उत्तम. बुद्धिबळाच्या डावांत खेळणारापेक्षां प्रेक्षक अमुक डाव बरोबर आहे किंवा नाहीं हें चांगलें सांगूं शकतात. आपण फार हुशार आहों असें संसारी लोकांनां वाटतें. पण ते संपत्ति, मान, सुख इत्यादि ऐहिक वस्तूंवर आसक्त असतात. डावांत प्रत्यक्ष सामील झाल्यानें अमुक डाव बरोबर आहे कीं नाहीं, हें त्यांनां समजत नाहीं. संन्यास घेतलेल्या पवित्र साधूंनां जगाची आसक्ति नसते. ते बुद्धिबळाचे डाव पाहणारे प्रेक्षक होत. संसारी लोकांपेक्षां त्यांनां वस्तूंचें निरीक्षण चांगलें करतां येतें. ''

डॉक्टर एका शिष्याला ह्मणाले '' महाराजांनीं नुसते ग्रंथच वाचले असते, तर त्यांनां असें दिव्य ज्ञान प्राप्त झालें नसतें. फॅरडे यानें निसर्गाचाच अभ्यास सुरू केला, यामुळें त्याला बरींच शास्त्रीय तत्वें शोधून काढितां आलीं. नुसत्या ग्रंथांच्या अध्ययनानें त्याला इतकें ज्ञान मिळालें नसतें. निसर्गाचें ...म निरीक्षण केल्यानें त्याला बरीच मदत झाली. गणितांतील सिद्धांत rmulae ) डोकें बिघडवून टाकितात, आणि नूतन शोधांच्या बरेच

आड येतात. हा गृहस्थ ( सद्गुरु ) इतका शाहणा आहे, याचें कारण तो निसर्गाचें मूल आहे हें होय. "

श्रीरामकृष्ण डाक्टरास ह्मणाले "पूर्वी एके काळीं मी पंचवटीच्या पायथ्याशीं जगन्मातेच्या दर्शनाविषयीं उत्सुक होऊन पडलों होतों. अधिक प्रकाश ( ज्ञान ) मिळावा ह्मणून मी जगन्मातेची रडून प्रार्थना करीत असें, कीं, 'हे माते, मी तर अक्षरशत्रु आहें. कर्मफलाकडे न पाहतां अनासक्तपणें कर्मे करणाऱ्या कर्मयोग्यांनां जें कांहीं ज्ञान प्राप्त होतें आणि जो कांहीं साक्षात्कार येतो, ध्यानानें योग्यांनां जें कांहीं प्राप्त होतें आणि ज्याचा साक्षात्कार होतो, तें सर्व कांहीं मला मिळेल अशी माझ्यावर कृपा कर.' ग्रंथ मीं केव्हांच वाचले नाहींत. माझ्या जगन्मातेनें या सर्व गोष्टी मला उघड केल्या आहेत, आणि कितीतरी सांगितलें आहे. अहाहा ! काय ती आनंदाची स्थिति ! त्या स्थितींत निद्रा दूर पळून जाते. "

सद्गुरु गाणें ह्मणूं लागलेः—

घुम भेङ्गेछे आर कि घुमाइ
योगे-यागे जेगे आछि !
एखन योगनिद्रा तोरे दिये मा;
घुमेरे घुम पाडायेछि !

सद्गुरु पुढें ह्मणाले "मीं पुस्तकें कधींच वाचलीं नाहींत. पण लोक मला कस मान देतात पहा ! याचें कारण मी माझ्या जगन्मातेचें नाम गातों. माझ्याविषयी शंभू मलिक असें ह्मणत असे, कीं, ढाल तरवार कांहीं नसतां पाहिजे त्याच पराभव करण्यास हा शांतिरामसिंग समर्थ आहे. " सर्व हंसतात.

गिरीशनें केलेल्या 'बुद्धचरित्र' या नाटकाविषयीं नंतर संभाषण झालें नाटककर्त्यानें डॉक्टरास तें नाटक पहाण्यास बोलाविलें होतें. त्याला तो खेव फार आवडला.

डॉक्टर गिरीशला ह्मणाले " थिएटरला तूं मला रोज ओढून नेतोस हें तुझें काम किती वाईट आहे ?"

श्रीरामकृष्ण मला ह्मणाले " तो काय ह्मणतो हें मला समजलें नाहीं."

मी हंसत ह्मणालों " नाटक आपणास फारच आवडलें असें डॉक्टरचें ह्मणणें आहे."

---

## अध्याय तिसरा.

### अवताराविषयीं.

श्रीरामकृष्ण ईशानास ह्मणाले " अवतारावर डॉक्टरचा विश्वास नाहीं, या विषयावर तुझें काय ह्मणणें आहे ? "

ईशान ह्मणाला " महाराज, मी काय सांगूं ? या विषयावर प्रश्न करणें आणि वादविवाद करणें हें मला आवडत नाहीं. "

श्रीरामकृष्ण जोरानें ह्मणाले " हें कां ? प्रसंगविशेषीं बरोबर गोष्ट कोणती हें तूं सांगणार नाहींस ? "

ईशान डाक्टरास ह्मणाला " आमच्या गर्वामुळें आमची श्रद्धा नाहींशी होते. श्रीरामचंद्र वरपांगी मानव दिसत होते. खरोखर तो परमात्माच. त्याच्या देहापासून हें अमर्यादित आकाश, सूर्य, चंद्र आणि तारे, अगाध सिंधु आणि बर्फाच्छादित पर्वत या सर्वांसहित अनंत विश्व निर्माण झालें आहे. "

**ईश्वर मानवी अवतार घेतो काय?**

श्रीरामकृष्ण डाक्टरास ह्मणाले " सर्व उपाधींनीं युक्त दिसणारा मानव ( अवतारी ) अनंत, शाश्वत आणि सनातन परमात्मा कसा असूं शकेल हें समजणें फार कठिण आहे. ज्याला ईश्वराचा साक्षात्कार झाला आहे तो, परमात्माच दृश्य जगाप्रमाणें–मानव आणि निसर्ग याप्रमाणें–दिसतो असें जाणतो. उपाधियुक्त असा मानव जो दिसतो, पण त्याला खरोखर उपाधि कांहीं नाहींत. उदाहरणार्थ, त्यानें मानवी देह धारण केला ह्मणून त्या देहाबाहेर तो नाहीं, असें त्याच्याविषयीं ह्मणतां यावयाचें नाहीं. तो आतां येथें आणि तसेंच याच क्षणीं दुसरीकडेहि असूं शकेल. ज्यानें देव पाहिला आहे त्याला हें सर्व समजतें आणि त्याचा विश्वास बसतो. औंसभर बुद्धि असलेल्या साधारण मनुष्याला हें कळत नाहीं. एक शेरभर दुधाच्या भांड्यांत कधीं तरी चार शेर दूध मावेल काय ? याकरितां अशा गोष्टीसंबंधानें देव पाहिलेल्या संतांच्या वचनावर आह्मीं विश्वास ठेवावा. संतच सदैव परमेश्वराचें ध्यान करतात. जर तुला कायद्यासंबंधीं सल्ला पाहिजे असेल तर तूं वकीलाकडे जाणार नाहीं काय ? रस्त्यावरील कोणाहि मनुष्याचा सल्ला तूं खचित घेणार नाहींस. "

**सत्याची कसोटी. दृश्याचें शास्त्र कीं सत्याचें शास्त्र ? पदार्थविज्ञानशास्त्र कीं अध्यात्मशास्त्र ?**

ईशान डाक्टरास ह्मणाला "ईश्वर मानवी देह धारण करून अवतार घेत नाहीं असें तूं कां ह्मणतोस ? ईश्वर साकार आणि निराकार आहे, आणि देवाला कांहींहि अशक्य नाहीं हें तूं मघाशींच कबूल केलें आहेस."

श्रीरामकृष्ण हंसत ह्मणाले "पण बाबा, ही गोष्ट त्याच्या आधुनिक शास्त्रग्रंथांत सांगितली नाहीं. हा फार महत्त्वाचा मुद्दा आहे. मानवी देह धारण करून ईश्वर मानवांनां तारण्यासाठीं अवतार घेतो, असे शब्द त्याच्या शास्त्रग्रंथांत मुळींच नाहींत. असें जर आहे तर त्यानें विश्वास कसा ठेवावा ?" सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणाले "याविषयीं एक मजेदार गोष्ट सांगतों. 'एका मित्रानें एका मनुष्याला भेटून असें सांगितलें, कीं, आपण ताजी बातमी ऐकिली नाहीं काय ? काल मी रस्त्यानें जात असतां एकाएकीं मुकरजीचें घर धडाडा कोसळलें. त्या मनुष्यानें मोठ्यानें विचारलें 'खरेंच काय ? पण वर्तमानपत्र पाहून हें खरें आहे किंवा कसें तें मला पाहूं दे.' त्यानें वर्तमानपत्र वाचलें पण घर कोसळल्याचें त्यांत कोठें आढळलें नाहीं. यावर तो आपल्या मित्रास शांतपणें ह्मणाला, कीं, 'तुझ्या ह्मणण्यावर माझी श्रद्धा नाहीं. या पत्रांत तसें कांहीं नाहीं. उगीच कांहींतरी तूं सांगतोस.' त्याच्या मित्रानें उत्तर दिलें 'पण मीं माझ्या डोळ्यांनीं पाहिलें आहे.' तरीपण त्या मनुष्याला तें पटेना आणि तो शेवटीं ह्मणाला 'बरें, वर्तमानपत्रांत त्याविषयीं कांहींच लिहिलें नाहीं, तेव्हां मीं त्यावर कसा विश्वास ठेवावा ?' " सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणाले "आधुनिक शास्त्रांत मर्यादित, उपाधियुक्त ज्ञानाविषयींच माहिती दिलेली असते हें लोकांनां कळत नाहीं. उपाधिरहित आणि अमर्यादित अशा प्रदेशाची माहिती शास्त्राला नाहीं. पूर्वकालीन ऋषींप्रमाणें ज्यांनीं ईश्वराला पाहिलें आहे आणि साक्षात्कार घेतलेला आहे, अशा पवित्र संतांनांच ती माहिती आहे. ईश्वर असा आहे, तसा आहे, असें ह्मणण्यास तेच समर्थ आहेत."

डॉक्टर कांहीं न बोलतां स्तब्ध राहिले.

गिरीश डॉक्टरांस ह्मणाला "श्रीकृष्ण हा ईश्वरी अवतार होता हें तूं कबूल केलें पाहिजेस. तो मनुष्य होता असें मी तुला ह्मणूं देणार नाहीं. तो देव तरी होता नाहीं तर राक्षस होता, असें तूं ह्मटलें पाहिजेस."

## द्वादश परिच्छेद—अध्याय तिसरा.

**मुलासारखा सरलपणा, आणि देवावर श्रद्धा.**

श्रीरामकृष्ण ह्मणाले "ईश्वरावर तशी श्रद्धा पाहिजे तर मुलाप्रमाणें निष्कपटी झालें पाहिजे. जगाच्या कपटापासून—दुटप्पीपणापासून ईश्वर फार दूर असतो. ऐहिक सुखेच्छा ( संपत्ति, मान, विषयसुख, यांची आवड ) संशय, शंका, विद्येचा अभिमान, संपत्तीचा गर्व इत्यादिकांनां वाढविते." * (शिष्यांनां उद्देशून) "तथापि डॉक्टर अगदीं निष्कपटी आहे."

गिरीश डॉक्टरांस ह्मणाला "दुटप्पी वर्तनाच्या मनुष्यास ज्ञान प्राप्त होत नाहीं असें आपणास वाटत नाहीं काय ?"

डॉक्टर ह्मणाले "खरोखर, तें अशक्य आहे."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "केशव चंद्र सेन मुलाप्रमाणें कसा साधा सरळ होता. एकदां तो देवालयांत आला होता. दुपारीं ४ वाजतां देवालयांतील अतिथिगृह पहावयास जात असतां 'साधुसंत आणि गरीब लोक इत्यादि पाहुण्यांनां आतां जेवण मिळणार आहे काय ?' असें त्यानें विचारिलें. दुपार होऊन बराच उशीर झाला, दोनप्रहरींच सर्व पाहुणे मंडळीचें जेवण झालेलें आहे, ही साधी गोष्ट लहान मुलाप्रमाणें त्याच्या ध्यानांत आली नाहीं. देवाविषयीं ज्ञान आणि श्रद्धा हीं जोडीनें असतात. श्रद्धा कमी असली ह्मणजे ज्ञान अधिक मिळणें मुष्किल. जी गाय खाण्याच्या बाबतींत अतिशय काळजी घेते तिला दूध चांगलें नसतें; पण जिला सर्व प्रकारचें अन्न–वनस्पति, पानें गवत, कोंडा, भुसा इत्यादि चालतें आणि जी तें क्षुधेनें खाते त्या गाईला दूध फार असतें, आणि तिच्या ओटींतून दुधाच्या धारा भराभर भांड्यांत पडत असतात." सर्व हंसतात.

सद्गुरु पुढें ह्मणाले "मुलासारखी श्रद्धा हीच काय ती एक मुख्य आवश्यक गोष्ट आहे. ही श्रद्धा देवाप्रत नेते. एका परकी मुलाकडे बोट दाखवून आई ह्मणते 'हा पहा तुझा दादा.' एकदम त्या मुलाचा विश्वास बसतो, आणि तो परकी मुलगा त्या मुलाचा सोळा आणे ( खास ) दादा होतो ! पुन्हां आई सांगते, कीं, 'त्या खोलींत बागुलबोवा आहे.' त्या खोलींत तसाच कोणीतरी भयंकर प्राणी आहे असें त्या मुलाला पक्कें वाटतें. मुलाप्रमाणें ज्याची श्रद्धा

---

* ह्मणोनि थोरपण पऱ्हां सांडिजे । येथ व्युत्पत्ती अवघी विसरिजे ॥ जैं जगा धाकुटे होईजे । तैं जवळीक माझी ॥

ज्ञानेश्वरी.

आहे त्या मनुष्यावर ईश्वराची कृपा होते. जगांतील चौकस बुद्धि, नफ्यातोट्याच्या दृष्टीनें सर्व वस्तूंचा विचार करते. मनुष्याची मर्यादित बुद्धि फार दूरवर पाहूं शकत नाहीं. श्रद्धा—लहान मुलाची श्रद्धा–हीच तुह्मांला तेथें नेते."

डॉक्टर शिष्यांनां ह्मणाले "गाईनें सर्व काहीं खावें हें कांहीं योग्य नव्हे. माझी एक गाय होती ती पाहिजे तें खात असे. मी एकदां फार अजारी पडलों याचें कारण कांहीं समजेना. सरतेशेवटीं मला असें समजून आलें, कीं, माझी गाय कांहीं दिवस धान्याचा कोंडा ( भूस ) आणि तसलेच कांहीं पदार्थ खात होती, आणि तीच माझ्या आजाराचें कारण झाली. ( हंशा ) त्याचा परिणाम असा झाला, कीं, मला हवापालट करण्याकरितां लखनौस जावें लागलें. मी बरा झालों पण त्याला बारा हजार रुपये खर्च आला !" ( एकच हंशा पिकतो. ) "बरें. कार्य आणि कारण यांमधील संबंध समजणें हें सोपें नाहीं. पाकपारा एथील एका बाबूच्या घरीं एका सात महिन्यांच्या मुलाला डांग्या खोकला झाला. औषध देण्यास मला बोलावलें. मीं त्या रोगाचें कारण शोधण्यास शक्य ती मेहनत केली, पण व्यर्थ. शेवटीं मला समजलें, कीं, ज्या गाढवीचें दूध त्या मुलाला पाजवीत असत ती पावसांत भिजली होती !"

श्रीरामकृष्ण हंसत हंसत शिष्यांनां ह्मणाले "काय व्यक्ति आहे पहा ! हा प्रकार ह्मणजे माझी गाडी चिंचेच्या झाडाखालीं होती ह्मणून मला आम्लपित्ताचा विकार झाला असें ह्मणण्यासारखाच नाहीं काय ?" डॉक्टर व इतर हंसतात.

डॉक्टर हंसत हंसत ह्मणाले "एकदां एका जहाजाच्या कप्तानाचें डोकें दुखूं लागलें. जहाजावरील सर्व डाक्टरांनीं मिळून त्याला तपासिलें आणि जहाजाच्या एका बाजूस पलिस्तर मारिलें." सर्व हंसतात.

श्रीरामकृष्ण डॉक्टरास ह्मणाले "देवाचा शोध करणाराला नेहमीं साधूची संगत पाहिजे. संसारी मनुष्याला जुनाट बळावत जाणारा रोग असतो. उपायाकरतां संतांचा सल्ला घेतला पाहिजे. त्यांचा उपदेश चालला असतां नुसतें श्रवण करणें यानें काम भागत नाहीं. शरीरांत औषध घेतलें पाहिजे आणि पथ्य चांगलें पाळलें पाहिजे."

**देवासाठीं ( १ ) सत्संगति आणि ( २ ) जगांतील सुखांचा त्याग.**

डॉक्टर ह्मणाले "होय. दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीपेक्षां पथ्यानेंच रोगी बरा होतो."

# द्वादश परिच्छेद—अध्याय तिसरा

श्रीरामकृष्ण ह्मणाले "डॉक्टर पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या वर्गाचे असतात. डॉक्टरांप्रमाणें सद्गुरूंचे (उपदेशकांचे) हि तीन वर्ग आहेत. तिसऱ्या वर्गाचा डाक्टर नाडी तपासतो व ह्मणतो 'तूं हें औषध घेतलें पाहिजेस.' नंतर आपल्या सल्ल्याप्रमाणें रोगी वागतो कीं नाहीं, याचा कांहीं विचार न करितां तो निघून जातो. दुसऱ्या वर्गाचा डॉक्टर रोग्याची समजूत घालतो, आणि त्यानें औषध घ्यावें ह्मणून गोड व मधुर शब्दांनीं त्याचें मन वळवितो. पहिल्या वर्गाचा डॉक्टर रोगी ऐकत नसेल तर त्याच्या छातीवर गुडघा देऊन घशाखालीं औषध कोंबण्यास तयार असतो." सर्व हंसतात.

डॉक्टर हंसत ह्मणाले "एका पद्धतींत, डॉक्टरला रोग्याच्या छातीवर बसून जोरानें औषध देण्याची आवश्यकता नसते. उदाहरणार्थ होमिओपाथी."

श्रीरामकृष्ण हंसत ह्मणाले "हें खरें, पण होमिओपाथिक डाक्टरानें छातीवर जोरानें गुडघा दिला ह्मणून रोग्याला घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं. चतुर्थाश्रमी लोकांनां—संन्याशांनां कनक आणि कांता यांचा त्याग सांगितला आहे. संन्याशांनीं बायकांचीं चित्रेंसुद्धां पाहूं नयेत. लोणचें, पक्कान्नें यांचा विचार मनांत येतांच तोंडाला पाणी सुटतें; मग या जिनसांचें प्रत्यक्ष दर्शन किंवा स्पर्श यांविषयीं बोलावयासच नको. पण तुझ्यासारख्या संसारी लोकांनां ह्या सक्तीचा नियम लागू नाहीं. तो फक्त संन्याशांकरितांच आहे. तुझ्याविषयीं म्हणशील, तर मन अनासक्त ठेवून आणि तें ईश्वराच्या ठिकाणीं लावून तुला बायकांत जातां येईल. तुझें मन अनासक्त रहावें आणि तें ईशचरणीं लागावें ह्मणून तूं वारंवार एकांतवासांत जावेंस. अशा ठिकाणीं दुसऱ्या स्त्रीचा अगर पुरुषाचा संपर्क असूं नये. तूं अगदीं एकटेंच तेथें असून मोठ्या उत्सुकतेनें खऱ्या ज्ञानासाठीं परमेश्वराची करुणा भाकावीस; आणि अशा ठिकाणीं अधिक नाहीं तर निदान तीन दिवस, तीन नाहीं तर निदान एक दिवस तरी अवश्य रहावेंस. गृहस्थाश्रमी या नात्यानें तुझें वर्तन असें असावें, कीं, एकदोन मुलें झाल्यावर तुह्मी नवराबायकोंनीं बंधुभगिनीच्या नात्यानें वागावें. आणि 'परमार्थांतच आयुष्य घालविण्याचें सामर्थ्य द्यावें" अशी उभयतांनीं परमेश्वराची निरंतर प्रार्थना करावी."

**चतुर्थाश्रमाचें सक्तीचें शिक्षण.**

गिरीश हंसत डॉक्टरांस ह्मणाला "महाराज, तीनचार दिवस झाले आपण येथेंच आहांत, तुह्मी आपले रोगी पाहण्यास केव्हां जाणार कोण जाणे! (हंशा.) या रीतीनें आपण वागूं लागलां तर आपल्या धंद्याला खोट येईल—चट्टा बसेल."

डॉक्टर ह्मणाले "धदा अथवा रोगी यांविषयीं एक चकार शब्द काढूं नको. तुमचा परमहंस या सर्वांवर मला पाणी सोडावयास लावील." सर्व हंसतात.

श्रीरामकृष्ण हंसत डॉक्टरांस ह्मणाले "हें पहा, कर्मनाशिनी (कर्मांचा नाश करणारी) नांवाची एक नदी आहे. त्या नदींत तूं बुडी मारशील तर त्यापासून अनर्थ होईल. स्नानानंतर तुला कोणतेंच काम करतां येणार नाहीं." डॉक्टर व इतर हंसतात.

डॉक्टर, मला व गिरीश आणि दुसरे शिष्य यांनां उद्देशून ह्मणाले "मित्रांनों, मी एक तुमच्यांपैकीं आहें, असें समजा. ज्याच्या सहाय्याची तुह्मांला जरुरी आहे असा मी धंदेवाला आहें असें मानूं नका; तर तुमचा एक जवळचा नातलग आहें असें समजा."

**ईश्वराची अहेतुक व निष्कामभक्ति.**

श्रीरामकृष्ण ह्मणाले "मी तुला आणखी एक गोष्ट सांगतों. ईश्वराची अहेतुक आणि निष्कामभक्ति असणें शक्य आहे. ईश्वरावर अशी ज्याची भक्ति आहे तो धन्य होय! प्रल्हादाची भक्ति अशा तऱ्हेची होती. या कोटीचा भक्त ह्मणतो 'परमेश्वरा! संपत्ति, कीर्ति, सुखोपभोग किंवा या जगांतील दुसरे कोणतेहि भोग इत्यादि कांहीं मी मागत नाहीं. तुह्मी अनन्य आणि अहेतुक भक्ति मला असावी एवढी माझ्यावर कृपा कर."

डॉक्टर ह्मणाले "महाराज, कालीपुढें नमस्कार करतांना मीं लोकांनां पाहिलें आहे. या लोकांनां कांहींतरी ऐहिक वस्तु पाहिजे असते. कित्येक उपजीविकेचें साधन मिळावें, कित्येक रोग बरे व्हावे, असें मागतात."

डॉक्टर श्रीरामकृष्णांनां उद्देशून ह्मणाले "आपली प्रकृति चांगली नाहीं, तेव्हां आपण प्रत्येकाशीं बोलतां हें योग्य नाहीं. या नियमास मीच एक अपवाद आहें (माझ्याशीं आपण बोलावें) असें आपण मानलें पाहिजे."

श्रीरामकृष्ण हंसत ह्मणाले "मी बरा होईन असें तूं कृपा करून करशील काय? ईश्वराचें नामसंकीर्तन मला नीट करतां येत नाहीं हें तूं पहातोसच."

# द्वादश परिच्छेद—अध्याय तिसरा.

डॉक्टर हंसत ह्मणाले "त्याचें नांव वारंवार घेण्यांत काय फायदा आहे ? ध्यानानें आमचें सर्व काम भागतें."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "तूं काय ह्मणतोस ?—मीं एकदेशी व्हावें व एकतर्फी बनावें असें तुला वाटतें काय ? मी शक्य तितक्या मार्गांनीं ईश्वराची सेवा करूं पाहतों, तरी माझ्या मनाची तृप्ति होत नाहीं. फळें, फुलें आणि इतर नैवेद्य वगैरे यांनीं पूजा करावी, एकांतीं त्याचें पवित्र नाम गावें, त्याचें ध्यान करावें, त्याचीं स्तोत्रें ह्मणावीं आणि त्याच्या आनंदांत नाचावें असें मला वाटतें."

डॉक्टर ह्मणाले "महाराज, एकदेशी व आकुंचित असणें हें मलाहि आवडत नाहीं."

**अवतारावर विश्वास असलाच [illegible]जे काय**

सद्गुरु ह्मणाले "तुझा मुलगा अमृत याचा अवतारावर विश्वास नाहीं. बरें त्याची कांहीं विशेष पर्वा नाहीं. ईश्वर निराकार आहे असें जे समजतात, त्यांनां त्याचें दर्शन घडेल. तसेंच तो साकार आहे असें समजणारांनांहि तें घडेल. श्रद्धा आणि शरण जाणें या दोन आवश्यक गोष्टी आहेत. प्रत्येक पावलाला मनुष्य चुकण्याचा संभव असतो. आप[illegible] चूक कधीं होणार नाहीं अशी त्याला अपेक्षा करतां येणार नाहीं. एक शेराच्या दुधाच्या भांड्यांत तूं चार शेर दूध ओतूं शकशील काय ? खऱ्या कळकळीनें आणि उत्कंठेनें परमेश्वराची प्रार्थना केली पाहिजे; मग तो तुला साकार आहे असा वाटो किंवा निराकार वाटो. ईश्वर सर्वांच्या अंतर्यामीं आहे, आणि जर तुझ्या हृदयाच्या अत्यंत खोल भागांतून तुझी प्रार्थना आली तर तो ती सफल करील. होय, तूं ईश्वर साकार मान किंवा निराकार मान. साखरपोळी सरळ केलेली असो किंवा तिरकस असो, ती तोंडांत घातली ह्मणजे सारखीच मधुर लागणार. तुझा मुलगा अमृत फार चांगला मुलगा आहे."

डॉक्टर ह्मणाले "हं, तो आपला शिष्य आहे."

सद्गुरु हंसत ह्मणाले "या जगांत माझा कोणीहि शिष्य नाहीं. उलट मीच प्रत्येकाचा शिष्य आहें. सर्व मनुष्यें देवाचीं मुलें आहेत—ईश्वराचे नोकर आहेत. मीहि देवाचा पुत्र व नोकर आहें. चांदुमामा ( चंद्र ) हा प्रत्येकाचा मामाच आहे." सर्व हंसतात.

# त्रयोदशपरिच्छेद

## श्यामपुकुर ( कलकत्ता ) येथें.

### १८८५.

### अध्याय पहिला.

### नरेंद्र (विवेकानंद), शरत् (शारदानंद), काली (अभेदानंद), राखाल ( ब्रह्मानंद ), मी आणि दुसरे शिष्य यांसह.

ता. २७ आक्टोबर १८८५ इसवी मंगळवारीं संध्याकाळीं सुमारें ५॥ वाजण्याची वेळ. थोड्या दिवसांपूर्वीं दुर्गापूजेचा ( नवरात्रीचा ) राष्ट्रीय उत्सव समाप्त झाला होता. शिष्यांनां मोकळ्या मनानें या उत्सवांत सामील होतां येईना. सद्गुरूंनां भारी मोठा रोग झाला असतां त्यांनां आनंद[illegible] [illegible]ोईल ? श्रीरामकृष्ण हे दक्षिणेश्वरांतील कालीच्या देवालयांत नेहमीं रा[illegible] पण हें ठिकाण कलकत्त्यांतील वैद्यांनां बरेंच लांब होत असल्यामुळें सद्गु[illegible] [illegible]कडे दोन तीन महिने श्यामपुकुर येथें ठेवून घेतलें होतें, आणि डॉक्टर सर[illegible] [illegible]पध चालू केलें होतें. या रोगापुढें मानवी उपाय बहुतेक थकले, अशा आशयाच्या डॉक्टराच्या इशाऱ्यानें बिचाऱ्या शिष्यांनां मोठा धक्का बसला. सद्गुरु महाराज सर्व शिष्यांनां अनाथ मुलांप्रमाणें, मेंढपाळावांचून मेंढरांप्रमाणें या जगावर लवकर सोडून जातील, हें त्यांनां खरें वाटेना ! त्यांच्या सत्समागमांत एकामागून एक असे घालविलेले दिवस आतां संपणार, या विचारानें त्यांनां कितीतरी दुःख झालें. ते एकांतांत रडले. इतक्यानेंहि नि[illegible]श न होतां सद्गुरु बरे व्हावे म्हणून त्यांनीं प्रार्थना केली. मनापासून—अंतःकरणापासून त्यांनीं त्यांची सेवा आणि शुश्रूषा केली, आणि अहोरात्र यत्किंचित्‌हि कमी पडूं दिलें नाहीं. नरेंद्र ( विवेकानंद ) प्रभृति सर्व तरुण शिष्यांनां त्यांनीं केलेल्या सद्गुरूंच्या विलक्षण आणि अद्वितीय सेवेपासून, संन्यासाचा—त्यागाचा उत्तम धडा मिळाला. आजकाल हेच लोक त्यागाचीं उत्तम उदाहरणें होत. कारण, जग आणि जगाचीं काल्पनिक सुखें यांचा त्याग केलेले श्रीरामकृष्ण त्यांच्या डोळ्यांसमोर उत्कृष्ट उदाहरण–जिवंत ध्येय नव्हतें काय ?

# त्रयोदश परिच्छेद—अध्याय पहिला.

चमत्कार हा, कीं, इतका मोठा रोग झाला असूनहि लोकांच्या झुंडींच्या झुंडी त्यांनां भेटावें, निदान त्यांचें दर्शन घ्यावें ह्मणून येत असत. सद्गुरूं-विषयीं बऱ्याच गोष्टी लोकांनीं ऐकिलेल्या होत्या. श्रीरामकृष्णांच्या सहवासांत येणें ह्मणजे आनंद आणि शांति मिळणें होय, असा त्यांनां अनुभव येई. ' किती दयाळु, किती प्रेमळ' असें सर्वजण ह्मणत असत. लोकांमधील सर्वांत नीच असे जे कोणी असतील त्यांचेंहि कल्याण व्हावें ह्मणून देवाविषयीं, जगन्मा-तेविषयीं, अत्यंत शारीरिक वेदना होत असतांहि ते त्यांच्यापाशीं बोलत. सरते-शेवटीं लोकांस त्यांनां भेटूं देऊं नये आणि त्यांनां बोलविण्यास लावूं देऊं नये, अशी सक्त ताकीद वैद्यांनीं शिष्यांनां दिली. डॉक्टर सरकार तासाचेतास, कधीं सहा कधीं सात ताससुद्धां सद्गुरूंपाशीं रहात असत. आणि त्यांनां ह्मणत, कीं, 'तुह्मी पाहिजे त्या गृहस्थाशीं बोलतां याविषयीं नीट विचार करा. तुह्मीं ज्याच्याशीं बराच वेळ बोलावें असा मीच काय तो एक अपवादात्मक आहें.' याचें खरें कारण असें होतें, कीं, डॉक्टरांला त्यांचा समागम फारच आवडला ( चित्ताक-र्षक वाटला ), तसेंच त्यांच्या तोंडातून येणारे ' मधाप्रमाणें मधुरशब्द ' हेहि त्यांला पसंत पडले.

या प्रसंगीं नरेंद्र आणि डॉक्टर यांशिवाय बंगाली प्रसिद्ध नाट्यकर्ता आणि कवि गिरीश घोष, डाक्टर दोकडी, लहान नरेन्द्र, राखाल, मी आणि इतर हजर होतों. डाक्टरांनीं नाडी तपासून औषध दिलें. नंतर कांहीं वेळ रोगाच्या क्रमाविषयीं भाषण झालें. मग सांगितल्याप्रमाणें सद्गुरूंनीं औषधाचा पहिला डोस घेतला.

डॉक्टर सरकार परत जाण्याकरितां उठतांच श्याम बसूबरोबर बोलत बस-लेल्या श्रीरामकृष्णांनां ह्मणाले, कीं, "आतां आपल्याशीं बोलायाला श्याम बसू आहेत. मला आतां आपली रजा घेऊंद्या."

श्रीरामकृष्ण ह्मणाले " आपणास कांहीं पदें ऐकणें आवडेल काय ? "

डॉक्टर ह्मणाले " होय, मला अत्यंत आवडेल. पण आपल्या मनोवृत्ति फारच उचंबळून जातील आणि आपले चाळे सुरू होतील. मनोवृत्ति आपल्या ताब्यांत ठेवल्या पाहिजेत. "

डॉक्टर पुन्हां बसले. तंबोरा व मृदंग यांच्या तालावर नरेंद्रानें ( विवेका-नंदानें ) श्रवणमधुर गीतें सुरू केलीं.

चमत्कार अपार जगत् रचना तोमार
शोभार आगार विश्व-संसार ।
अयुत तारका चमके रतन-कांचन-हार
कत चंद्र कत सूर्य नाहि अंत तार ।
शोभे वसुंधरा धनधान्यमय, हाय, पूर्ण तोमार भांडार
हे महेश, अगणनलोके गाय धन्य धन्य एइ गीति अनिवार ।

[ २ ]

निबिड आँधारे मा तोर चमके ओरूपराशि ।
ताइ योगी ध्यान धरे हये गिरिगुहावासी ।
अनन्त आँधारकोले, महा निर्वाणहिल्लोले,
चिरशान्तिपरिमल, अविरत जाय भासि ।
महा काल रूप धरि, आँधार वसन परि,
समाधिमन्दिरे (ओमा) के तुमि गो एका बसि;
अभय पदकमले, प्रेमेर बिजली ज्वले
चिन्मय मुखमण्डले शोभे अट्ट अट्ट हासि ।

डॉक्टर मला ह्मणाले " असलें गाणें सद्गुरूंच्या प्रकृतीस भयंकर आहे. यानें यांच्या मनोवृत्ति उचंबळून जातील आणि त्याचा परिणाम घातुक होईल. "

सद्गुरु मला ह्मणाले "डॉक्टर काय ह्मणतात ?"

मीं ह्मटलें " महाराज, या गाण्यानें आपल्या मनोवृत्तांवर परिणाम होऊन आपली समाधि लागेल, अशी डॉक्टरांनां भीति वाटत आहे. "

सद्गुरु हात जोडून डॉक्टरास ह्मणाले " छे, माझ्या मनोवृत्ती अशा अनावर कां होतील ? आतां मला बरें वाटत आहे. "

हे शब्द ह्मणून होतात तोंच सद्गुरूंचें देहभान जाऊं लागलें, आणि लगेच त्यांची समाधि लागली. त्यांचा देह स्तब्ध झाला, डोळे स्थिर झाले. दगडाच्या किंवा लांकडाच्या पुतळ्याप्रमाणें ते अगदीं स्तब्ध बसले. सर्व इंद्रियज्ञान हरपलें. मन, अहंकार, अंतःकरण इत्यादि सर्व कांहीं एकाच वस्तूकडे—जगन्मातेकडे आपला नेहमींचा रस्ता सोडून पूर्णपणें लागले.

सुस्वर कंठानें गाणीं ह्मणण्यास नरेंद्रानें पुन्हां सुरुवात केली.

ए कि ए सुंदर शोभा कि मुख हेरि ए !
आजि मोर घरे आइल हृदयनाथ
प्रेम उत्स उथलिल आजि
बल हे प्रेममय हृदयेर स्वामी
कि धन तोमारे दिब उपहार ?
हृदय प्राण लह लह तुमि, कि बलिब;
जाहा किछु आछे मम, सकलि लओ हे नाथ !

[ २ ]

कि सुख जीवने मम ओहे नाथ दयामय हे,
जदि चरणसरोजे, पराण–मधूप चिरमगन ना रय हे ।
अगणन धनराशि ताय किवा फलोदय हे,
जदि लभिये से धने, परम रतने यतन ना करय हे ।
सुकुमार कुमारमुख देखिते ना चाइ हे,
जदि से चाँदबयाने तव प्रेममुख देखिते ना पाइ हे ।
कि छार शशांकज्योति, देखि आँधारमय हे
जदि से चाँदप्रकाशे तव प्रेमचाँद नाहि हय उदय हे
सनीर पवित्र प्रेम ताओ मलिनतामय हे,
जदि से प्रेमकनके, तव प्रेममणि नाहि जडित रय हे ।
तीक्ष्णविषा व्याली सम सतत दंशय हे,
जदि मोहपरमादे, नाथ तोमाते घटाय संशय हे ।
कि आर बलिब नाथ, बलिब तोमाय हे,
तुमि आमार हृदयरत्न मणि आनंदनिलय हे ।

हें गाणें ऐकत असतां, विशेषतः त्यांतील मुलाचा आणि पतिव्रतेचा भाग ऐकत असतां डाक्टर ओरडले "अहा ! काय मजा आहे, काय मजा—!"

नरेंद्रानें पुन्हां गाणें ह्मटलें.

[ ३ ]

कत दिने हबे से प्रेमसंचार ।
हये पूर्ण काम बोलबो हरिनाम, नयने वहिबे प्रेम–अश्रुधार !
कबे हबे आमार शुद्ध प्राणमन

श्रीरामकृष्ण.

कबे जाब आमि प्रेमेर वृंदावन
संसारबंधन हयिबे मोचन
ज्ञानांजने जाबे लोचन आँधार ।
कबे परशमणि करि परशन
लोहमय देह हयिबे कांचन
हरिमय विश्व करिब दर्शन
लुटाइब भक्तिपथे अनिवार ।
हाय ! कबे जाबे आमार धरम करम
कबे कबे जाबे जातिकुलेर भरम
कबे जाबे भय भावना सरम
परिहरि अभिमान लोकाचार ।
माखि सर्व अंगे भक्तपदधूलि
काँधे लये चिर वैराग्येर झुलि
पिब प्रेमवारि दुइ हाते तुलि
अंजलि अंजलि प्रेमयमुनार ।
प्रेमे पागल हये हासिब कांदिब
सच्चिदानंदसागरे भासिब
आपनि मातिये सफले मातात्र
हरिपदे नित्य करिब विहार ।

---

## अध्याय दुसरा

## परमात्मा ( ब्रह्म ).

हीं गाणीं चालली असतां मध्येंच श्रीरामकृष्ण शुद्धीवर आले. गाणें आटोपलें. नंतर पंडित आणि अक्षरशत्रु, वृद्ध आणि तरुण, बायका आणि पुरुष, मोठे लोक आणि गरीब, या सर्वांना मोहून टाकणारें असें संभाषण झालें. सर्व मंडळी स्तब्ध बसली आणि शांतपणें त्यांच्या दिव्य मुखाकडे पाहूं लागली.

त्यांना झालेल्या भयंकर रोगाचा आतां कांहीं मागमूस तरी आहे काय ? त्यांच्या मुखावर दैवी तेज आणि आनंद यांचीच छटा दिसत आहे.

# त्रयोदश परिच्छेद—अध्याय दुसरा.

डॉक्टरकडे वळून श्रीरामकृष्णांनीं भाषण सुरू केलें. सद्गुरु ह्मणाले "डॉक्टर, आपली भीड आतां सोडून द्या. दुसऱ्यांसमक्ष ईश्वराचें नाम घेण्यांत किंवा नाम गाऊन दाखविण्यांत कोणींहि भीड धरूं नये. लोक काय ह्मणतील याची पर्वा करूं नको. 'भीड, भीति व तिटकारा (तिरस्कार) हीं तीन पदरीं असलीं ह्मणजे मनुष्य पूर्ण होत नाहीं,' ही ह्मण किती चांगली आहे. भिडस्त मनुष्य ह्मणतो—मी किती मोठा मनुष्य आहें. हें जर मोठ्या लोकांच्या कानावर गेलें तर ते काय ह्मणतील ? हें पहा, काय सांगावें, तो डॉक्टर नाचत होता! किती निर्लज्जपणा हा ! त्याचें डोकें ठिकाणावर नसावें, तें बिघडलेलें असावें."

डॉक्टर ह्मणाले "माझी विचारसरणी तशी नाहीं. लोक काय ह्मणतात याची मी बिलकुल पर्वा करीत नाहीं !"

श्रीरामकृष्ण हंसत ह्मणाले "उलट तूं त्याची अधिक काळजी घेतोस ! (हंशा.) ज्ञान आणि अज्ञान दोहोंच्या पलीकडे तूं जा. अज्ञान ह्मणजे अनेक वस्तूंचें ज्ञान–ऐक्याच्या ज्ञानाशिवाय असलेलें भेदभावाचें ज्ञान. विद्येचा अहंकार अज्ञानापासून होतो. ईश्वर सर्व वस्तूंमध्यें आहे, भिन्नत्वांत ऐक्य आहे अशी खात्री होणें याला ज्ञान—सद्वस्तूचें ज्ञान असें ह्मणतात. ईश्वराला पूर्णपणें जाणणें हेंच विज्ञान (साक्षात्कार)."

सद्गुरु पुढें ह्मणाले "समजा, कीं तुमच्या पायांत एक कांटा गेला आहे, तो काढण्याकरितां दुसरा एक कांटा पाहिजे; या दुसऱ्या कांट्यानें पहिला कांटा काढला ह्मणजे ते दोन्ही फेंकून देतात. तसें अज्ञानरूपी कांटा नाहींसा करण्यास तुह्मी ज्ञानरूपी कांटा घेतां. नंतर परमात्म्याचा पूर्ण साक्षात्कार (विज्ञान) मिळविण्याकरितां ज्ञान आणि अज्ञान दोन्हीहि तुह्मी टाकून देतां. कारण ब्रह्म—परमात्मा ज्ञानाच्या तसेंच अज्ञानाच्याहि पलीकडे आहे."

सद्गुरु पुढें बोलूं लागले "लक्ष्मण एकदां आपल्या दैवी बंधूला ह्मणाला 'हे रामा, वसिष्ठदेवासारख्या ज्ञानी पुरुषानें आपल्या पुत्रांबद्दल शोक करावा आणि त्यांचें सांत्वन होऊं नये हें चमत्कारिक नव्हे काय ?' यावर श्रीरामानें उत्तर दिलें 'बाबा लक्ष्मणा, ज्याला ईश्वराचें सापेक्ष ज्ञान झालेलें आहे, त्याला त्याचें अज्ञानहि असलें पाहिजे; कारण ज्ञान आणि अज्ञान हीं अन्योन्याश्रित आहेत. विश्वांतील (भिन्नत्वांतील) ऐक्याचें ज्ञान झटलें, कीं, अनुषंगानें भिन्नत्वाचें ज्ञान आलेंच पाहिजे. ज्याला प्रकाशाचें अस्तित्व भासतें त्याला

अंधकाराचेंहि अस्तित्व भासलें पाहिजे. मनुष्याच्या मर्यादित बुद्धीनें आकलन होणाऱ्या (समजणाऱ्या) ज्ञान अज्ञान, पुण्य पाप, सत्कर्म दुष्कर्म, धर्माधर्म, स्वच्छपणा मलिनता, इत्यादि सर्व द्वंद्वांहून परमात्मा पलीकडे आहे."

यानंतर श्रीरामकृष्णांनीं रामप्रसादचें खालीं दिलेलें पद ह्मणून दाखविलें.

आय मन बेडाते जाबि ।
कालीकल्पतरुमूले रे चारि फल कुडाये पाबि ॥
प्रवृत्ति निवृत्ति जाया, निवृत्तिरे संगे लबि ।
विवेक नामे तार बेटा, तत्वकथा ताय सुधाबि ॥
प्रथम भार्यार संतानेरे दूर हते बुझाइबि ।
जदि ना माने प्रबोध ज्ञान सिंधुमाझे डुबाइबि ॥
शुचि अशुचिरे लये दिव्य घरे करे शुबि ।
तादेर दुइ सतीने पिरीत हले तबे श्यामा माके पाबि ॥
धर्माधर्म दुटो अजा, तुच्छ खोंटाय बेंधे थुबि ।
तादेर ज्ञानखड्गे बलि दिये उभये कैवल्य दिबि ॥
अहंकार अविद्या तोर पितामाताय ताडिये दिबि ।
जदि मोहगर्ते टेने लय धर्य खोंटा धरे रबि ॥
प्रसाद बले एमन हले कालेर काछे जबाब दिबि ।
तबे बापू, बाछा, बापेर ठाकुर मनेर मत मन हबि ॥

श्याम बसु ह्मणाला " ज्ञान आणि अज्ञान हे दोन्ही कांटे टाकून दिल्यावर शिल्लक काय उरतें ? "

श्रीरामकृष्ण ह्मणाले " होय, जें कांहीं उरतें, तें, तूं ज्याला परमात्मा ह्मणतोस—वेदांत ज्याचें ' नित्य शुद्ध बोधरूप ' असें वर्णन केलें आहे, असें निर्गुण ब्रह्म होय. पण मी हें अधिक स्पष्ट करून कसें सांगूं ? समज. कोणीं एकानें तुपाची रुचि कशी असते असें विचारलें तर त्याला हें स्पष्ट कसें सांगणार ? या प्रश्नाला कोणालाहि 'तुपाची रुचि तुपासारखी ' असेंच उत्तर द्यावें लागेल ! "

**निर्गुण ब्रह्म, मन व वाणि यांच्या पलीकडे आहे. यतोवाचो निवर्तन्ते अप्राप्यमनसासह**

सद्गुरु पुढें ह्मणाले " एक अविवाहित मुलगी आपल्या मैत्रिणीस ह्मणाली 'अग, तुझा नवरा आला आहे. तूं त्याला भेटतेस तेव्हां तुला कोणत्या प्रकारचा

आनंद होतो हें मला सांग पाहूं.' तेव्हां ती विवाहित स्त्री तिला ह्मणाली 'माझे लाडके, तुला तुझा नवरा मिळाला ह्मणजे सर्व समजेल. मी हें स्पष्ट करून कसें सांगूं ?' "

सद्गुरु पुढें ह्मणाले " जगन्मातेनें हिमालयाच्या पोटीं त्याची कन्या होऊन अवतार घेतला, असें पुराणांतरीं सांगितलें आहे. पार्वतीचा जन्म झाल्यावर नगाधिराजाला जगन्मातेच्या कांहीं स्वरूपांचा साक्षात्कार झाला. नंतर तो ह्मणाला 'हे माते, वेदांमध्यें ज्याविषयीं पुष्कळ सांगितलें आहे अशा निर्गुण ब्रह्माचा मला साक्षात्कार व्हावा.' जगन्मातेचा अवतार अशी ती कन्या ह्मणाली 'बाबा, तुह्मांला निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार हवा आहे काय ? तर-मग तुह्मी साधुसंतांच्या—संन्याशांच्या सत्समागमांत राहिलें पाहिजे; तरच तुमची इच्छा मला पुरी करतां येईल. तें ब्रह्म काय आहे.हें मला शब्दांनीं सांगतां येणार नाहीं.' ' एका परब्रह्माखेरीज बाकी सर्व वस्तु उच्छिष्ट आहेत,' असें जें एकानें ह्मटलें आहे, तें किती खरें आहे! याचा अर्थ असा, कीं, जगांतील सर्व धर्मग्रंथ जिभेनें वाचून पाठ ह्मणून उच्छिष्टाप्रमाणें दूषित झालेले आहेत. पण परब्रह्म ह्मणजे काय आहे हें तोंडानें सांगणारा आजपर्यंत या जगावर कोणीच झाला नाहीं. ह्मणून परब्रह्म हें एका अर्थी तोंडानें दूषित झालेलें नाहीं. परमात्म्याच्या सहवासांत अवर्णनीय आनंद आहे. तोंडांतून निघणाऱ्या शब्दानें या आनंदाविषयीं कांहीं सांगतां येत नाहीं. ज्यानें हा अनुभव घेतला आहे तोच हें जाणतो. "

---

## अध्याय तिसरा.

## पांडित्य आणि अहंकार.

डॉक्टरास उद्देशून श्रीसद्गुरु ह्मणाले " अहंकार नाहींसा केल्याखेरीज ज्ञान प्राप्त होत नाहीं. **'मुक्त हबे कबे, आमि जाब जबे'** मीपणा नष्ट झाला कीं मुक्तीला काय वेळ ! 'मी माझें ' हें अज्ञान. 'तूं तुझें' हें ज्ञान. खरा भक्त ह्मणतो ' ईश्वरा, तूंच काय तो एक खरा कर्ता आहेस, मी तुझ्या हातांतील एक नुसतें साधन आहें ! तूं करविशील तसें मी करणार. ही सर्व संपत्ति, घरदार, कुटुंब सर्व कांहीं तुझें आहे. माझें असें कांहीं नाहीं, मी एक आपला तुझा नोकर आहें. तुझ्या आज्ञेप्रमाणें वागणें हेंच माझें कर्तव्यकर्म आहे. ' "

सद्गुरु पुढें ह्मणाले " पुस्तकें बरींच वाचलीं आहेत अशा मनुष्याला गर्वानें पछाडावें. हें चमत्कारिक आहे. देवाविषयीं टागोरचें माझ्याशीं एकदां भाषण झालें. तो मला ह्मणाला 'महाराज आपण काय ह्मणतां तें सर्व मला माहीत आहे. मीं तें सर्व पुस्तकांत वाचलें आहे.' त्यावर मीं त्याला उत्तर दिलें, कीं, 'महाराज, ज्यानें दिल्ली पाहिली आहे तो आपल्या प्रवासाचें खूप वर्णन करून मी दिल्लीला गेलों होतों अशी फुशारकी मारीत नाहीं. बाबू ( सभ्य कुलीन गृहस्थ ) मी बाबू आहें असें स्वतः सांगत नाहीं."

श्याम बसु ह्मणाला "महाराज, टागोर आपल्याला फार मान देतो."

श्रीसद्गुरु ह्मणाले "अहो, दक्षिणेश्वराच्या देवालयांत काम करीत असलेल्या एका भंगिणीचा दिमाख मी काय सांगूं! तिच्या अंगावर एकदोन रत्नें (दागिने) होतीं, त्यामुळें तिच्या अंगांत फार डौल चढला. तेव्हां ती आपल्या समोरून जाणाऱ्या लोकांनां ओरडून ह्मणाली, 'हे लोक हो, मी सांगतें बाजूला सरा!' ( हंशा. ) भंगिणीचा हा दिमाख! तेव्हां दुसऱ्या मोठ्या लोकांचा गर्व आणि अभिमान याविषयीं कांहीं सांगण्याची जरूरी नाहीं."

**पाप व मनुष्याची जबाबदारी.**

श्याम बसु ह्मणाला " महाराज, एकापक्षीं आह्मांला असें सांगतात, कीं, आह्मांला आमच्या पापांबद्दल शासन केलें जातें; आणि दुसऱ्या पक्षीं असेंहि सांगण्यांत येतें, कीं, ईश्वर हा कर्ता करविता आहे, आणि प्राणी त्याच्या हातांतील साधनें आहेत. या दोन्हींचा मेळ कसा घालावा?"

श्रीसद्गुरु ह्मणाले " नाजूक तराजूनें वस्तु तोलणाऱ्या सराफाप्रमाणें हें तुझें बोलणें आहे."

नरेंद्र ह्मणाला "तूं व्यापारी दृष्टीनें बोलत आहेस असा सद्गुरूंचा रोंख आहे."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "पोडो, अरे मी सांगतों, कीं, हे आंबे खा. या बागेंत आंब्याचीं झाडें किती शेंकडों आहेत, त्याला किती हजार फांद्या आहेत, किती लक्ष पानें आहेत, या सर्व गणिताचा काय उपयोग आहे? तूं आंबे खाण्यास येथें आला आहेस, आंबे खा आणि आपल्या मार्गानें चालता हो. (श्याम बसूस ) धार्मिक कृत्यें करून परमेश्वराची प्राप्ति करून घ्यावी ह्मणून तूं मानवी प्राण्याचा जन्म घेऊन या जगांत आलेला आहेस. ईश्वराच्या चरण-कमलावर भक्ति जडण्याविषयीं शक्य ती खटपट करणें हेंच तुझें कर्तव्यकर्म

ाहे. दुसऱ्या शेंकडों गोष्टींविषयीं तूं व्यर्थ त्रास कां करून घेतोस? ादविवाद (वेदान्तचर्चा) केल्यानें तूं अधिक शहाणा (ज्ञानी) ाशील काय? चार औंस दारूनें तुला धुंदी चढते हें तुला माहीत आहेना? ग सॅलूनांत (डब्यांत) दारूचीं किती पिपें आहेत याची चवकशी करून ाहीं उपयोग नाहीं. धुंदी यावी एवढाच तुझा उद्देश आहे."

डॉक्टर ह्मणाले "अगदीं बरोबर. महाराज, आणि त्यांतल्यात्यांत हा विशेष ाहे, कीं, देवाच्या दुकानांतील दारु अगणित आहे. ती केव्हांच संपणार ाहीं."

श्रीरामकृष्ण श्याम बसूस ह्मणाले "आणखी हें पहा, तूं ईश्वराच्या नांवानें वट ुखत्यारपत्र कां करून टाकीत नाहींस? तुझ्या सर्व चिंता आणि जबाबदाऱ्या ांचा भार त्याच्यावर असूंदे. असें समज, कीं, उत्तम शीलाच्या मनुष्यावर ्कांहीं कामें सोपविलींस, तर तो तुझें खात्रीनें कांहीं वाईट करणार नाहीं. ाप्याला येथें किंवा नंतर शासन मिळतें कीं नाहीं हा प्रश्न त्याच्यावर सोंप- ्लेला बरा."

डॉक्टर ह्मणाले "ईश्वर काय करणार आहे हें तोच चांगलें जाणतो. ानवी दृष्टि फार दूरवर जाऊं शकत नाहीं. ईश्वर तर मानवी अंदाजाच्या ालीकडे आहे."

**कीर्ति आणि लोकप्रियता हें आयुष्याचें इतिकर्तव्य आहे काय?**

श्रीरामकृष्ण श्याम बसूला ह्मणाले "तुह्मां कलकत्तेकरांमध्यें अशा तऱ्हेचें भाषण हल्लीं किती प्रचारांत येत आहे! मनुष्यांशीं ईश्वराच्या वर्तनांत समतेच्या तत्वाचा अभाव आहे असें ते बोलतात. ईश्वरानें कांहीं लोकांनां सुखी आणि दुसऱ्यांनां दुःखी कां करावें, अशी त्यांची तक्रार आहे. ईश्वराचा स्वभाव आपल्यासारखाच आहे, असें या मूर्खांनां वाटतें. हेम आपल्या जानबझारच्या बाबु मित्रासमवेत दक्षिणेश्वराच्या देवालयांत येत असे. मला भेटण्याचा प्रसंग जेव्हां जेव्हां येई, तेव्हां तो मला ह्मणे, कीं, बरें भट्टाचार्य, या जगामध्यें एकच वस्तु—कीर्ति इष्ट आहे, नव्हे काय? मानवी आयुष्याचें इतिकर्तव्य ईश्वराला पाहणें हेंच आहे असें फार थोडे लोक जाणतात!"

**सूक्ष्म शरीर.**

श्याम बसू ह्मणाला "महाराज, आमचें सूक्ष्म शरीर स्थूल शरीराहून भिन्न आहे, इत्यादि आह्मी पुष्कळ ऐकितों. माझें सूक्ष्म शरीर स्थूलाला सोडून दुसरीकडे जाण्याकरितां खरोखर बाहेर निघतें, असें कोणी मला दाखवील काय ?"

श्रीरामकृष्ण ह्मणाले " खरा भक्त असलें कांहीं दाखविण्याच्या भानगडींत पडणार नाहीं. कांहींजण आपणाला मान देतील किंवा नाहीं याची तो यत्किंचित् काळजी करीत नाहीं. आपल्या भोंवतीं कांहीं बडे लोक असावे, असें त्याला क्वचित् वाटतें."

श्याम बसू ह्मणाला "स्थूल शरीराहून सूक्ष्म शरीर भिन्न आहे हें आपण कसें जाणतां, हें कृपा करून सांगाल काय ?"

**स्थूल शरीर, सूक्ष्म शरीर, कारण शरीर, आणि महाकारण शरीर.**

श्रीरामकृष्ण ह्मणाले " हें स्थूल शरीर पंचभूतात्मक आहे, सूक्ष्म शरीर हें मन, बुद्धि, अहंकार आणि चित्त यांचें केलेलें आहे. जें अंतःशरीर ईश्वरी आनंदाचा अनुभव घेतें त्याला आनंदकोश किंवा 'कारणशरीर' असें ह्मणतात. तंत्रांमध्यें याला 'भगवती तनु'—जगन्मातेपासून उत्पन्न झालेलें शरीर, असें ह्मणतात. या सर्वांपलीकडे महाकारण शरीर—अव्यक्त आदिकारण—आहे, आणि तें तर शब्दांनीं सांगतां येत नाहीं."

---

## अध्याय चवथा.

## अभ्यासाचें—साधनाचे महत्त्व.

श्रीरामकृष्ण ह्मणाले " नुसतीं व्याख्यानें ऐकून काय उपयोग ? साधन हेंच महत्त्वाचें आहे. सिद्धि सिद्धि (भांगेचीं पानें) हे शब्द वारंवार ह्मणतोस. यानें तुला धुंदी चढेल काय ? भांगेचें चूर्ण करून तूं तें आपल्या अंगास फांसवून घेतलेंस तरी त्यानें धुंदी येईल काय ? छे, तूं थोडीतरी भांग पोटांत घेतली पाहिजेस !"

सद्गुरु पुढें ह्मणाले " नं ४०–४१ इत्यादि पुष्कळ नंबराचे धागे असतात. तूं त्या व्यापारांत असल्याशिवाय निरनिराळ्या नंबराचे धागे तुला ओळखतां येणार नाहींत. एक नंबराचा धागा दुसऱ्याहून भिन्न आहे हें ओळखणें,

त्या धंद्यांतील लोकांनां फारसें जड जात नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें मी असें सांगतों, कीं, थोडासा अभ्यास करीत चला. थोडेंसें साधन केलें ह्मणजें स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण शरीरांविषयीं योग्य कल्पना तुमच्या मनांत सहज येऊं लागतील."

**ईश्वराची भक्ति; प्रार्थना कशी करावी ?**

सद्गुरु पुढें ह्मणाले " जेव्हां तुह्मी प्रार्थना करिता, तेव्हां भक्ति—ईश्वराच्या चरणकमलांची भक्ति–हेंच मागा. अहल्येला तिच्या नवऱ्यानें दिलेल्या शापांतून मुक्त केल्यावर ' तूं एक वर माग ' असें श्रीरामचंद्र तिला ह्मणाले. अहल्या ह्मणाली ' तुह्मी वर देणारच तर एवढी कृपा करा, कीं, माझें मन सदोदित आपल्या सुंदर चरणकमलांवर असावें. मग मला डुकराचा जन्म आला तरी त्याची फिकीर नाहीं !' माझ्या स्वतःविषयीं ह्मणशील, तर मी माझ्या जगन्मातेची भक्तिच मागतों. तिच्या चरण-कमलांवर फुलें ठेवून, हात जोडून मी अशी प्रार्थना केली, कीं, माते, हें अज्ञान आहे, हें ज्ञान आहे; हीं दोन्ही घे, मला तीं नकोत. मला फक्त तुझी निष्कामभक्तिच दे ! ही मनाची आणि देहाची शुद्धता आहे, ही अशुद्धता आहे; हीं दोन्ही घेऊन मी काय करूं ? मला निष्कामभक्तिच मिळूं दे. हें पाप आहे, हें पुण्य आहे; मला हेंहि नको आणि तेंहि नको. मला निष्कामभक्तिच पाहिजे. हें इष्ट आहे, हें अनिष्ट आहे; हीं दोन्ही घे, मला त्यांपैकीं कोणतेंहि नको ! मला निष्कामभक्तिच हवी आहे. हा धर्म आहे, हा अधर्म आहे; मला या दोहोंच्या पलीकडे ठेव. मला त्यांची जरूरी नाहीं. मला निष्काम भक्तिच देण्याची कृपा कर."

सद्गुरु पुढें ह्मणाले "तुला जर सत्कर्मांचें फल पाहिजे तर दुष्कर्मांचें फलहि तुला घेतलें पाहिजे. पुण्याचें फल पाहिजे तर पापाचें फलहि स्वीकारिलें पाहिजे. एकाची ( ज्ञानाची ) कल्पना सुचली, कीं, अनेकाची ( अज्ञानाची ) कल्पना येतेच. शुचि ( स्वच्छता ) ह्मटलें, कीं, तद्विरुद्ध कल्पना अशुचि (घाणेरडेपणा) मनांत आल्याशिवाय राहणार नाहीं. तसेंच प्रकाशाचें ज्ञान झालें, कीं, अंधाराचें ज्ञान आपोआप होतेंच. ऐक्याचें ज्ञान झालें, कीं, भिन्नत्वाचें ज्ञानहि होतेंच. जो मनुष्य ईश्वराची भक्ति करतो तो धन्य होय ! त्यानें डुकराचें मांस खाल्लें

ह्मणून काय झालें? उलटपक्षीं एकादा मनुष्य हविष्यान्नावर राहूंदे, पण तो जगावर आसक्त असून ईश्वराची भक्ति करीत नाहीं तर—"

डॉक्टर मध्येंच ह्मणाले "त्याला धिक्कार असो. त्याचें काय हित होणार! मला येथें कांहीं थोडें सांगितलें पाहिजे. बुद्धानें एकदां डुकराचें मांस खाल्लें. त्याचा परिणाम काय झाला असावा असें तुह्मांला वाटतें? त्याला झाली पोटशूळाची व्यथा. यावर उपाय ह्मणून तो अफू घेऊं लागला. निर्वाण आणि तसलीं सर्व ढोंगें यांचें गुह्य काय आहे हें तुह्मांला माहीत आहे काय? तो बिचारा अफूनें बेशुद्ध होऊन त्याचें देहभान जात होतें. हेंच तुमचें निर्वाण!"

बुद्धाच्या निर्वाणतत्वावरील डॉक्टरचें हें मत ऐकून मंडळीला हंसूं कोसळलें. सर्वांनां हंसतां हंसतां पुरें झालें.

**प्रापंचिक जन व अनासक्त कर्म.**

श्रीरामकृष्ण श्याम बसूला ह्मणाले "गृहस्थाश्रमाप्रमाणें आयुष्य घालविणें हें कांहीं चुकीचें नाहीं. पण आसक्तिशिवाय कर्में करणें आणि ईश्वराच्या चरणावर मन लावणें, यांची तूं काळजी घेतली पाहिजेस. कल्पना कर, कीं, एकाद्याला पाठीवर काळपुळी झाली आहे. हा मनुष्य नेहमींप्रमाणें बोलतो चालतो आणि आपलीं नित्यकर्में हि करितो. पण दुःख त्याला काळपुळीची आठवण नेहमीं देत असतें. त्याप्रमाणें तूं जगांत वावरत असलास तरी तुझें मन नेहमीं ईश्वराकडे लागलेलें असावें. आपल्या प्रियकराबरोबर एकाद्या स्त्रीचें कारस्थान गुप्तपणें चाललेलें असतें. आपलीं अनेक कर्तव्यकर्में करीत, पण ईश्वराकडे आंतून (गुप्तपणें) पूर्णपणें मन लावून या जगांत त्या स्त्रीप्रमाणें वागा. आपलीं गृहकृत्यें करीत असतांना सारा वेळ ती स्त्री आपल्या प्रियकराविषयीं विचार करीत असते. (डॉक्टरास) आपणास हें समजतें ना?"

डॉक्टर ह्मणाले "त्या स्त्रीप्रमाणें माझे विचार नसल्यामुळें मला तें कसें समजावें?"

श्याम बसु ह्मणाला "अहो डॉक्टर साहेब, माफ करा, तुह्माला तें थोडें तरी समजतें, नाहीं काय?" (हंशा.)

श्रीरामकृष्ण ह्मणाले "बरींच वर्षे धंद्यांत असल्यामुळें त्याला हें विशेष समजलें पाहिजे, असेंच नव्हे काय?" (हंशा.)

श्याम बसु ह्मणाला "महाराज, थिआसफीबद्दल आपलें मत काय आहे?"

श्रीरामकृष्ण ह्मणाले " याविषयीं थोडक्यांत सांगावयाचें ह्मटलें, ह्मणजे शिष्य करणारे लोक कमी दर्जाचे असतात. गंगानदींतून पायानें पार चालून जाणें. दुसरा मनुष्य दूरच्या प्रदेशीं काय बोलत आहे हें आतां येथें सांगणें, इत्यादि सिद्धि मिळवूं पाहणारे लोकहि कमी दर्जाचे होत. अशा लोकांनां ईश्वराविषयीं निष्कामभक्ति लाधणें फारसें सोपें नाहीं."

**थिआसफी.**

श्याम बसु ह्मणाला " पण महाराज, थिआसफिस्ट हिंदुधर्म पुन्हां मजबूत पायावर उभारूं पहातात–"

श्रीरामकृष्ण ह्मणाले " असेल. मला त्यांचीं मतें आणि कृत्यें याविषयीं चांगली माहिती नाहीं."

श्याम बसु ह्मणाला " मृत्यूनंतर जीवात्मा कोणत्या प्रदेशांत जातो ? चंद्र-लोकांत किंवा दुसऱ्या नक्षत्रांच्या लोकांत वगैरे, अशा तऱ्हेच्या प्रश्नांचा थिआसफींत विचार करितात."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "असेल. पण माझी विचारसरणी तुला सांगतों. भक्त-श्रेष्ठ हनुमानाला कोणीं पुसलें, कीं, आज शुक्ल पक्षांतील कोणती तिथि ? हनुमा-नानें उत्तर दिलें, कीं, 'माझ्या बाबा, माफ कर. मला आठवड्यांतील दिवस किंवा तिथि अगर सुमुहूर्त, ग्रहांचा शुभ योग यांविषयीं कांहीं ठाऊक नाहीं. हा माझा विषयच नव्हे. मी देवाचेंच ध्यान करितों.' "

श्याम बसु ह्मणाला "महाराज, थिआसफिस्टांचा महात्म्यांवर विश्वास आहे. महात्मे खरेखुरे प्राणी आहेत असें आपणास वाटतें काय ? "

श्रीरामकृष्ण ह्मणाले " माझें ह्मणणें तुला खरें वाटत असेल, तर मी सांगतों, कीं ' हो आहेत. ' पण अशा गोष्टींचा तूं नाद सोडून द्यावास हें फार, चांगलें. माझी प्रकृति बरी झाली, कीं, तूं पुन्हां ये. माझ्या शब्दांवर श्रद्धा ठेव आणि तुला शांति मिळेल अशी मी हमी घेतों. संपत्ति, कपडे अथवा दुसरी कोणतीहि वस्तु मी घेत नाहीं, हें तूं पाहत नाहींस काय ? कांहीं नाटकांच्या खेळामध्यें संभावित प्रेक्षकांनां द्रव्यांच्या देणग्या देऊन पात्रांनां उत्तेजन द्यावें लागतें. येथें कोणाला तशा देणग्या द्याव्या लागत नाहींत. ह्मणून येथें इतक्या लोकांची गर्दी होते." ( हंशा. )

सद्गुरु डॉक्टरास ह्मणाले " मला तुला इतकेंच सांगावयाचें आहे; रागाऊं नको. संपत्ति, कीर्ति, व्याख्यानें इत्यादि जगांतील वस्तु तुला पुरेशा मिळाल्या

आहेत. आतां देवाकडे थोडेंसें मन लाव, आणि येथें वारंवार येत जा. ईश्वराविषयीं भाषणें (शब्द) ऐकणें फार चांगलें. कारण यानें जीवाला (मनुष्याला) प्रकाश (ज्ञान) मिळून तो ईश्वराकडे वळतो."

---

## अध्याय पांचवा.

## ईश्वराचे अवतार.

कांहीं वेळानें डॉक्टर नमस्कार करण्यास उठले. इतक्यांत गिरीश आंत आलेला पाहून त्यांनां इतका आनंद झाला, कीं, ते पुन्हां आपल्या जागीं बसले. गिरीशनें पुढें येऊन सद्गुरूंस प्रणाम केला आणि त्यांच्या चरणरजाचें त्यानें चुंबन घेतलें. डॉक्टरनीं हें सर्व मुकाट्यानें पाहिलें.

डाक्टर ह्मणाले "जोंपर्यंत मी येथें आहे, तोंपर्यंत गिरीश बाबु येथें येण्याची मेहरबानी करणार नाहीं. मी निघणार तेव्हां तो आलाच पाहिजे." (हंशा.)

शास्त्रीय संस्था आणि तेथें होत असलेलीं व्याख्यानें यांविषयीं नंतर भाषण झालें. गिरीशला हीं व्याख्यानें आवडत असत.

श्रीरामकृष्ण डाक्टरांस ह्मणाले "तूं मला एकादा दिवस त्या संस्थेंत नेशील काय?"

डॉक्टर ह्मणाले "महाराज, तुह्माला तेथें एकदां नेलें, कीं, देवाचीं विलक्षण आणि अद्भुत कृत्यें, त्यांतील चातुर्य, इष्टकार्य साधण्यासाठीं साधनांची योजना, इत्यादि पाहून आपलें सर्व देहभान नाहींसें होईल."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "खरेंच काय?"

डॉक्टर गिरीशला ह्मणाले "दुसरें पाहिजे तें कर, पण त्याला (सद्गुरूला) देवासारखें मानूं नको. अशानें तूं अशा पवित्र माणसांचा नाश करीत आहेस."

**सद्गुरूची सेवा.**

गिरीश ह्मणाला "तर महाराज त्याला उपाय नाहीं. ज्यांनीं मला संसारसमुद्र आणि त्याहून भयंकर असा संशयसमुद्र तरून जाण्यास साहाय्य केलें, त्यांची मी अन्य रीतीनें सेवा कशी करूं? त्यांचें सर्व कांहीं मला पूज्य आहे."

डॉक्टर ह्मणाले "सर्व मनुष्यें सारखीं असतात असें माझें मत आहे. एकदां एका वाण्याच्या मुलाला आमच्या येथें औषधाकरितां आणलें होतें. त्या मुलास शौचास झालें. प्रत्येकानें धोतर नाकाशीं लावलें. मीं मात्र लाविलें

नाहीं. मी अर्धा तास त्या मुलापाशीं बसलों. डोक्यावर टोपल्या घेऊन भंगी जवळून जातांना मी हातरुमाल नाकापाशीं नेत नाहीं. तसें करणें हें मला अशक्यच आहे. भंगी ह्मणजे मानवी प्राण्याहून कांहीं कमी नाहीं. माझ्यासारखाच तो मानवी प्राणी आहे. मीं त्याला कमी कां लेखावें? या पवित्र माणसाविषयीं ह्मणशील, तर त्याला प्रणाम करून त्याच्या चरणरजाचें चुंबन मला घेतां येत नाहीं असें तुला वाटतें काय? हें पहा—" (डॉक्टरनें सद्गुरूंनां प्रणाम करून त्यांच्या चरणरजाचें चुंबन घेतलें).

गिरीश ह्मणाला "महाराज, स्वर्गांतील देव ही शुभवेला—सुमुहूर्त आज धन्य धन्य होय, असें ह्मणत आहेत."

डॉक्टर म्हणाले "एकाद्याच्या पायां पडणें ह्मणजे एक मोठा चमत्कार आहे असें तुला वाटतेंसें दिसतें. प्रत्येकाला मी तसाच मान देईन (प्रत्येकाच्या पायां पडेन) हें तुझ्या लक्षांत येत नाहीं. (जवळ बसलेल्या गृहस्थास) महाराज मला आपल्या पायां पडूं देण्याची कृपा करा पाहूं. (दुसऱ्यास) आपण महाराज, (तिसऱ्यास) आतां आपण महाराज–" (डॉक्टर पुष्कळांच्या पायां पडले.)

नरेंद्र ह्मणाला "महाराज, सद्गुरु ह्मणजे देवासारखे माणूस आहेत असें आह्मी समजतों. माझें ह्मणणें अधिक स्पष्ट करून सांगतों. वनस्पतिवर्ग आणि प्राणिवर्ग यांमध्यें कांहीं एक अशी स्थिति आहे, कीं, तेथें अमुक वस्तु वनस्पति आहे किंवा प्राणी आहे हें सांगणें फार कठिण आहे. त्याचप्रमाणें मनुष्यवर्ग आणि देववर्ग यांमध्यें अशी एक स्थिति आहे, कीं, तेथें अमुक एक व्यक्ति मानवी प्राणी आहे किंवा देव आहे, हें खात्रीनें सांगतां येत नाहीं."

डॉक्टर ह्मणाले "देवाविषयीं गोष्टीचें स्पष्टीकरण नुसत्या दृष्टांतानें होत नाहीं."

नरेंद्र ह्मणाला "मी देव असें ह्मणत नाहीं, तर देवासारखा माणूस."

डॉक्टर ह्मणाले "याप्रमाणें तुह्मीं आपला आदरभाव व्यक्त करूं नये. माझ्याविषयीं ह्मणाल तर माझे आंतले विचार काय आहेत हें कोणालाहि समजलें नाहीं. माझे उत्तम मित्र मला मी क्रूर आणि निर्दय आहें, असें समजतात. तुह्मीसुद्धां माझ्या मित्रांनों, जोड्यानें मारून मला घालवून द्याल!"

श्रीरामकृष्ण डॉक्टरांस ह्मणाले "छे! डॉक्टर, असें ह्मणूं नका. हे लोक तुमच्यावर फार प्रेम करितात! नवरीच्या खोलींत नवऱ्याच्या आगमनाची

वाट स्त्रिया पाहतात त्याप्रमाणें ही मंडळी तुमची मार्गप्रतीक्षा करीत असते." एकच हंशा पिकतो.

गिरीश ह्मणाला "येथें प्रत्येक इसमाला आपल्याविषयीं आदर वाटतो."

डॉक्टर दुःखानें ह्मणाले "माझा मुलगा–माझी पत्नी हीं मला निर्दय समजतात. आणि याचें कारण इतकेंच, कीं, मी आपले विचार बोलून दाखवीत नाहीं."

गिरीश ह्मणाला "असें आहे तर महाराज, आपल्या मनाचें द्वार थोडेंसें खुलें करणें—आणि तेंहि आपल्या मित्रावर दया करण्यासाठीं—हें चांगलें होणार नाहीं काय? तुझ्या मित्राचा तुझ्याविषयीं गैरसमज झालेला आहे, असें तुला चांगलें कळून आलें आहे."

डॉक्टर ह्मणाले "मी सांगूंच काय? तुझ्यापेक्षां अधिक माझे विकार क्षुब्ध झालेले आहेत. ( नरेंद्रास ) मी एकांतांत अश्रु ढाळीत असतों. ( सद्गुरूला ) महाराज, समाधीमध्यें तुह्मी लोकांनां–त्यांच्या देहांला तुमच्या पायाचा स्पर्श करूं देतां हें चांगलें नाहीं असें मला वाटतें."

श्रीरामकृष्ण ह्मणाले "मी हें जाणूनबुजून करवितों, असें तुझें ह्मणणें नाहींना?"

डॉक्टर ह्मणाले "असें करणें योग्य नाहीं असें आपल्याला वाटतें ना?"

श्रीरामकृष्ण ह्मणाले "समाधीमध्यें माझ्या मनाची स्थिति कशी असते, हें मी काय सांगूं? समाधीनंतर मी स्वतःला केव्हां केव्हां असें विचारतों, कीं, मला झालेल्या रोगाचा हा परिणाम नसेलना! खरी गोष्ट अशी आहे, कीं, देवाचा विचार मनांत आला, कीं, मी वेडा होऊन जातों. हा सर्व त्या वेडाचा परिणाम आहे. त्याला उपाय नाहीं."

डॉक्टर शिष्यांनां ह्मणाले "या वर्तनाबद्दल त्यांनां पश्चात्ताप होतो. तें कृत्य वाईट ( पाप ) आहे असें त्यांनां वाटतें."

श्रीरामकृष्ण नरेंद्रास ह्मणाले "तुझी बुद्धि तीव्र आहे, त्याला सर्व समजावून सांग."

गिरीश डॉक्टरांस ह्मणाला "महाराज, आपण चुकतां. शिष्यांच्या देहांला त्यांच्या पायांचा स्पर्श होतो ह्मणून त्यांनां कधींहि वाईट वाटत नाहीं–छे, तसें नाहीं. त्यांचा देह शुद्ध, निष्पाप, मूर्तिमंत पवित्रताच आहे. आपल्या शिष्यांचें आध्यात्मिक कल्याण व्हावें या सदिच्छेनें ते शिष्यांच्या देहांला

**सद्गुरु आणि पापनिरसन.**

आपल्या पवित्र पायांचा स्पर्श करूं देतात. त्यांचीं पापें आपण घेतल्यामुळें, आपल्या देहाला रोग झाला असेल असें त्यांनां केव्हां केव्हां वाटतें. तुझेंच उदाहरण पहाना. पुष्कळ जोरानें अभ्यास केल्यामुळें तुला पोटशूळाची व्यथा एकदां झाली होती, असें तूंच एकदां आह्मांला सांगितलेंस. रात्रीं फार वेळ आपण वाचीत बसलों, हें फार वाईट झालें असें तूं सांगितलें नाहींस काय? यावरून रात्रीं फार वेळ वाचीत बसणें हें वाईट आहे असें सिद्ध होतें काय? आपण रोगी आहों या दृष्टीनें सद्गुरूंस कदाचित् वाईट वाटत असेल. पण मानवजातीचें कल्याण व्हावें ह्मणून झटणाऱ्या ईश्वराच्या उपदेशकाच्या नात्यानें त्यांनां याबद्दल केव्हांहि वाईट वाटणार नाहीं."

डॉक्टरांचा चेहरा बदलला आणि त्यांनीं आपली मान खालीं घातली.

डॉक्टर गिरीशला ह्मणाले "मी हरलों हें कबूल करतों. आतां तुझ्या चरणाची धूलि दे पाहूं. (नरेंद्रास उद्देशून) ही गोष्ट जाऊंद्या, गिरीशच्या बुद्धीची तीक्ष्णता मला कबूल केली पाहिजे."

नरेंद्र डॉक्टरांस ह्मणाला "दुसऱ्या तऱ्हेनें हा प्रश्न पाहतां येईल. एकाद्या शास्त्रीय शोधाकरितां तुह्मी तुमचें सर्व आयुष्य वेंचतां. तेव्हां आपला देह, आपली प्रकृति, इत्यादिकांकडे तुह्मी आपलें लक्ष देत नाहीं. देवाचें ज्ञान हें तर सर्वांत मोठें शास्त्र आहे, आणि त्याकरितां सद्गुरूंनीं आपली प्रकृति धोक्यांत घातली आहे, नव्हे बिघडवून टाकिली आहे, हें योग्य आणि स्वाभाविकच नाहीं काय?"

डॉक्टर ह्मणाले "बुद्ध, येशू, चैतन्य, महंमद इत्यादि सारे धर्मगुरु शेवटीं अहंकारानें युक्त झाले. 'मी जें कांहीं सांगतों तेवढेंच खरें, त्याशिवाय दुसरें सर्व चुकीचें आहे,' असेंच ते सर्व सांगतात. किती भयंकर हें!"

**अवतार.**

असें ह्मणून डॉक्टर जाण्याकरितां निघाले.

गिरीश डॉक्टरांस ह्मणाला "आपणहि तीच चूक करतां, असें आपल्यास वाटत नाहीं काय? तुह्मी असें दाखवितां, कीं, ते सारे--एकासुद्धां अपवादाशिवाय—अहंकारी होते! त्या सर्वांचे दोष तुह्मी दाखवितां! आणि हाच आरोप आपल्यावरहि येणार नाहीं काय?"

डॉक्टर स्वस्थ राहिले.

नरेंद्र ह्मणाला "आह्मी त्यांनां देवासारखे मानून त्यांची सेवा करितों."

## चतुर्दश परिच्छेद.

## नरेन्द्र, राखाल, महेन्द्र, गिरीश आणि दुसऱ्या शिष्यांसह काशीपुर उद्यानांत.

मार्च १८८६.

### अध्याय पहिला.

### भक्तांसाठीं ईश्वरी अवतार.

काशीपुर येथील उद्यानांत श्रीरामकृष्ण शिष्यांसहित राहिले होते. त्यांची प्रकृति बरीच नादुरुस्त असून ते वरच्या मजल्यावर होते.

संध्याकाळची वेळ. नरेंद्र आणि राखाल हे त्यांचे पाय हळुहळू हातानें रगडीत होते. मणीहि सद्गुरूंजवळ बसला होता. त्यानेंहि या सेवेस लागावें ह्मणून सद्गुरु त्याला खूण करीत होते. मणीनें दोघांपैकीं एका शिष्यास मोकळें करून त्याचें काम करण्यास सुरू केलें.

रविवार, ता. १४ मार्च १८८६, फाल्गुन शुद्ध ९ मी. सद्गुरूंचा वाढदिवस गेल्या रविवारीं काशीपुर उद्यानांत पाळण्यांत येऊन आज सात दिवस झाले. गतवर्षी दक्षिणेश्वरच्या देवालयांत वाढदिवस मोठ्या उत्साहानें आणि आनंदानें साजरा करण्यांत आला. या वर्षी सद्गुरु फार आजारी असल्यामुळें त्यांचे शिष्य फार त्रस्त झाले होते. देवाप्रमाणेंच या वाढदिवशीं सद्गुरूंची नेहमींप्रमाणें पूजा करून नैवेद्य समर्पण करण्यांत आला. परंतु लोकांनां भोजन वगैरे घालतां आलें नाहीं.

सद्गुरूंची शुश्रूषा करीत सर्व शिष्य उद्यानांत हजर होते. पवित्र माता (श्रीशारदा देवी) हि येथें असून ती आपल्या **यजमानांची** (सद्गुरूंची) सेवा अहोरात्र करीत होती. तरुण शिष्यांपैकीं बहुतेक येथें होते. त्यांनीं आपलें घरदार बहुतेक सोडून दिल्याप्रमाणेंच होतें. ज्यांच्यापासून या संसाराटवींत आयुष्याचें इतिकर्तव्य त्यांनां समजलें आहे, अशा सद्गुरूंच्या सेवेस त्यांनीं आपलें तनुमनोधन सर्व कांहीं अर्पण केलें होतें.

गृहस्थाश्रमी प्रौढ शिष्य बहुतेक दररोज सद्गुरूंस भेटण्यास येत असत. त्यांपैकीं कांहीं येथेंच एकसारखे तीनचार दिवस राहण्याकरितां आज येणार होते.

# चतुर्दश परिच्छेद—अध्याय पहिला.

सद्गुरु आज बरेच आजारी होते. मध्यरात्रीचा समय. उद्यान आणि गृह हीं चंद्रप्रकाशानें स्नात झालीं होतीं. पण शिष्यांच्या अंतःकरणाला चैन बिलकुल नव्हतें. कारण आयुष्याचें कोडें ज्यांनीं त्यांच्यासाठीं सोडविलें, असे सद्गुरु हें जग सोडून जाणार, अशी त्यांनां भीति वाटत होती.

सर्व बाजूंस पूर्ण स्वस्थता होती. निसर्गदेवता शांत होती. दक्षिणेकडून वाहणारा वसंतवात झाडांचीं पानें सळसळ हालवीत होता. अशा या शांततेमध्यें सद्गुरु वरच्या मजल्यावर आपल्या खोलींत तळमळत होते. त्यांनां झोंप अगदीं नव्हती. जवळच एक दोन शिष्य जागे राहून पहात होते. केव्हां केव्हां सद्गुरूंस झोंप येत असावी, असें दिसत होतें. ज्या स्थितीमध्यें अत्यंत मोठीं दुःखें आणि संकटें अंगावर आलीं असतां मन समतोल राहतें, अशा धन्य योगस्थितीमध्यें सद्गुरु गेले होते काय?

मी सद्गुरूंच्या जवळच स्वस्थ बसलों. अवर्णनीय वेदना सद्गुरु सहन करीत आहेत हें पाहून मी गांगरून गेलों. हा देखावा पाहून दगडासारख्या घट्ट असलेल्या हृदयांनां सुद्धां द्रव येता. सद्गुरूंच्या आज्ञेवरून मी अधिक जवळ गेलों. तुटक्या शब्दांत सद्गुरु मला ह्मणाले, कीं, "तूं आणि तुझे बंधु शोक करीत राहाल ह्मणून मी इतकें सहन करितों. तुह्मी सर्वजण, तुमच्या शरीरास वेदना फार होतात, शरीर टाकून द्यावें, असें ह्मणाल, तर हें शरीर एकीकडे टाकून देतां येईल.'

मी कांहींएक न बोलतां अतिशय भांबावून गेलों.

शिष्यांनां हा दुःखाचा प्रसंग होता. त्यांचीं अंतःकरणें द्विधा होऊन गेलीं होतीं. त्यांचा मायबाप, त्यांचा नेता, त्यांचा गोप्ता, त्यांचा सद्गुरु असे ( वर दिलेले ) उद्गार काढीत होता, त्यांनीं उलट उत्तर काय द्यावें? शिष्यांपैकीं एक "हें क्रुसावर चढविण्यासारख्या यातना भोगण्याचें दुसरें उदाहरण आहे काय? —मानवी जातीसाठीं आणि **मेंढपाळा**वांचून अनाथ होणाऱ्या मेंढरांसारख्या भक्तांसाठीं हा दुसरा आत्मयज्ञच आहे काय?" असा आपल्या मनांत विचार करीत होता.

× × × ×

मध्यरात्रीची वेळ. सद्गुरूंची प्रकृति फारच बिघडली. याला कांहीं उपाय नाहीं काय? कलकत्त्यांतील मित्रांनां निरोप पाठविला.

मध्यरात्रीं डॉक्टर उपेंद्र आणि कविराज नवगोपाल गिरीशसह कलकत्त्याहून आले. सर्व शिष्य सद्गुरूंपाशीं होते. सद्गुरूंनां आतां अमळ बरें वाटलेंसें दिसलें.

सद्गुरु म्हणाले "वेदना देहाला होतात, पण हें योग्य आहे. कारण देह पंचभूतांचा केलेला आहे, प्रकृतीपासून त्याची उत्पत्ति आहे."

गिरीशकडे वळून ते म्हणाले "या अवस्थेंत मी काय पहातों असें तुला वाटतें? मला ईश्वराचेच दैवी आकार दिसतात. आणि ते आकार निरनिराळे आणि पुष्कळ आहेत, व ज्यांत ईश्वर व्यक्त झालेला आहे असा हा आकारहि त्यांत मी येथें पहातों." (हा आकार म्हणजे त्यांचा आकार-देह असा सद्गुरूंच्या म्हणण्याचा भावार्थ.)

---

## अध्याय दुसरा.

## समाधि (देवदर्शन).

दुसरे दिवशीं सकाळीं सातआठ वाजण्याची वेळ. सोमवार ता. १५ मार्च. सद्गुरूंची प्रकृति थोडीशी सुधारली होती. शिष्यांशीं ते हळुहळू बोलत होते. उशीला टेंकून ते बसले होते. मध्यें मध्यें खुणांनीं आपले विचार ते दर्शवीत होते. नरेंद्र, राखाल, महेन्द्र, लाटू, शशी, गोपाल हे समोर बसले होते.

शिष्य स्तब्ध बसले होते. त्यांच्या अंतःकरणाला चैन नव्हतें. गेल्या रात्रीची सद्गुरूंची स्थिति ध्यानीं आल्यामुळें ते चिंतातुर झाले होते.

**ईश्वर, मानव आणि निसर्ग या रूपांनीं व्यक्त होतो.**

सद्गुरु मला म्हणाले "मी काय पाहतों हें तुला ठाऊक आहे काय? हें सर्व तो आहे असें मला दिसतें. मनुष्य आणि इतर प्राणी, डोकीं व हातपाय हालविणाऱ्या, पण ज्यांच्या आंत ईश्वर आहे अशा खऱ्याखुऱ्या आकृतिच मला दिसतात! याप्रमाणेंच मला पूर्वी एकदां भान झालें होतें. जीवंत प्राण्यांनीं भरलेल्या या विश्वांतील सर्व आकृति एका **वस्तूनेंच** धारण केल्या आहेत-जणूं काय उद्यान, रस्ते, नर, गाई यांसह सर्व गृह (विश्व) एका मेणाचेंच केलें आहे! यज्ञांत मारिला जाणारा पशु, ज्यावर त्याला मारणार तो ठोकळा आणि त्याला मारणारा

इसम हे तीन्ही एकाच वस्तूपासून उत्पन्न झाले आहेत असें मी पहातों, असा मला प्रत्यय येतो. "

मानवजातीसाठीं आपण स्वतः आपणास बलि देतों, आणि असें बलिदान करण्यासाठींच ईश्वर व्यक्त होतो, असा सद्गुरूंच्या म्हणण्याचा भावार्थ आहे काय ?

असें बोलून सद्गुरु हलक्या स्वरांत म्हणाले "अहा, अहा ! काय ही मौज ! काय ही शोभा ! "

पुन्हां आणखी समाधि. सद्गुरूंचें देहभान गेलें. समाधीची–आनंदातिरेकाची स्थिति त्यांनां आतां चांगली नव्हे असें शिष्यांनां वाटलें; पण आतां काय करावें, हें त्यांनां सुचेना.

पुन्हां सद्गुरु देहभानावर येऊन म्हणाले " आतां मला कोणत्याहि प्रकारचें दुःख नाहीं. मी पूर्वींप्रमाणें आतां चांगला आहें. "

सुखदुःख, आनंदशोक यांपलीकडील स्थितींत सद्गुरु गेलेले आहेत, असें शिष्यांनां दिसलें.

दुःखित अंतःकरणानें सद्गुरूंकडे पाहून लाटूनें आपलें डोकें हातावर ठेविलें, व तें खालीं घातलें.

सद्गुरूंनीं वर दृष्टि करून शिष्यांकडे पाहिलें. आपल्या जिवलग शिष्यां-विषयीं त्यांच्या मनांत अवर्णनीय असें प्रेमाचें भरतें आलें. अशा तऱ्हेचें प्रेम या जगांत सांपडावयाचें नाहीं, आणि अशा प्रेमाचें मानवी बुद्धीला आकलन –वर्णन करितां येणार नाहीं. राखाल आणि नरेंद्र यांनां पहा कसें त्यांनीं गोंजा-रिलें. त्यांच्या मुखांवरून हात फिरवून जणूं काय पांच वर्षांच्या मुलांप्रमाणें त्यांनीं त्यांनां कुरवाळिलें.

कांहीं वेळानें ते दुःखित स्वरानें मला म्हणाले " आणखी कांहीं अधिक दिवस या देहाला या जगांत राहण्याची मुभा असती, तर पुष्कळ लोकांची आत्मजागृति झाली असती. "

असें म्हणून क्षणभर ते स्वस्थ राहिले आणि पुन्हां म्हणाले **"पण ईश्वरानें दुसरीच योजना करून ठेविलेली आहे."**

पुढें सद्गुरु काय म्हणतात याची शिष्य वाट पहात बसले. सद्गुरु म्हणाले " होय, अशी ईश्वराची इच्छा नाहीं. येथें एक असा आहे, कीं, त्याला कपट

कांहीं माहीत नाहीं. त्याला अक्षरओळख नाहीं आणि लोक त्याचा फायदा घेतील. पैसा आणि विषयोपभोग याकरितां हपापलेल्या या जगामध्यें जे योग्य अधिकारी नाहींत आणि ज्यांनां उपासनेचें महत्त्व कळत नाहीं, अशांनांसुद्धां तो ईश्वराच्या उत्तमोत्तम देणग्या देऊन टाकील. "

' ईश्वराचा पुत्र, ईश्वरी अवतार म्हणजे मानवजातीसाठीं ईश्वराच्या प्रेमाचें व्यक्त स्वरूप होय, आणि प्रत्येक संसारी प्राण्याला देवाचें ज्ञान झालें आणि त्यांनीं देवाच्या पुत्राचा ( अवताराचा ) स्वीकार केला तर हें जग चालणार नाहीं, ' असा सद्गुरूंच्या म्हणण्याचा भावार्थ आहे काय ?

राखाल प्रेमानें म्हणाला " आपला देह आणखी कांहीं दिवस या जगांत रहावा असें ईश्वरापाशीं मागून घ्या, महाराज ! "

श्रीरामकृष्ण म्हणाले " ईश्वर आपल्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं करील !"

नरेंद्र म्हणाला " ईश्वराच्या इच्छेशीं आपली इच्छा मिळून जाऊन दोन्ही एकच झाल्या आहेत. "

सद्गुरु स्वस्थ राहिले. जणूं काय ते आंतल्या आंत विचार करीत होते.

श्रीरामकृष्ण, नरेंद्र, राखाल आणि इतर शिष्य यांनां म्हणाले " याविषयीं मीं देवापाशीं मागणें केलें, पण त्यापासून कांहीं निष्पन्न होत नाहीं. त्याच्या इच्छेप्रमाणें घडून येणारच. मी आणि माझी **जगन्माता** दोघें एकच होऊन गेलों, असें आतां मला दिसतें. राधा कृष्णास म्हणाली ' हे प्रियकरा, तूं माझ्या हृदयांत रहा आणि पुन्हां तुझ्या मानवा रूपानें व्यक्त होऊं नको.' पण पुन्हां मानवी रूपांत कृष्णाला पाहण्याची तिला इच्छा झाली. तिचें अंतःकरण प्रियकराला पाहण्याविषयीं उचंबळून धडपड करूं लागलें. पण ईश्वराच्या इच्छे-प्रमाणें सर्व कांहीं होणार. कृष्ण बराच वेळ मानवी रूपानें व्यक्त झाला नाहीं."

राखाल एकान्तीं शिष्यांनां म्हणतो "सद्गुरु चैतन्याविषयीं बोलत आहेत."

मी आपल्याशींच म्हणालों " आपल्या जगन्मातेशीं एकरूप ! अव्यक्ताशीं तादात्म्य ! आतां निराळ्या व्यक्तित्वानें राहणें हें सद्गुरूंला बरेंच कठिण आहे. पुत्र मातेंत लीन होऊन गेला ! असाच सद्गुरूंच्या म्हणण्याचा अर्थ आहे काय ?"

## अध्याय तिसरा.

### पलीकडून ( ईश्वराकडून ) संदेश.

शिष्य स्तब्ध बसले. सद्गुरूंनीं त्यांनां प्रेमानें पाहिलें. हृदयाकडे आपला हात नेऊन ते बोलूं लागले.

श्रीरामकृष्ण नरेंद्र आणि इतर शिष्य यांनां ह्मणाले " येथें ( माझ्यामध्यें ) दोन पुरुष आहेत. एक **जगन्माता**—"

पुढील शब्द ऐकण्यास शिष्य आतुर झाले.

सद्गुरु पुढें ह्मणाले " एक जगन्माता आणि दुसरा तिचा भक्त. आतां आजारी असलेला दुसरा पुरुष होय. हें तुह्मांला समजतें काय ? "

कांहीं उत्तर न देतां शिष्य स्तब्ध बसले.

श्रीरामकृष्ण पुढें ह्मणाले " मी हें सर्व कोणाला सांगूं ? आणि माझें ह्मणणें समजणारा असा कोण आहे ? "

कांहीं वेळानें सद्गुरु पुन्हां ह्मणाले "ईश्वर आपल्या शिष्यांसहित दैवी अवतार घेऊन येतो. तो मानवी शरीर धारण करितो. त्याचे शिष्य त्याच्याबरोबर परत जगन्मातेकडे जातात. "

राखाल ह्मणाला " ह्मणून आपण आह्मांला सोडून जाऊं नये. "

सद्गुरूंच्या नेत्रांतून अवर्णनीय प्रेमाचे किरण बाहेर पडून ते हंसले, आणि ह्मणाले " बॉलभक्तांची टोळी एकदम एका घरांत शिरते, देवाचें नाम गाते, आणि आनंदानें ती नाचूं लागते. इतकें झाल्यावर एकदम तें घर सोडून ती चालती होते. जसें एकदम येणें तसें एकदम जाणें ! आणि लोक तर त्यांनां जाणत नाहींत. "

सद्गुरु आणि शिष्य हंसले. बॉल नांवाची त्यागी आणि ईश्वरी प्रेमानें धुंद झालेल्या हिंदूंची एक जात आहे.

सद्गुरु पुढें ह्मणाले " मानवी शरीर धारण केलें ह्मणजे दुःख टाळतां येत नाहीं. मी केव्हां केव्हां आपल्याशीं ह्मणतों, कीं, ईश्वरानें या जगांत मला पुन्हां पाठवूं नये ! पण एका गोष्टीचा नीट विचार केला पाहिजे. ईश्वराच्या मेजवानीचें आमंत्रण आलें ह्मणजे घरांतील डाळतांदुळाचें महत्त्व वाटत नाहीं. "

मी आपल्याशींच ह्मणालों " ईश्वराचा प्रेमस्वरूप असा अवतार ईश्वराच्या भक्तांबरोबर ह्मणजे आपल्यासारख्याशींच नेहमीं राहूं इच्छितो, असाच सद्गुरूंचा

बोलण्याचा अर्थ आहे काय? ईश्वराच्या मेजवानीच्या वेळीं सर्वांनां वाढलें जाणारें अमृत ह्मणजे ईश्वराचें प्रेमच नव्हे काय?"

सद्गुरु पुढें ह्मणाले "ईश्वरावर निष्काम प्रेम करणाऱ्या भक्तांसाठींच तो मानवी शरीर धारण करितो."

सद्गुरु अवर्णनीय प्रेमानें नरेंद्राकडे पाहूं लागले.

**सद्गुरु नरेंद्रास ज्ञान-मार्ग व भक्तिमार्ग शिकवितात.**

सद्गुरु नरेंद्रास ह्मणाले "एक चांडाळ आपल्या खांद्यावरून, मारलेल्या जनावरांचें मांस भरलेल्या बुट्ट्यांची सांगड नेत होता. गंगानदींत स्नान करून परत जाणाऱ्या शंकराचार्यांची वाटेंत त्याला गांठ पडली. दुर्दैवानें त्याचा आचार्यांच्या पवित्र शरीरास स्पर्श झाला. आचार्य रागानें क्रुद्ध होऊन ह्मणाले 'मूर्खा, तूं मला शिवलास!' त्या चांडाळानें उत्तर दिलें 'महाराज, मी आपणास स्पर्श केला नाहीं, किंवा आपण मला केला नाहीं. आपण मला विचार करून सांगा, कीं, आपण देह, मन किंवा बुद्धि आहां, किंवा आपण खरोखर कोण आहां?' विश्वाचे घटक ह्मणजे खालीं दिलेले तीन पदार्थ, यांनीं खरा आत्मा बद्ध किंवा आसक्त होत नाहीं. १ ईश्वराप्रत नेणारें सत्व (प्रेम, त्याग, इत्यादि.); २ कर्माप्रत नेणारें रज; ३ देवापासून दूर करणारें तम. परमात्मा—परब्रह्म कशासारखें आहे हें आपणास ठाऊक आहे काय? गंध—मग ते सुगंध असोत किंवा दुर्गंध असोत—वाहून नेणाऱ्या पण त्या गंधाशीं अनासक्त असणाऱ्या हवेसारखें तें आहे,"

नरेंद्र ह्मणाला "महाराज, हें अगदीं खरें आहे."

सद्गुरु ह्मणाले "परब्रह्म हें सर्व गुण व माया यांहून पलीकडे आहे. माया ही दोन प्रकारची आहे. १ ईश्वराप्रत नेणारी (विद्या); २ ईश्वरापासून दूर नेणारी (अविद्या). कनक आणि कांता ईश्वरापासून आह्मांला दूर नेतात. ज्ञान, त्याग, भक्ति हीं ईश्वराकडे नेतात. शंकराचार्यांनीं भक्ति केव्हां सोडली नाहीं. त्यांनीं **उपदेशकाचा अहंकार** बाळगला होता! तुला आणि तुझ्या दुसऱ्या मित्रांनां माझ्याविषयीं काळजी वाटत आहे, आणि ही काळजी भक्तीपासूनच उत्पन्न होते, आणि ती देवाप्रत नेते. ईश्वराप्रत नेणाऱ्या विद्यामायेची मदत घेतली तर ब्रह्मज्ञान प्राप्त होतें. छपरावर चढून गेल्यावर कित्येकांनां जिन्यावरून खालींवर येणेंजाणें आवडतें. ब्रह्मज्ञान झाल्यावरहि असे (लोक)

सगुण देवतेची भक्ति करितात. मानवजातीला आपलें उदाहरण मिळावें, ईश्वरी प्रेमाची गोडी चाखावी, भक्तांची सत्संगति मिळावी, या हेतूनें ते असें करितात."

नरेंद्र आणि दुसरे शिष्य एक शब्दहि न बोलतां स्तब्ध बसले.

नरेंद्राला शिकवितांना सद्गुरु आपल्याविषयींच बोलतात आणि आपल्याकडेच बोट दाखवितात काय ?

नरेंद्र ह्मणाला "त्यागाची आवश्यकता मी दाखवितों तेव्हां कित्येक लोक माझ्यावर रागावतात."

**नरेंद्र आणि त्याग.** सद्गुरु हळूच ह्मणाले "ईश्वराकरितां आपण जग सोडलें पाहिजे, त्याचा त्याग केला पाहिजे."

सद्गुरूंची मुद्रा गंभीर झाली. त्यांनीं आपल्या देहाला स्पर्श केला आणि नरेंद्र आणि इतर शिष्य यांनां नीट लक्ष्य द्या, ह्मणून बजावून विचारिलें, कीं, "समजा, एकामागून एक असे एका ओळींत दोन पदार्थ आहेत. ते असे आहेत, कीं, पहिल्या पदार्थाला दूर बाजूला लोटल्याशिवाय दुसऱ्या पदार्थाकडे तुह्मांला जातां येत नाहीं. अशी स्थिति असली, तर दुसरा पदार्थ घेण्यासाठीं पहिला पदार्थ एका बाजूस लोटावयास नको काय ?"

नरेंद्र ह्मणाला "अगदीं तसेंच करावें लागेल महाराज !"

सद्गुरु हळूच नरेंद्रास ह्मणाले "प्रत्येक वस्तु ह्मणजे ईश्वराचें व्यक्तस्वरूप आहे असें जेव्हां तूं पहातोस, तेव्हां ईश्वराव्यतिरिक्त तुला दुसरें काय दिसणार आहे ? मग जग आणि संसार ह्मणून निराळें कांहीं राहिलें काय ?"

नरेंद्र ह्मणाला "खचित नाहीं. **जगाचा त्याग केला पाहिजे.**"

सद्गुरु ह्मणाले "तूं जर एका ईश्वरालाच सर्वत्र पाहतोस, तर आपलें कुटुंब, आपले नातलग इत्यादि दुसरें निराळें असें तुला कांहीं दिसणार नाहीं. पण प्रत्येकानें मनापासून—मनानें त्याग केला पाहिजे. येथें जे कोणी येतात त्यांपैकीं जगाशीं आसक्त असे कोणीहि नाहींत."

सद्गुरु हंसत ह्मणाले "यांपैकीं कांहींनां स्त्रियांची आवड होती. इतकेंच काय तें. ते जगांत ( संसारांत ) आहेत, पण ते जगाचे ( संसारी ) नव्हत. स्त्रियांच्या सहवासाची त्यांची इच्छा तृप्त झाली आहे, आणि आतां त्यांनां आपलें मन पूर्णपणें ईश्वराकडे लावितां येईल."

**नरेंद्र आणि त्याची वीरवृत्ति.**

सद्गुरूंनीं मोठ्या ममतेनें नरेंद्राकडे पाहिलें. त्याच्याकडे दृष्टि लावतांच ते आनंदानें भरून गेले. शिष्यांकडे वळून ते ह्मणाले "हा मोठा चमत्कार आहे."

नरेंद्र हंसत सद्गुरूंस ह्मणाला "महाराज, कसला चमत्कार ?"

सद्गुरु ह्मणाले "त्यागाकडे होत असलेली प्रवृत्ति."

नरेंद्राच्या त्यागाविषयीं सद्गुरु बोलूं लागले.

नरेंद्र आणि इतर शिष्य स्तब्ध राहून सद्गुरूंकडे पाहूं लागले. राखाल मात्र बोलूं लागला. तो हंसत हंसत सद्गुरूंस ह्मणाला "आतां नरेंद्र आपला उपदेश चांगला जाणत आहे."

सद्गुरु हंसून ह्मणाले "होय, तें खरें आहे. दुसरें असें, कीं, दुसरेहि येथें पुष्कळ आहेत. त्यांनांहि आतां चांगलें समजूं लागलें आहे. ( मला ) असेंच ना ?"

मीं ह्मटलें "होय महाराज, अगदीं खरें !"

कांहीं वेळ सद्गुरूंनीं नरेंद्र आणि महेंद्र यांच्याकडे पाहिलें. प्रथम नरेंद्राकडे आणि नंतर मजकडे बोट दाखवून त्यांनीं राखाल आणि इतर शिष्य यांनां खुणा करून दाखविलें.

राखाल खुणांचा अर्थ समजून बोलला "नरेंद्राची वृत्ति वीराची आणि महेंद्राची वृत्ति *सखीची आहे, असा आपला आशय आहे."

सर्व हसूं लागले. सद्गुरुहि हंसले.

नरेंद्र हंसत ह्मणाला "महेंद्र हा फार थोडें बोलतो आणि तो फार भिडस्त आहे ह्मणून तूं त्याला सखी ह्मणतोस काय ?"

सद्गुरु हंसत नरेंद्रास ह्मणाले "बरें, माझ्या मनोवृत्ति कशा आहेत असें तुला वाटतें ?"

नरेंद्र ह्मणाला "महाराज, आपण तर सर्व कांहीं आहांत. हें जग देण्यास असमर्थ आहे अशा ( अलौकिक ) शक्तीनें, विवेकरूपी खड्गानें ज्यानें आपला

---

*सखी—वृंदावनाच्या गोपींप्रमाणें परमेश्वराला नवरा समजून त्याची सेवा करणारा, अशा अर्थी राखालनें हा शब्द योजला होता.

सत्याप्रत मार्ग शोधून काढला आहे, असे आपण शूर आहांत. सखीच्या मनोवृत्ति—अवर्णनीय प्रेम—ईश्वराची कल्पना मनांत येतांच होणारा प्रेमातिरेक —आपल्याच आहेत. ईश्वराविषयीं आपली कळकळ पाहिली ह्मणजे, आपण शूर, सखी आणि सर्व कांहीं आहांत."

## अध्याय चवथा.

### स्पष्टकथन.

सद्गुरूंच्या मनोवृत्ति उचंबळून गेल्या. ते आपल्या हृदयावर हात ठेवून नरेंद्र आणि इतर शिष्य यांनां ह्मणाले "**सर्व वस्तु, कोणतीहि कल्पनीय वस्तु येथून निर्माण झाली आहे असें मी पहातों—असा मला प्रत्यय येतो.**"

"तुला काय समजलें"? असें नरेंद्रास त्यांनीं खुणेनें विचारिलें.

नरेंद्र ह्मणाला "प्रत्येक कल्पनीय वस्तु ह्मणजे सर्व निर्मित वस्तु आपल्यापासून उत्पन्न होतात."

सद्गुरु आनंदानें राखालास ह्मणाले "पाहिलेंस, कसें सर्व त्याला समजतें तें!"

सद्गुरूंनीं नरेंद्रास गाण्यास सांगितलें. नरेंद्र जगाचा त्याग करणार आहे, आणि त्याच्या अंगीं पूर्ण संन्यासवृत्ति भरून गेलेली आहे. नरेंद्र गाऊं लागला:—

नलिनीदलगतजलमतितरलं
तद्वज्जीवनमतिशयचपलम् ।
क्षणमिह सज्जनसंगतिरेका
भवति भवार्णवतरणे नौका ॥

मध्येंच सद्गुरूंनीं विचारिलें "हें तूं काय सांगतोस? हें तर नेहमींचें साधें आहे आणि तें नवशिक्यासाठीं आहे."

नरेंद्रानें आतां भक्त आपल्या प्रियकरास—परमेश्वरास पाहण्यास उत्कंठित आहे असें गाणें ह्मटलें.

काहे सइ जियत मरत कि विधान !

व्रजकि किशोर सइ काँहा गेल भागइ व्रजजन टुटायल पराण ।
मिलि सइ नागरी, भुलिगेइ माधव, रूपविहीन गोपकुआरी ।
को जाने प्रिय सइ रसमय प्रेमिक, हेन बंधु रूपकि भिखारी ॥
आगे नाहि बुझनु, रूप हेरि भुलनु, हृदि कैनु चरणयुगल ।
यमुनासलिले सइ- अब तनु डारव आन सखि भखिब गरल ॥

(किवा) कानन वल्लरी गल वेढि बाँधइ, नवीन तमाले दिब फांस।
नहे श्याम श्याम श्याम श्याम, श्याम नाम जपइ, छार तनु करिब विनाश॥

पदांतील माधुर्यानें सद्गुरु आणि शिष्य मोहून गेले. सद्गुरु आणि राखाल यांच्या नेत्रांत दिव्य प्रेमाश्रु आले.

नरेंद्रालाहि आनंदाचें भरतें आलें. आपण वृंदावनाची एक गोपी आहें असें समजून त्यानें पुन्हां गाणें ह्मटलें.

---

तुमि आमार, आमार बंधु, (कि बलि कि बलि तोमाय बलि नाथ।)
कि जानि कि बलि आमि अभागिनी नारीजाति
तुम हातोकि दर्पण माथोकि फुल। तोमाय फुल करे केशे परूब बंधु।
तोमाय कबरीर सने लुकाये लुकाये राखूब बंधु।
श्यामफुल परिले केउ नखूते नारबे।
तुमि नयनोर अञ्जन, बयानेर ताम्बुल।
तोमाय श्याम अञ्जन करे एँखे परूबो बंधु।
श्याम अञ्जन परेछि बले केउ नखूते नारबे।
तुमि अङ्गकि मृगमद गिजब्राकि हार।
श्यामचन्दन माखि शीतल हब बंधु।
तोमार हार कण्ठे परूब बंधु।
तुमि देहकि सर्वस्व गेहकि सार॥
पाखीको पाख मीनको पानि। तेयसे राम बँधु तुया मानि।

# *परिशिष्ट.

## प्रथम परिच्छेद.

### अध्याय तिसरा.

[ **चाल**—कब सुमरोगे राम० ]

नाम तुझें देई दुर्गे ! ॥ ध्रु० ॥
धन्य मानिनचि नाम स्मरतां काल जरी मज नेई ॥ १ ॥
कळेल मग तरि पतितोद्धरणा धांवतेस कीं नाहीं ॥ २ ॥
ब्रह्मघातकी जरि मी असलों नामें पावन होई ॥ ३ ॥
भ्रूणघात जरि करिं मम घडले तद्भय नामें जाई ॥ ४ ॥
दुरित न वाटे मदिरापानीं नाम मुखीं जरि राही ॥ ५ ॥
ब्रह्मपदातें निश्चित मिळविन नामाश्रय जरि होई ॥ ६ ॥

---

[ २ ]

[ **चाल**—झडकरि पाव जगज्जननी० ]

भज मन! चिद्घन सुखधामा ॥
अनुपम सुरुचिर नरजनसुखकर यद्यशा न सीमा ॥ ध्रु० ॥
स्थिरचरिं वास असे ज्याचा ।
स्थितिलयकर्ता जगताचा ।
लोलुप अभिनव रागाचा ।
तो सुखदायक भवभयहारक चिंतिं अंतरात्मा ॥ १ ॥

---

* या पुस्तकांतील मूळ बंगाली पदें जेथच्या तेथें देण्यांत आलीं असून, या परिशिष्टांत त्यांचें मराठी रूपांतर देत आहों. रूपांतरांत मूळ पदांचा फक्त भावार्थ देण्याचा प्रयत्न केला आहे; शब्दशः भाषांतर केलेलें नाहीं.

सुंदर हरितेजापुढती ।
कोटि हिमकरहि उणे दिसती ।
जणुं तद्रूपापासुनि ती ।
चमके चपला, हर्षित हो तनु पाहुनि आरामा ॥ २ ॥
हृत्कमलासनिं हरिचरणा ।
स्थापुनि करिं तूं तत्स्मरणा ।
प्रेमपूर्ण निजनयनांनां ।
लावुनि बघ त्या त्रिलोकसुंदर मुनिजनविश्रामा ॥ ३ ॥
आत्मानंदरसीं रमुनी ।
प्रेमानंदीं जा बुडुनी ।
तन्नामामृत सेवोनी ।
प्रमत्त होईं, सोडिं न लवभरि त्या गुणगणदामा ॥ ४ ॥

---

## अध्याय चवथा.

[ चाल—जलजय्यो जीवना भजनबिना० ]

मुळिं रुचत न मधु फल अन्य मला ॥ ध्रु० ॥
दुर्मिळ जें फल अमित जनांला लाभ तयाचा मज झाला ॥ १ ॥
अनुपम फल तें सेवन करितां मोक्षवृक्ष हृदिंचा फुलला ॥ २ ॥
जन्म सफल मम आज जहाला रामकल्पतरु करिं आला ॥ ३ ॥
जें जें वांछीं फल मी हृदयीं तें दे तरु तें क्षणिं मजला ॥ ४ ॥
जग जें फल दे नलगे तें मज मनिंचें गुज हें कथित तुला ॥ ५ ॥

# परिशिष्ट.

## द्वितीय परिच्छेद.

### अध्याय दुसरा.

[ चाल—चंद्रकांत राजाची कन्या० ]

जाणे कुणि का प्रेमल पावन जननी मम काली ।
आजवरी षड्दर्शनांसि जी गोचर नच झाली ॥
मुनि ध्याती जिस मूलाधारीं सहस्रारकमलीं ।
ज्या कमलवनीं हंसीसह तो हंस करी केली ॥
हंसीहंस वदति ज्या ही मम तीच कालकाली ।
आत्मारामाचा आत्मा जी बुधजनिं मानियली ॥
मम जननीचा महिमा एकचि महाकाल जाणे ।
घटाघटाच्या स्थलीं वास जी करिते स्वेच्छेनें ॥
ब्रह्मांडाचें मम जननीच्या उदरीं जनु झालें ।
सुरासुरांतें मर्म न जीचें आजवरी कळलें ॥
'प्रसाद्' वदतो ज्ञान तियेचें झालें जे म्हणती ।
दुस्तर विधिहरिहरां सिंधु जो सहजचि ते तरती ॥
सत्य असे हें वच, अवमानुत जन या वचनाला ।
अनुभव याचा वें मी जरि मम पटत न हृदयाला ॥
चंद्रबिंब करिं धरावयातें शिशु जैसे झटती ।
ज्ञान तियेचें सुलभ गणिति ते मूढ तसे दिसती ॥

---

## अध्याय चवथा.

[ चाल—कब सुमरोगे राम० ]

नाम तुझें देईं दुर्गे ! ॥ ध्रु० ॥
धन्य मानिनचि नाम स्मरतां काल जरी मज नेई ॥ १ ॥
कळेल मग तरि पतितोद्धरणा धांवतेस कीं नाहीं ॥ २ ॥
ब्रह्मघातकी जरि मी असलों नामें पावन होईं ॥ ३ ॥
भ्रूणघात जरि करिं मम घडले तद्भय नामें जाई ॥ ४ ॥
दुरित न वाटे मदिरापानीं नाम मुखीं जरि राही ॥ ५ ॥
ब्रह्मपदातें निश्चित मिळविन नामाश्रय जरि होई ॥ ६ ॥

---

[ २ ]

[ चाल—गले भुजंगमाल० ]

चिंतिं हृदय ! सतत कालिजननीचरणांसी ॥ ध्रु० ॥
प्रेमें स्मरतां मनिं त्या चरणपंकजांसी ।
विविधभावलहरि येति हृदयसागरासी ॥ १ ॥
भाव जसा हृदयिं वसे फल तसें तयासी ।
मूळ आत्मविश्वासचि कारण हो यासी ॥ २ ॥
यज्ञयागही न गमति महती नच त्यांसी ।
तच्चरणामृतन्हर्दि निज बुडवितः मनासी ॥ ३ ॥

---

[ ३ ]

[ चाल—एक दिन जाना है० ]

निरहंकारतत्त्व शोधाया । बघसी मार्ग कोणता हृदया ! ॥ ध्रु० ॥
घोर भयंकर अंधकार ज्या व्यापी बहु स्थलासी ।
त्याच स्थळिं तूं उन्मत्तापरि मूढा कैसा भ्रमसी ॥ १ ॥
अभावरूपी कर्दम जरि तव राहे हृदयाभीतरीं ।
भावविषय मम काली असतां येइल कशि वद तव करिं ॥ २ ॥

# परिशिष्ट.

शक्तिबलें तूं आर्धी इंदुसि आणि पूर्ण वश करुनी ।
गुह्यकपाटीं येथ निधिस त्या टेवियलासे लपवुनि ॥ ३ ॥
होतां तुज नच शशि तो वश जरि उषःकाल बघ झाला ।
होइल निधि तो गुप्त कुठें मग शोधिसि हृदया ! त्याला ॥ ४ ॥
भक्तिरसाच्या रसिकानंदीं जें रंगुनि बहु जाई ।
तद्दर्शन षड्दर्शनांसि निगमागमांहि नच होई ॥ ५ ॥
ज्या भावास्तव युगयुगान्तरीं योगी करी तप महा ।
भाव साधितां ब्रह्म ओढी जैसा चुंबक लोहा ॥ ६ ॥
'प्रसाद' वदतो-कथुं का ? जी मी जननी ह्मणुनी ध्याई-
कथितों परि तें अदय जनांसी दुःखनिवेदन होई ॥ ७ ॥
अनुपम सुख तें सेवायाची आस जरी तुज होई ।
नयनवीक्षणीं दर्शविलें तें तत्त्व शोधुनी पाहीं ॥ ८ ॥

# तृतीय परिच्छेद.

## अध्याय दुसरा.

[ चाल—केलीस अशी काय० ]

ती सत्यरूप शिवद दिव्य मूर्ति गोजिरी ।
मद्दैवबलें प्रगट होइ हृदयमंदिरीं ॥ ध्रु० ॥
तें निशिदिनिं अनिमेष नयनिं रूप पाहुंया ।
त्या रूपसागरीं बुडुनी सकल जाउंया ।
कधिं कालीं तो सुखविल दिन दीन जना या ।
प्रगट करुनि नाथा ! त्वज्ज्ञान अंतरीं ॥ १ ॥
कधिं होइन नत पदकमलीं स्तब्ध होउनी ।
कधिं सुख दे आनंद हृदीं उदय पावुनी ।
जणु हर्षभरित हो चकोर विधुसि पाहुनी ।
त्वत्प्रकाश तेविं अह्मां मत्त कधिं करी ॥ २ ॥
बहु शांत, अद्वितीय अशा विभु ! तुझ्या पदीं ।
हा प्राण विकुनि जन्म सफल करिल मंदधी ।
तें स्वर्गसौख्य सतनु असुनि मिळत का कधीं ।
जन्म सफल पद मज तव जयीं आदरी ॥ ३ ॥
तव शुद्ध रूप हृदयिं जयीं मजसि दिसतसे ।
येतां प्रकाश तम जेवीं दूर पळतसे ।
तव तेज तेविं सकल दुरितनाश करितसे ।
ध्रुवरूपा हृदयांतुनि ढळ न पळभरी ॥ ४ ॥
हे दीननाथ ! दीनपाल ! ऐक विनवणी ।
मम हृदयींच्या वासनांसि टाक जाळुनी ।
त्वत्प्रेममग्न होइन निज भाव विसरुनी ।
दीन जना लाभ तुझा होय तो जरी ॥ ५ ॥

---

[ २ ]

[ चाल—भूपती खरे ते० ]

ब्रह्मनाम मंगल मोदप्रदनिं निज घेई ।
त्या नामें भरती अमृतसिंधुतें येई ॥ ध्रु० ॥

करिं अविरत मग तत्पान, दान वा देई ।
करिं नामगजर जरि विकल मन कधीं होई ॥
जें हृदय विषयमृगजलें फसुनि बहु जाई ।
तें प्रेमरसानें पूर्ण भरुनि मग येई ॥
अह्मि सकल ब्रह्मानंदा, सेवुंया ।
प्रेमयोग घेउनि योगी, होउंया ।
त्या प्रभुच्या मंगल नामीं, रंगुंया ।
त्या संकटकालीं कृपालु जनका बाहीं ।
'भो ब्रह्म!' ह्मणुनि निज दुरित वारिं लवलाहीं ॥ १ ॥

---

[ ३ ]

[ चाल—वैभव माझें नष्टचि झालें० ]

चिद्गगनीं तो प्रेमपूर्ण नव इंदु येतसे उदयाला ।
स्मितमुख बघुनी नाथाचें मत्प्रेमसिंधुसी ये वेला ॥ ध्रु० ॥
भो जगदीश! दयामय! जयजय! विश्वपालका! गुणशीला! ।
भक्तरूप नक्षत्रवृंद हा विभुच्या भवतीं किति जमला ॥ १ ॥
भक्तजनांसह लीलारसमय भक्तसखा नटुनी गेला ।
भो जगदीश! दयामय! जयजय! विश्वपालका! गुणशीला! ॥२॥
स्वर्गकपाटें मुक्त जहालीं रूप बघुनि वाटे मजला ।
नवविधानकुसुमाकरपवनें व्योमदेश हा व्यापियला ॥ ३ ॥
योगानन्दीं प्रेमगंध तो मत्त करी मुनिवृंदाला ।
भो जगदीश! दयामय! जयजय! विश्वपालका! गुणशीला॥४॥
आसन करुनी कमलाचें निज त्यावरि बसली वेल्हाळा ।
प्रेमावेशें भक्तभृंग करि त्या स्थलीं सुधापानाला ॥ ५ ॥
पहा जननिच्या प्रसन्न मोहन चित्तविनोदन वदनाला ।
पदतालिं तीच्या गानानंदें मुनिगण मग्न अहा! झाला ॥ ६ ॥
काय रूप तें! दर्शनमात्रें अचल शांति दे हृदयाला ।
'प्रेमदास' हा सकलां विनवित गाहो! जननीसुयशाला ॥ ७ ॥

---

## श्रीरामकृष्ण.

### अध्याय तिसरा.

[ **चाल**—ऊठ गडे सत्वरी० ]

घाल उडी सत्वरी । हृदया ! । आत्मसौख्यसागरीं ॥ ध्रु० ॥
प्रथम रत्न तव करिं न मिळे जरि । रत्नाकर तो ओस न वद परि ।
प्रयत्न पुनरपि विश्वासें करिं । यत्नें ये तो करीं ॥ हृदया० ॥ १ ॥
कामादिक षड्नक्र दुष्टमति । भक्ष्यास्तव या सागरिं फिरती ।
प्रवेशि त्यातें नकळत गिळिती । सावधता बहु धरीं ॥ हृदया० ॥ २ ॥
विवेकरूपी हळदी लावुनि । प्रवेश सागरिं करिं भय सोडुनि ।
गंधें त्या ते जातिल पळुनी । शंका लवहि न धरीं ॥ हृदया० ॥ ३ ॥
'प्रसाद' गर्जुनि वदत वैखरी । रत्नें अमित असति या सागरिं ।
निश्चयपूर्वक येतिल तव करिं । तळिं बुडशिल तूं जरी ॥ हृदया० ॥ ४ ॥

# परिशिष्ट.

## चतुर्थ परिच्छेद.

### अध्याय दुसरा.

[ चाल—निजरूप द्विला मी० ]

मम हृदया ! जननी ती काली ॥ ध्रु० ॥
प्रतिकालचि जी पुण्यभवानी श्यामल तुजला कशि दिसली ॥ १ ॥
दिशावसन परिधान करी परि तेजाची केवळ पुतळी ॥ २ ॥
भक्तवत्सला ती निजतेजें प्रकाश पाडी हृत्कमलीं ॥ ३ ॥

---

[ २ ]

[ चाल—क्षणमधुना नारायण० ]

भवरूपीं बाजारीं माते ! चतुरा तूं भाससी ॥ ध्रु० ॥
मानवरूपी पतंग करुनी, स्वकरें तूं उडवीसी ।
आशारूप समीरणवेगें दूर दवडिसी त्यासी ॥ १ ॥
गगनिं जावया बांधिसि तूं त्या मोहरूप सूत्राला ।
अंतरिंद्रियें, अस्थि, शिरा, तनु असति शलाका त्याला ॥ २ ॥
जन्म घेतसे पतंग हा तव सत्त्वरजादि गुणांनीं ।
इतर कुशलता अलंकारमय येते जननि ! दिसोनी ॥ ३ ॥
विषयकांचमय मांजा लावुनि सूत्र तीक्ष्ण बहु होई ।
लक्ष पतंगांतुनि एकचि परि मुक्तिपदातें जाई ॥ ४ ॥
ऐशा समयीं टाळ्या मोदें पिटिसी माते ! हातें ।
होतां मुक्त पतंग एक तो हर्ष होय किति तूतें ॥ ५ ॥
दक्षिणपवनबलें पतंग तो भवसागर तरुनीयां ।
सहज जातसे–'प्रसाद' वदतो विशंक वचनासी या ॥ ६ ॥

---

[ ३ ]

[ चाल—उद्धवा शांतवन कर जा० ]

जागृत मी माझ्या ठायीं । तूं जननी सन्निध असती ॥
परि तस्कर मम धन नेती । म्हणुनि हो खेद हृदयासी ॥
तव नाम अंतरीं घ्यावें । करिं निश्चय मी अपुल्याशीं ॥

परि समयीं स्मरण न होतें ।
हें नवल गमे बहु माते ! ।
चातुर्य खचित तव दिसतें ।
कारण हो जननी ! त्यासी ॥ १ ॥
खाया तुज मिळत न कांहीं । हा दोष न लावीं मजला ! ॥
जरि पूर्वीं देतिस मजला । मिळतें न आजि का तुजला? ॥
मीं दिधलें तुज का नसतें । देतिस जरि मज दानाला ? ॥
अपयश यश सुरस कुरसही ।
तुजपासुनि होती बाई ! ।
हृदयिं रसोद्भव तो होई ।
भंगिसि कां तूं मग त्याला? ॥ २ ॥
वदतसे 'प्रसाद'—दिलेंसी । माते! तूं मन जरि मजसी ॥
परि नेत्रीं खूण करुनियां । शंकित तूं मम मन करिसी ॥
गमतसे जरी निज हृदयीं । तूं गौप्य कांहिं ठेवीसी ॥
मधुरातें कटु समजोनी ।
सत्यासि असत्यचि गणुनी ।
मी भ्रमतों निशिदिनिं भुवनीं ।
आनंद त्यांत बघण्यासी ! ॥ ३ ॥

---

## अध्याय तिसरा.

[ चाल—सुदक्षिणापति दिलीपनंदिनि० ]

चल बा चित्ता ! सहल कराया, स्वस्थ कसें तूं बसलेंसी ?
सहज येउनी निधान करिं तव मूढपणें तूं दवडीसी ! ॥ ध्रु० ॥
अगणित कुसुमें पडलीं कालीरूप कल्पतरुमूलाशीं ।
निवडुनि घेतां येतिल चारी त्यांतिल तुझिया हातासी ॥ १ ॥
प्रवृत्ति तैशी निवृत्ति जाया पराक्रमी असती तुजसी ।
सहल कराया जातां परि तूं सवें घेइं त्या निवृत्तिसी ॥ २ ॥
निवृत्तिचा जो विवेकनामा सुत सत्वशील गुणराशी ।
सोडुनि अभिमाना त्यापासुनि परिसें सुतत्वबोधासी ॥ ३ ॥

दूर नेउनी उपदेशीं बा ! प्रवृत्तिच्या त्या तनयासी ।
आयके न जरि ज्ञानसागरीं लोटुनि दे त्या मूढासी ॥ ४ ॥
शुचि–अशुचींतें दिव्य मंदिरीं घेउनि करिं तूं शयनासी ।
प्रेमें असती सवती जरि त्या, जाशिल जननीचरणांसी ॥ ५ ॥
अहंकार तेवीं अविद्या असवि जनक–जननी तुजसी ।
मोहा टाकुनि दूर लोटिं त्यां स्मर न तयांच्या प्रेमासी ॥ ६ ॥
धर्माधर्म अजाद्वय जें त्या दृढ बांधुनियां स्तंभासी ।
जरि न मानिती निषेध, देईं ज्ञानासीनें बलि त्यांसी ॥ ७ ॥
मोहरूप त्या दरींत भयकर कधिंहि गड्या ! तूं नच पडसी ।
सुधैर्यरूपी स्तंभा जरि त्या हृदया ! करिं तूं दृढ धरिसी ॥ ८ ॥
'प्रसाद' वदतो—होतां ऐसें काला निर्भय वच वदसी ।
'बाळा ! हृदयहारका !' म्हणुनी प्रेमें त्या वक्षीं धरिसी ॥ ९ ॥

---

[ २ ]

[ चाल—हमारो निरधनको धनि राम० ]

भव हा सुखमंदिरसा भासे ॥ ध्रु० ॥
संचरतों मी भुविं आनंदें विपिनीं भ्रमर जसे ॥ १ ॥
जनकराज तो मुनिहुनि इतरां लवही हीन नसे ॥ २ ॥
दोन्ही पथ परि साधुनि पथ तो सेवुनि जात असे ॥ ३ ॥

---

[ ३ ]

[ चाल—झाली ज्याची उपवर दुहिता० ]

या विपिनीं मुरलीरव होई । मजपासुनि तो मम मन नेई ॥ ध्रु० ॥
वाटे माझा प्रियकर माधव । मार्गीं राहुनि मजला बाही ॥ १ ॥
याल सयांनों ! कीं नच मजसह । मूर्ति पहाया तो लवलाही ॥ २ ॥
'हरि' शब्द तुम्हांप्रति केवळ तो । हृदयनाथ मम परि तो बाई ! ॥ ३ ॥
श्रवणिं पडे ध्वनि तुमच्या तो परि । रव तो या मम उमटे हृदयीं ॥ ४ ॥
जणुं रव कथि मज "सखि ! तुजविण या–। कुंजवनासी शोभा नाहीं !" ॥ ५ ॥

---

# षष्ठ परिच्छेद.

## अध्याय तिसरा.

[ चाल—केळीस अशी काय० ]

ती सत्यरूप शिवद दिव्य मूर्ति गोजिरी ।
मद्दैवबलें प्रगट होइ हृदयमंदिरीं ॥ ध्रु० ॥

तें निशिदिनिं अनिमेष नयनिं रूप पाहुंया ।
त्या रूपसागरीं बुडुनी सकल जाउंया ।
कधिं कालीं तो सुखविल दिन दीन जना या ।
प्रगट करुनि नाथा ! त्वज्ज्ञान अंतरीं ॥ १ ॥

कधिं होइन नत पदकमलीं स्तब्ध होउनी ।
कधिं सुख दे आनंद हृदीं उदय पावुनी ।
जणुं हर्षभरित हो चकोर विधुसि पाहुनी ।
त्वत्प्रकाश तेविं अह्मां मत्त कधिं करी ॥ २ ॥

बहु शांत, अद्वितीय अशा विभु ! तुझ्या पदीं ।
हा प्राण विकुनि जन्म सफल करिल मंदधी ।
तें स्वर्गसौख्य सतनु असुनि मिळत का कधीं ।
जन्म सफल पद मज तव जयीं आदरी ॥ ३ ॥

तव शुद्ध रूप हृदयिं जयीं मजसि दिसतसे ।
येतां प्रकाश तम जेवीं दूर पळतसे ।
तव तेज तेविं सकल दुरितनाश करितसे ।
ध्रुवरूपा हृदयांतुनि ढळ न पळभरी ॥ ४ ॥

हे दीननाथ ! दीनपाल ! ऐक विनवणी ।
मम हृदयींच्या वासनांसि टाक जाळुनी ।
त्वत्प्रेममग्न होइन निज भाव विसरुनी ।
दीन जना लाभ तुझा होय तो जरी ॥ ५ ॥

---

# परिशिष्ट.

## सप्तम परिच्छेद.

### अध्याय तिसरा.

[ **चाल**—भज भज भवजलधिमाजि० ]

मम हृदया ! उडि सत्वरि घेईं रूपसागरीं ॥ ध्रु० ॥
जाशिल जरि तूं तलास । शोधिशील नीट त्यास ।
प्रेमरूप रत्न खास । येइ मग तुझ्या करीं ॥ १ ॥
स्मरुनि तत्त्व मग पाहीं । वृंदावन तव हृदयीं ।
ज्ञानदीप जळत राहि । निशिदिनिं तव अंतरीं ॥ २ ॥
शुष्क अशा धरणीवरि । चालवीत कोण तरी ? ।
कथि '**कबीर**' उमजशि परि । सद्गुरुचरणां धरीं ॥ ३ ॥

---

श्रीरामकृष्ण.

# अष्टम परिच्छेद.

## अध्याय पहिला.

[ चाल—भज भज भवजलधिमार्जि० ]

मम हृदया ! उडि सत्वरि येइं रूपसागरीं ॥ ध्रु० ॥
जाशिल जरि तूं तलास । शोधिशील नीट त्यास ।
प्रेमरूप रत्न खास । येइ मग तुझ्या करीं ॥ १ ॥
स्मरुनि तत्त्व मग पाहीं । वृंदावन तव हृदयीं
ज्ञानदीप जळत राहि । निशिदिनिं तव अंतरीं ॥ २ ॥
शुष्क अशा धरणीवरि । चालवीत कोण तरी ? ।
कथि 'कबीर' उमजशि परि । सद्गुरुचरणां धरीं ॥ ३ ॥

# परिशिष्ट.

## नवम परिच्छेद.

### अध्याय दुसरा.

[ चाल—हाय मला अपशकुन० ]

गौररागलहरी तनुवरती । उसळुनियां या कितितरि येती ॥ ध्रु० ॥
प्रेमसिंधुच्या गभीर नादें । नास्तिक जन जणुं नाशा जाती ॥ १ ॥
अखिल विश्व हें जाइ तळाशीं । जावें वाटे तालिं सत्वरगति ॥ २ ॥
प्रेमरूप नक्रानें हरिच्या । परि धरिलें मज दिसत न सुगति ॥ ३ ॥
व्यथित होउनी मम दुःखें मज । तारिल ऐसा कोणि न जगतीं ॥ ४ ॥

---

[ २ ]

[ चाल—लग्नाला जातों मी द्वारकापुरा० ]

चल सखि ! तें गौररूप पाहुं लोचनीं ।
नयनरम्य मूर्तिसि त्या ठसवुं ये मनीं ॥ ध्रु० ॥
अळिता-पय एकवटुनि । चर्चिलि तनु जी साजणि ! ।
निर्मी शिव जीलागुनि । नटवित ज्या रूपा वृषभानुनंदिनी ॥ १ ॥

---

[ ३ ]

[ चाल—रामको आधार सिता० ]

श्यामापदनीलकमलिं हृदयभृंग रत होई ॥ ध्रु० ॥
कामादिक कुसुमीं जरि विषयमधुचि राही ।
मानुत त्या जन परि मज महती मुळिं नाहीं ॥ १ ॥
जननीपद कृष्णवर्ण अलिहि तसा पाहीं ।
कृष्णरसीं श्यामल रस मिळुनी क्षणिं जाई ॥ २ ॥
मत्त पंचतत्वां हा रंग कळुनि येई ।
म्हणुनि दूर पळती मज पाहुनि लवलाही ॥ ३ ॥
'कमलाकान्त' निजाशा पूर्णतेसि नेई ।
असुखसौख्य सम गणुनी बुडत मोद-डोहीं ॥ ४ ॥

---

[ ४ ]

[ चाल—नंदनवनदेवींनें माझा० ]

श्यामाधन तें मिळत न सकलां हेतु जरी असला ।
कालीधननिधि आजवरी कुणिं सहज लब्ध केला ! ॥ ध्रु० ॥
येतां स्वकरीं देइ कोणत्या विधि तो लाभाला ।
मूढ हृदय हें ! लवभरि त्याची कल्पना न याला ॥
शिवतपही नच करितें ऐसें प्रमत्त हृद्याला ।
इंद्रादिकवैभवा न गणि, जो चिंती जननीला ॥
प्रेमदृष्टिनें मम माता ती अवलोकी ज्याला ।
स्वानंदीं तो नर, समजावें, पूर्ण बुडुनि गेला ॥
योगी–सुरगण चिंतिति भावें ज्या पद्कमलांला ।
परि न तयांतें आजवरी तो चरणलाभ झाला ॥
प्राप्त करुनि त्या ध्यावें दुर्लभ चरणसरोजांला ।
आस अशी बहु या गुणहीना 'कमलकान्ता'ला ॥

---

[ ५ ]

[ चाल—नच मातें कोणी स्नेही० ]

मम माता श्यामा कुशला । यंत्रकला जाणे सकला ॥ ध्रु० ॥
यंत्र करुनि तनुरूप त्यांत बहु दाखवि रंग जनांला ॥ १ ॥
यंत्रिं वसुनि तत्सूत्र धरुनि करिं देइ तया चलनाला ॥ २ ॥
परि यंत्र वदे 'स्वबलानें मी करित असें भ्रमणाला' ॥ ३ ॥
मूढ पुरें तें परि नच जाणे गति दे कोण तयाला ! ॥ ४ ॥
जनुलाभ न पुनरपि यंत्रा त्या जाणे जें जननीला ॥ ५ ॥
भक्तिरज्जुच्या पाशें जननी बद्ध कुणा यंत्रांला ॥ ६ ॥

---

परिशिष्ट.

## दशम परिच्छेद.

### अध्याय दुसरा.

[ चाल—बघुनि सुभद्रेला० ]

भय वाटे मजला । हृद्गत सांगाया तुजला .

कपटविचारहि रुचत न मजसी ।
तूं मम करिंचा धननिधि अससी ।
वियोग तव मज होइल ऐशी ।
शंका हृदयाला । छळुनी भ्रमवी मन्मतिला ॥ १ ॥

जाणतसें मी तव हृदयासी ।
ठाउक सुखद मार्ग जो मजसी ।
विमल मनें तो सांगेन तुशीं ।
ज्यायोगें मजला । भवभयशब्दहि मुळिं नुरला ॥ २ ॥

मंत्र विविध जो व्यसनांमधुनी ।
मम तरणी तारि बलेंकरुनी ।
ज्यासि जपें मी सदाहि मन्मानिं ।
स्वीकरावयाला । तोचि करिं सिद्ध स्वमनाला ॥ ३ ॥



# एकादश परिच्छेद.

## अध्याय तिसरा.

[ चाल—आज श्याम मोह० ]

केशव ! हृन्मोहन ! मधुमुरलीधर ! माधवा !
गोवर्धनगिरिधारण ! यदुकुलजनपुंगवा ! ॥ ध्रु० ॥
कुंजवनविहार ! होइं सदय दीन या जना !
'हरि हरि' वद रसने ! हरिचरण चिंति मन्मना ! ॥ १ ॥
व्रजकिशोर ! कालीयविनाशन ! कंसान्तका !
श्यामल दामोदर ! नतजनभवभयहारका ! ॥ २ ॥
राधाहृदयानंदा ! वनमालाभूषणा !
रासरसविहार ! योगिवृंदमनोरंजना ! ॥ ३ ॥
प्रेमदृष्टि तव नयनीं मन मोही किति अहा !
भालीं तव शोभतो मयूरपक्ष रुचिर हा ॥ ४ ॥

---

[ २ ]

[ चाल—साध्य नसे मुनिकन्या० ]

या—या—क्षणिं जाउं चला । भाग्याचा रवि आज उदेला ॥ ध्रु० ॥
कुंजवनींची मुग्धा बाला ।
उपदेशी जें प्रेम जनाला ।
भरती येई त्या प्रेमाला ।
हृदयीं सावधतेला । ठेवा, नातरि जाइल वेला ॥ १ ॥
प्रेमा उसळे शतधारांनीं ।
आस असे तितुका स्वकरांनीं ।
घ्यावा; ज्या वृषभानुनंदिनी-।
देत असे दानाला । अधिकार दिला विभुनें जीला ॥ २ ॥
राधाप्रेमा मनिं आणोनी ।
हरिनामामृत घ्यावें वदनीं ।
प्रेमतरंगी जा रंगोनी ।
स्मरुनि तया प्रेमाला । 'हरि ये—हरि ये' बाहा त्याला ॥ ३ ॥

[ ३ ]

[ चाल—मेरे गिरधर गोपाल० ]

गौरा ! तव गौररूप भुलवि किति मनासी ॥ ध्रु० ॥
गौरवेष तव असतां कवण भावनेसी—।
धरुनि हृदयिं शांति अचल विपुल अशी देसी ? ॥ १ ॥
ये भयदा स्थिति मम या प्रेमसागरासी।
स्वकुलाचा अभिमानहि जातसे लयासी ॥ २ ॥
तस्करसा मम हृदया हरुनि बळें नेसी।
गोपशिशो ! मधुरा ! वनिं गोधन चरवीसी ॥ ३ ॥
करिं धरुनी वेणु रुचिर, करुनि मधु रवासी।
व्रजललनाहृदयभृंग तयें गुंगवीसी ॥ ४ ॥
गोवर्धन धरुनि करीं वृंदाविपिनासी।
रक्षुनियां अभय देसि नाथ ! निजजनांसी ॥ ५ ॥
त्यजुनि सकल अभिमानहि ललनानुनयासी।
साधाया व्रजनारीचरण तूं धरीसी ! ॥ ६ ॥
अनुतापाश्रुजलीं तव मुखविधु प्रकाशी।
तळपे; गौरा ! मम मन हरुनि कसें घेसी ॥ ७ ॥

[ ४ ]

[ चाल—वसंतीं बघुनि मेनकेला० ]

मना ! त्या श्यामाजननीला।
यत्नें बहु निज हृदयिं सांठवीं, त्यजिं न पलहि तिजला ॥ ध्रु० ॥
तिच्या मग घेउं दर्शनाला।
तत्पदरजही दाखवूं न कधिं आपण कवणाला ॥ १ ॥
छळिति रिपु कामादिक तुजला।
फसवुनि त्यांनां पाहूं चल ये नयनहारिकेला ॥ २ ॥
सर्वें निज घेउनि रसनेला।
तत्करवीं करूं 'जननी ! जननी !' नामभजनेला ॥ ३ ॥
नेती निवृत्तिमार्गोला।
असे कुमंत्री कुवासना नच शिवोत हृदयाला ॥ ४ ॥
धरुनि हृदिं बहु सावधतेला।
रक्षक करिं निज कार्यीं रत त्या ज्ञानलोचनांला ॥ ५ ॥

[ ५ ]

[ चाल—सा विरहे तव दीना० ]

सौख्यसदन मम माते ! । आनंदमयी असतां तूं नच निरानंद करिं यातें ॥ ध्रु० ॥
चरणयुगल तव सोडुनि कधिंही चिंतियलें न कुणातें ।
यम कां मजसि दुरात्मा समजे ? काय कथूं वद त्यातें ॥ १ ॥
वदुनि भवानी भवसागर हा लंघिन आस मनातें ।
बुडविशील परि दारुण सागरिं कल्पनाहि नच मातें ॥ २ ॥
नामसिंधुजलिं मी तव असतां दुःख लया नच जातें ।
अंत हो अतां मम जरि, तव कुणि नाम न घे हरकान्ते ! ॥ ३ ॥

---

[ ६ ]

[ शिवसंगे सदा रंगे. इ० हें बंगाली पद सोडलें आहे. त्याचें रूपांतर केलें नाहीं.

---

## अध्याय सातवा.

[ चाल—सखये अनसूये थांव किं बाई० ]

सखि ! ज्या विपिनीं मम माधव राही । दूर किती तें वन बाई ? ॥ ध्रु० ॥
तनुचा रमणाच्या परिमल येई । स्वबलें तो मम मन मोही ॥ १ ॥
सखये ! अबला मी त्यांतुनि बाला । चालाया बल नच मजला ॥ २ ॥

---

[ २ ]

[ चाल—कोन गली गये० ]

खचित तव धन्य नाथ ! लीला ॥ ध्रु० ॥
दर्शन देउनि केलिस दयिता ! दुःखमुक्त इजला ॥ १ ॥
नयनमनोहर सौंदर्यें निज पाडिसि मोहिं मला ॥ २ ॥
सप्तलोकिंही तव लाभानें दुःख-शब्द नुरला ॥ ३ ॥
ही तर दीना दासी—नच कशि वश हो मोहाला ? ॥ ४ ॥

---

# परिशिष्ट.

## द्वादश परिच्छेद.

### अध्याय दुसरा.

[ **चाल**—रुचती कां तीर्थयात्रा० ]

**मम निद्रा भंग पावे ये केवीं ती तरी ? ।**
**जागृति ये पूर्ण मातें व्यापितसे अंतरीं ॥**
**आतां ही योगनिद्रा तुज माते ! वाहिली ।**
**निद्रा जी विश्व मोही तिज निद्रा आणिली ! ॥ १ ॥**

---

# त्रयोदश परिच्छेद.

## अध्याय पहिला.

[ चाल—राम सरावा राम० ]

कृतिसी दिसत न पार । ईश तव ॥ ध्रु० ॥
सौंदर्याचें केवळ आगर दिसे विश्वसंसार ॥ १ ॥
अमित तारका गगनीं चमकति रत्नखचित जणुं हार ॥ २ ॥
इंदुरवि किती व्योमीं तळपति त्यां नच पारावार ॥ ३ ॥
धनधान्यमया विपुला धरणी पूर्ण तुझें भांडार ॥ ४ ॥
धन्य धन्य तूं असिस परेशा ! विश्वाचा आधार ॥ ५ ॥
प्रकाशमय तारका गाति तव महिमा वारंवार ॥ ६ ॥

---

[ २ ]

[ चाल—मारुं कसे यांनां० ]

अभिनव तव लीला । माते ! ॥ ध्रु० ॥
घोर ध्वान्तीं रूपहीन तव कान्ति चकाके विपुला ।
गिरिकुहरीं मुनि वास करुनियां ध्याति जननि ! तुजला ॥ १ ॥
निर्वाणसिंधुलहरींमधुनी घोर तमोऽकावरुनी ।
चिरशांतिपवन अविरत वाहुनि सुखवी हृदयाला ॥ २ ॥
कालरूप धरिसी पांघरुनी अंधकारवसनातें ।
वससी समाधिसदनिं कवण तूं न कळत मुळिं मजला ॥ ३ ॥
त्वत्पदकुवलयिं सदा जननि गे ! अभय पूर्ण सकलाला ।
त्याच स्थलिं त्वत्प्रेमरूप ती चमकतसे चपला ॥ ४ ॥
चिन्मुखकमलीं हास्य विलसुनी देई शोभा त्याला ।
दीपवी तुझा प्रकाश अगणितभास्करतेजाला ॥ ५ ॥

---

[ ३ ]

[ चाल—वैशाखमास वासंतिक० ]

ही हृदयसुखद शोभा किति दिसत सुरुचिरा ।
पाहीं ही अनुपम त्या रूपसुंदरा ॥ ध्रु० ॥

मम थोर भाग्य ह्मणुनि असा सुदिन उगवला ।
मम हृदयनाथ मन्मंदिरिं आजि पातला ।
वच वदवेना प्रेमभरें कंठ दाटला ।
 बघुनि तया ये जव मत्प्रेमसागरा ॥ १ ॥
हे प्रेममया ! हृदयनाथ ! रुचिरकोमला ! ।
धनराशि सांग समल वाहुं कोणत्या तुला ? ।
मत्प्राण, हृदय, वैभव जें गमत मम मला ।
 अर्पी तें तव चरणीं, घेइं विभुवरा ! ॥ २ ॥

[ ४ ]

[ चाल—धाडुनि दिधलें दासीसह० ]

त्वत्पदकमलीं प्राणभृंग मम लीन जरी नच होई ।
हृदयविरामा ! नाथा ! मग या काय जीवनीं सुख राही ॥ ध्रु० ॥
श्रेष्ठ रत्न तूं रत्नांतिल बहु यत्नें मम करिं आलें ।
धरुनि दक्षता हृदयीं जरि मीं तद्रक्षण नच केलें ।
काय मिळवुनी धनराशिंस मग अगणित फल मिळवीलें ? ।
तव मुख न दिसे मम सुतमुखिं तरि न कधीं तें मी पाहीं ॥ १ ॥
प्रेमाची तव कांति न दिसतां उज्वल विधुप्रकाशीं ।
इंदुज्योतिहि गमत तमोमय नीरस तुच्छ मनासी ।
मम रमणीचें प्रेम पवित्रहि-दिसत मलिनता त्यासी ।
प्रेमकनकिं त्या प्रेममणि तुझा दिसला मज जरि नाहीं ॥ २ ॥
तुजविषयींचा संशय दारुण पीडी हृदया पाहीं ।
तीव्र विषारी तक्षक दंशीं हाय ! मदंतर दाही ।
हृदयेश्वर ! तुज काय कथूं मम हृदय भरुनियां येई ।
हृदयरत्नमणि दायेता ! अससी, मोहत मन तव पायीं ॥ ३ ॥

[ ५ ]

[ चाल—उत्तम जन्मा येउनि० ]

भक्तिप्रेमप्रवेश होइल कधिं या मम हृदयीं ? ।
निश्चयपूर्वक कळत न ह्मणुनी भ्रांत चित्त होई ॥ ध्रु० ॥

पूर्णकाम त्या समयीं दैवें जाइन मी बनुनी ।
रसना राहि न हरिनामा जयिं पळभरहि त्यजुनी ।
प्रेमाश्रूंचा प्रवाह वाहिल जयिं नयनांतूनी ।
त्या समयीं तरि आशा मम का पूर्णतेसि जाई? ॥ १ ॥
येइ शुद्धता प्राणांसी वा कधिं या हृदयासी ? ।
मत्प्रेमाचें वृंदावन कधिं दिसे लोचनांसी ? ।
तोडिन कधिं मी न कळे स्वबलें दृढ भवबंधांसी ? ।
ध्वांत नयनींचें न कळे कधिं तें ज्ञानांजन नेई? ॥ २ ॥
दैवी परिस कधीं तनुलोहा कांचनता आणी ? ।
हरिमय विश्व करिल कधिं पावन दर्शन देवोनी ? ।
धर्म-कर्म मम जाइ पूर्ण कधिं विनष्ट होवोनी ? ।
भक्तिपथीं मी शांतमनानें लोळण कधिं घेई ? ॥ ३ ॥
जातिकुलाचा भ्रम हृदयांतुनि जाइल कधिं निघुनी ? ।
लाज, भावना, भय हीं राहिन कधिं मी त्यागोनी ? ।
स्वाभिमान, जनरूढी, वैभव येइल कधिं न मनीं ? ।
संतपदींची धूलि कधीं मी चर्चिन या देहीं ? ॥ ४ ॥
वैराग्याची कंथा कधिं मी स्कंधीं स्थापोनी—।
प्रेमनदीचें प्रेमजल कधीं स्वकरीं घेवोनी—।
शांतवीन मम हृदया जल तें प्राशन मी करुनी? ।
प्रेमरसानें हंसुनि रडुनि कधिं हरितें मी बाहीं? ॥ ५ ॥
चिदानंदसागरान्तरीं मी जाइन कधिं बुडुनी ? ।
प्रमत्त करिनचि जनांसि कधिं मी स्वयें मत्त बनुनी ? ।
देहभाव मम मनिंचा मी कधिं जाइन विसरुनी ? ।
करिन विहारा नित्य सुमंगल त्या हरिच्या पायीं? ॥ ६ ॥

---

## परिशिष्ट.

### अध्याय दुसरा.

[ **चाल**—सुदक्षिणापति दिलीपनंदिनि० ]

**चल बा चित्ता ! सहल कराया स्वस्थ कसें तूं बसलेंसी ? ॥**
**सहज येउनी निधान करिं तव मूढपणें तूं दवडीसी ! ॥ ध्रु० ॥**
**अगणित कुसुमें पडलीं कालीरूप कल्पतरुमूलाशीं ।**
**निवडुनि घेतां येतिल चारी त्यांतिल तुझिया हातासी ॥ १ ॥**
**प्रवृत्ति तैशी निवृत्ति जाया पराक्रमी असती तुजसी ।**
**सहल कराया जातां परि तूं सवें घेइं त्या निवृत्तिसी ॥ २ ॥**
**निवृत्तिचा जो विवेकनामा सुत सत्त्वशील गुणराशी ।**
**सोडुनि अभिमाना त्यापासुनि परिसें सुतत्त्वबोधासी ॥ ३ ॥**
**दूर नेउनी उपदेशीं बा ! प्रवृत्तिच्या त्या तनयासी ।**
**आयके न जरि ज्ञानसागरीं लोटुनि दे त्या मूढासी ॥ ४ ॥**
**शुचि-अशुचींतें दिव्य मंदिरीं घेउनि करिं तूं शयनासी ।**
**प्रेमें असती सवती जरि त्या, जाशिल जननीचरणांशी ॥ ५ ॥**
**अहंकार तेवीं अविद्या असति जनक-जननी तुजसी ।**
**मोहा टाकुनि दूर लोटिं त्यां स्मर न तयांच्या प्रेमासी ॥ ६ ॥**
**धर्माधर्म अजाद्वय जें त्या दृढ बांधुनियां स्तंभासी ।**
**जरि न मानिती निषेध, देइं ज्ञानासीनें बलि त्यांसी ॥ ७ ॥**
**मोहरूप त्या दरींत भयकर कधिंहि गड्या ! तूं नच पडसी।**
**सुधैर्यरूपी स्तंभा जरि त्या हृदया! करिं तूं दृढ धरिसी ॥ ८ ॥**
**'प्रसाद' वदतो—होतां ऐसें काला निर्भय वच वदसी ।**
**'बाळा ! हृदयहारका !' म्हणुनी प्रेमें त्या वक्षीं धरिसी ॥ ९ ॥**

# चतुर्दश परिच्छेद.

## अध्याय चवथा.

[ चाल—अष्टमूर्ति परमेश सदाशिव० ]

आवरिं सखये! वियोगानला प्राण विकल झाला ।
लोचनमोहन मनश्चोर तो दाखविं गे! मजला ॥ ध्रु० ॥
व्रजजनमीन न जगे त्यजुनि त्या प्रेमसागरासी ।
रूपविहीना गोपसुता मी त्यजुनि ह्मणुनि मजसी–।
मजहुनि सुंदर पाहुनि ललना हो वश हरि तिजसी ।
बाह्यरूपलोलुप तो प्रणयी—कल्पनाहि न मला ॥ १ ॥
अभिनव सुरुचिर रूप देखुनी गेलें मी भुलुनी ।
हृदयासनिं तें चरणयुगल मी ठेवीं स्थापोनी ।
फल हें त्याचें दे शठ मातें—सखये! मी ह्मणुनी ।
श्यामल त्यासम यमुनाजालिं झणिं देतें प्राणाला ॥ २ ॥
विष तरि देउनि ने मम सखये! असौख्य विलयाला ।
नातरिं पाशीं वनलतिकेच्या देउनि कंठाला—।
त्यजितें नवरुचितमालतरुतलिं तुच्छ जीवनाला ।
हो न हें तरी सोडिन जगता गात गात हरिला ॥ ३ ॥

---

[ २ ]

[ चाल—घनःश्यामसुंदरा श्रीधरा० ]

हृदयवल्लभा! नाथा! तूं म. माझ्या गमसी ।
हतभागी मी अबला वदलें काय प. तुजसी? ॥ ध्रु० ॥
मम करिंचा तूं हृदयविरामा! दर्पण कधिं दिससी ।
सुगंधयुत जणुं पुष्प कधीं तूं वाटसि हृदयासी ।
कबरीमाजीं स्थापुनि तुजला ठेविन मजपाशीं ।
नातरि ठेविन तुजसी दयिता! लपवुनियां केशीं ।
केशीं श्यामल कुसुम ठेवितां दिसत न ल्वणासी ॥ १ ॥

## परिशिष्ट.

नयनांजन कधिं, मुखिं तांबूलचि नाथा! मम होसी।
श्यामल अंजन करुनि तुझें मी लाविन नयनांसी।
वदतिल कृष्णांजन तें, मग तूं कुणा न सांपडसी।
मृगमद तनुचा हार करुनि तव देइन कंठासी ॥ २ ॥
श्यामल चंदनलेप चर्चुनी शांतवीन वपुसी।
हार करुनि तव कंठिं घालुनी ठेविन हृदयासी।
या देहाचें जीवन, गृहिंचें भूषण तूं असती।
पक्ष जेविं ते विहगा, जीवन जणुं तें मीनासी।
तेवीं असती हृदय-हारका! तूं या दीनेसी ॥ ३ ॥